ॐ

# ईशावास्योपनिषद्

( द्वैताद्वैतभाष्यभाषांतरासह. )


संपादक

चिंतामण गंगाधर भानु, बी. ए.



प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी,

प्रिंटर्स, पब्लिशर्स, एजंट्स् इत्यादि, ठाकुरद्वार–मुंबई.

सन १९११ इ.

# विशेष प्रस्तावना.

या उपनिषदाच्या उपोद्घातांत सांगितलेंच आहे कीं, 'ईशावास्योऽपनिषद्' हें यजुर्वेदान्तर्गत 'वाजसनेय' शाखेंतील आहे. या शाखेचा द्रष्टा याज्ञवल्क्य ऋषि होय; हा ऋषि वैशंपायनाचा शिष्य होता. श्रीमद्व्यासांनीं पैल, सुमंतु, जैमिनि आणि वैशंपायन, ह्या आपल्या चार शिष्यांस ऋग्वेदादि चार वेदांचा उपदेश केला. यजुर्वेदाचा उपदेश वैशंपायन ऋषीस केला होता. पुढें ह्या वेदाचा प्रसार वैशंपायनानीं केला. असो; एकदां याज्ञवल्क्य नामक एका शिष्यानें वैशंपायनऋषीसमक्ष सर्व यजुर्वेद शिकणाऱ्या ब्राह्मणांचा अपमान केला. तेव्हां 'तूं माझ्यापासून जें शिकलास तें सर्व ओकून टाक.' अशी याज्ञवल्क्यास क्रुद्ध झालेल्या गुरुजींनीं आज्ञा केली. तेव्हां याज्ञवल्क्यानें आपण शिकलेला वेद तेथेंच टाकून दिला आणि आपण स्वतः सूर्यदेवाची उपासना करण्याकरितां अरण्यांत निघून गेला. तेथें एकनिष्ठ मनानें पुष्कळ कालपर्यंत त्यानें तपश्चर्या केली. ती पाहून सूर्यदेवता प्रसन्न झाली, आणि याज्ञवल्क्याला 'वर माग' असें म्हणाली. याज्ञवल्क्यानें हा वर मागितला कीं, 'माझ्या गुरूजीस येत नाहीं, अशा यजुर्वेदाचा उपदेश मला असावा.' तेव्हां अश्वरूपानें प्रकट झालेली सूर्य देवता, त्यास ज्या शाखेचा उपदेश करिती झाली, तीच 'वाजसनेय' शाखा याज्ञवल्क्यानें प्रसिद्ध केली. वाजि म्हणजे अश्व, हा अर्थ सर्व-प्रसिद्धच आहे.

ह्या संहितेला 'शुक्ल यजुर्वेद' असेंही म्हणतात; शुद्ध यजुर्वेद असेंही दुसरें नांव आहे. याचें कारण असें असावें कीं, या संहितेंत केवळ मंत्रच आहेत. गद्य-पद्यांचा येथें मिश्रीभाव झालेला नाहीं. यजुर्वेद हा सामान्यतः यज्ञामध्यें कोणकोणत्या गोष्टी कराव्या लागतात, त्यांचें विधान करणारा आहे. यज्ञामध्यें यजुर्वेदी आचार्याकडे अध्वर्यूचें काम असतें.

ईशावास्योऽपनिषद् हें संहितान्तर्गत, म्हणजे मूळ संहितेंतच प्रविष्ट झालेलें आहे. इतर उपनिषदें ब्राह्मणांमध्यें किंवा आरण्यकांमध्यें गोंविलेलीं आढळतात. असो; या उपनिषदाची भाषा थोडीशी गूढ आणि क्लिष्ट अशी आहे. मागें एके ठिकाणीं सांगितलेंच आहे कीं, शंकराचार्यांस व रामानुजाचार्यांस या उपनिषदाचे अठरा मंत्र उपलब्ध होते. याच अठरा मंत्रांचे श्रीमन्माध्वानीं वीस मंत्र केले आहेत; पण श्रीदयानंदस्वामी असें म्हणतात कीं, मूळ संहितेमध्यें या उपनिषदांत सतरा मात्र मंत्र असले पाहिजेत. असा मंत्र-संख्येच्या संबंधानें येथें बराच घोंटाळा दिसतो.

या ईशावास्यांतील सर्व मंत्र सिद्धान्तपर आहेत; ह्या सिद्धान्तांची चर्चा सामान्यतः या उपनिषदांत कोठेंही केलेली नाहीं. शेवटचे चार मंत्र मात्र परमेश्वर-प्रार्थनापर आहेत. हे सिद्धान्त कोणते ? आणि यांचा परस्पर संबंध काय ? यांचें विवेचन माझ्या ' विवरणामध्यें व उपसंहारामध्यें ' मी यथामति करणार आहें.

या उपनिषदाचा द्रष्टा ब्रह्मदेव, देवता विष्णु आणि हा उपदेश ब्रह्मदेवानें शंकरास केला, असेंही कोठें कोठें म्हटलेलें आढळतें. सामान्यत्वेंकरून या उपनिषदांतील मंत्रांचा छंद ' अनुष्टुप् ' आहे.

असो, वर लिहिल्याप्रमाणें या उपनिषदापासून मला काय बोध झाला, त्याचें स्पष्टीकरण ' विवरणांत व उपसंहारांत ' करण्याचें आश्वासन देऊन, ही विशेष प्रस्तावना येथें आटपती घेतों.

संपादक.



# अनुक्रमणिका.



ॐ तत्सत् ब्रह्मणे नमः

# पूर्वप्रस्तव.

## विषयप्रवेश.



उपनिषदें अनेक आहेत. उपनिषदें हा वेदांचा शेवटचा भाग असतो. वेदांमध्यें संहिता, ब्राह्मणें, आरण्यकें अथवा उपनिषदें यांचा अन्तर्भाव होतो. संहिता आणि ब्राह्मणें हीं यज्ञकर्माच्या व देवपितरांची प्रार्थना करण्याच्या उपयोगीं आहेत. शिवाय, ब्राह्मणांमध्यें यज्ञकर्मांच्या विधिसंबंधानें मीमांसा केली असून, त्यांत यज्ञदेवतांच्या संबंधानें स्वरूपवर्णन व पुष्कळशा ऐतिहासिक गोष्टीही आल्या आहेत. आरण्यकें अथवा उपनिषदें यांत चित्तशुद्धीचा व तत्त्वज्ञानाचा विचार केलेला असतो. तिन्ही संध्याकाळचीं होम–हवनें झालीं, यज्ञसत्रांमधील काम आटोपलें, म्हणजे पूर्वकालीन ऋषि सामान्यतः तत्त्वज्ञानाची चर्चा एकत्र जमून करीत असत.

छांदोग्य, बृहदारण्यक, इत्यादि उपनिषदें पाहिलीं म्हणजे मी म्हणतों याचा प्रत्यय येईल. त्याचप्रमाणें गुरुशिष्यांमध्यें, पतिपत्नीमध्येंही ही ज्ञानचर्चा चालत असे, हेंही उपनिषदांतील कित्येक वाक्यांवरून सिद्ध होतें. कठोपनिषदांत 'यम-नाचिकेत' यांचा संवाद आहे. प्रश्नोपनिषदांत तर प्रश्नपूर्वकच ज्ञानकथेला आरंभ झाला आहे. बृहदारण्यकांत याज्ञवल्क्यांनीं आपल्या पत्नीला ज्ञानोपदेश केला आहे. असो; ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांत कांहीं कांहीं सूक्तें अशीं आहेत कीं, तेथें कित्येक ऋषी 'हें विश्व कोठून उत्पन्न झालें?' 'त्याची उत्पत्ति करणारा कोण?' 'सूर्य–चंद्रादि तेजोगोल दररोज येतात कोठून?' 'अस्त झाल्यानंतर जातात कोणीकडे?' इत्यादि अनेक तत्त्वज्ञानोन्मुख प्रश्न व त्यांचीं उत्तरें दृष्टीस पडतात. आश्चर्य उत्पन्न होणें, शंका उत्पन्न होणें, शंकांचें समाधान करण्याचा प्रतिभापूर्ण, उत्तान कल्पनेनें, स्वबुद्धीनें अथवा परमेश्वरी प्रेरणेनें प्रयत्न करणें, याचेंच नांव ज्ञान–विज्ञान आहे. या ज्ञान–विज्ञानाला प्रथमतः शास्त्रीय स्वरूप येऊन शेवटीं त्याचा परिपाक तत्त्वज्ञानामध्यें होतो. तत्त्वज्ञान ही ज्ञानाची अन्तिम स्थिति आहे. या तत्त्वज्ञानाचा विचार करणारीं तीं उपनिषदें होत.

## ज्ञानकांड.

प्राचीनकालीन भारतीय आर्यांचें तत्त्वज्ञान प्रथमतः उपनिषदांमध्येंच ग्रथित झालेलें आहे. या ग्रंथांत ईश्वरैकत्वाची कल्पना पूर्णतेला गेलेली दृष्टीस पडते. म्हणजे या सर्व जड विश्वांचा व अनंत जीवांचा उत्पादक, पालनकर्ता आणि संहार करणारा एकच परमेश्वर आहे, तोच अनेक स्वरूपें घेऊन सृष्टि–विसृष्टीचीं नियमित कर्में करितो आणि करवितो, सर्व देव–देवता आणि हीं प्रत्यक्ष दिसणारीं पृथ्वी, आप, तेजादि पंचमहाभूतें त्याच्याच तंत्रानें चालतात, तो शुद्ध आहे, सर्वज्ञ आहे, सर्वशक्तिमान् आहे, सर्वन्यायी आणि सर्वदयाघन आहे, त्याची शुद्ध अन्तःकरणानें उपासना केली असतां व त्याच्या ठिकाणीं एकनिष्ठ श्रद्धा पूर्णत्वानें ठेविली असतां, तो भक्तांचें ज्ञान वाढवून व शील सुसंस्कृत करून त्यांस दुःखविमुक्तही करितो, इत्यादि प्रकारचा निश्चय दृढ होऊन, भक्तीच्या पलीकडे मानवी मनाची धांव गेलेली आहे, असें दृष्टीस पडतें. असो.

असे विचार जेथें ग्रथित झाले आहेत, जेथें 'सृष्टीचा, जीवांचा आणि परमेश्वराचा संबंध काय ? 'सर्वांचें मूल स्वरूप कोणतें आहे ?' 'ज्ञान-विज्ञान म्हणजे काय ?' 'शुद्ध चैतन्याला देह कां प्राप्त होतो ?' 'मेल्यावर जीव कोठें जातो ?' इत्यादि मनोरंजक प्रश्नांचा तात्त्विक ऊहापोह केलेला दृष्टीस पडतो, त्यांस उपनिषदें असें म्हणतात. उपनिषदें अनंत आहेत, असें "अनंता वै वेदाः" या श्रुति-वाक्यावरून दिसतें; पण प्रस्तुत १०८ उपनिषदें मात्र उपलब्ध आहेत. या अनेक उपनिषदांत आतांच सांगितल्याप्रमाणें पराभक्तीचा व तात्त्विक ज्ञानाचा विचार केलेला असतो. त्यांतही ज्ञानाचाच केवळ ज्यांत विशेषतः विचार केला आहे, त्यांस 'दशोपनिषदें' असें म्हणतात. तसेंच तात्त्विक विचाराचा हा भाग वेदाच्या शेवटीं येतो, म्हणून त्यास वेदान्त अशीही संज्ञा आहे.

याप्रमाणें वेदान्त हा ज्ञानाचा व तत्त्वज्ञानाचा विचार करितो. येथें संहिता, ब्राह्मणें, हे ग्रंथ प्रमाण मानले जातात हें खरें; तथापि आपल्या विचारशक्तीची धांव जेथपर्यंत जाईल तेथपर्यंत जावयाचें, श्रद्धापूर्वक विचारदृष्टीचें साम्राज्य करावयाचें आणि हें सर्व जगत्–कल्याणासाठीं करावयाचें, ही भावनाही उत्कटत्वानें श्रुत्यनुगामी उपनिषदांमध्यें किंवा वेदान्तामध्यें प्रकट झालेली आहे. उपनिषदें पौरुषेय आहेत किंवा अपौरुषेय आहेत, हा प्रश्न माझ्या समजुतीनें फारसा महत्त्वाचा नाहीं. कारण, येथें ज्ञानचर्चा चालून जे सिद्धान्त नियमित झालेले दृष्टीस पडतात, ते स्वयंभू आहेत, स्वप्रकाश आहेत, मंगलकारी आहेत, असें विचारान्तीं कोणाच्याही ध्यानांत येईल. या ग्रंथांमध्यें ज्या श्रुति आहेत, ( जे मंत्र आहेत, जीं वाक्यें आहेत, ) त्या श्रुति, ते मंत्र आणि तीं वाक्यें, सत्यामृतानें पूर्ण भरलेलीं आहेत, असें कोणालाही केव्हांही कळून येईल. तेव्हां भ्रमशून्य शुद्ध ज्ञान अपौरुषेय आहे, किंवा पौरुषेय

आहे हा विचार माझ्या समजुतीनें अप्रस्तुत आहे. असो; एकच वस्तु म्हणजे ब्रह्म हें सर्व विश्वाच्या अखिल पदार्थांमध्यें व सर्व विश्वामध्यें ओतप्रोत भरलेलें आहे; तेंच सर्वांचें उपादान-कारण, निमित्त-कारण व सर्व नियमन-कारण असून, स्वरूपतः नित्य, शुद्ध, बुद्ध आणि मुक्त आहे, हा सर्व पूर्ण विचाराचा श्रुत्यन्तर्गत परिपाक आहे.

वेदांमध्यें सांगितलेलें कर्म, व वेदविहित उपासना सिद्ध झाल्यानंतर जीवास ज्ञानाचा विचार करण्याचा अधिकार प्राप्त होतो. आपाततः ज्ञान झाल्यावर श्रवण-मनन-निदिध्यास एकनिष्ठतेनें चालविणें व ब्रह्माचें ज्ञान-विज्ञान साक्षात्कृत करून घेणें, हा वेदान्तप्रणीत साधन—मार्ग आहे. याप्रमाणें विज्ञान पूर्ण झालें म्हणजे जीव मुक्त होतो. म्हणजे त्याचें ज्ञान पूर्ण होतें, अज्ञान नाहींसें होतें, अज्ञानजन्य कर्म संपतें व सुखदुःखाचा व जन्ममरणाचा शेवट होतो, हें फल होय.

## तत्त्वज्ञान—मीमांसेंत अनेक पन्थ कां ?

असें ब्रह्माचें सामान्य स्वरूप, तत्प्राप्तीचें साधन आणि ज्ञान—विज्ञान हें तत्फल, या गोष्टी सांगितल्या. या उपनिषदांत वरील गोष्टींसंबंधानें सामान्यतः एकमतच आहे; पण ' ब्रह्माचा व जीवाचा काय संबंध आहे ? जीवाचा जगाशीं म्हणजे चेतनाचा अचेतन वस्तूंशीं, कोणत्या प्रकारचा संबंध आहे ? जीवाचें व जगाचें मूळ स्वरूप काय ? ब्रह्म हें विश्वाचें कारण कोणत्या स्वरूपानें आहे ?' इत्यादि प्रश्नांच्या संबंधानें वेदकालीन ऋषींमध्यें एकमत होतें किंवा नाहीं, हें आज स्पष्ट रीतीनें व निश्चयानें सांगतां येईल, असें मला वाटत नाहीं. वेदान्तामध्यें अशीं कांहीं वाक्यें आहेत कीं, ज्यांवरून ' ब्रह्म हें मूलतः निर्गुण आहे, ज्ञानरूप आहे, भेदशून्य आहे, इत्यादि प्रकारचा बोध उत्पन्न होतो; पण 'ब्रह्म सगुण आहे, ज्ञानरूप असून ज्ञानीही आहे, तें पूर्ण दयाघन आहे,' अशा प्रकारचींही वाक्यें दृग्गोचर होतात ! तसेंच ' जीवांतील चैतन्य म्हणजेच ब्रह्माचें ज्ञानरूप ' असें सांगणाऱ्या वाक्यांबरोबरच 'जीव आणि ब्रह्म यांच्या स्वरूपांत नित्य भेद आहे,' असें सांगणारींही वाक्यें दृष्टीस पडतात. यांवरून त्या वेळीं सुद्धां तत्त्वज्ञानाच्या कांहीं प्रश्नांसंबंधानें एकमत नव्हतें, असें उपनिषदांचें प्राथमिक श्रवण करणाऱ्या पुरुषांस वाटतें. याचप्रमाणें ज्ञानाच्या उत्पत्तीसंबंधानेंही पुष्कळ मतवैचित्र्य आहे. म्हणजे कोणी ऋषि म्हणतात कीं, ' ज्ञान ही वस्तु स्वयंभू आहे,' तर दुसरे कोणी असें म्हणतात कीं, ' इंद्रियें, मन आणि बुद्धि यांच्या साहाय्यानें, श्रुतीच्या आधारानें ब्रह्मज्ञान उत्पन्न होतें.' म्हणून येथेंही एकमत आहेसें दिसत नाहीं. प्रत्यक्षादि प्रमाणांच्या संख्येसंबंधानें व बलाबलासंबंधानेंही विसंवाद अथवा मतवैचित्र्य आहे. श्रुतीला धरून मानवी विचारानें व ज्ञानेंद्रियांनीं जावयाचें, किंवा मानवी विचाराच्या व ज्ञानेंद्रियांच्या अनुरोधानें श्रुतीचा अर्थ करावयाचा, येथेंही विसं-

वाद आहे, अथवा एकमत नाहीं. नित्य आणि पूर्ण ब्रह्म कांहीं कर्म प्रत्यक्ष करितें किंवा तें कर्म त्याच्या हातून होतेसें दिसतें, हाही प्रश्न भानगडीचाच आहे.

याप्रमाणें श्रुतीच्या प्रामाण्याविषयीं जरी एकमत आहे, तथापि आतांच सांगितल्याप्रमाणें, श्रुतीचें तात्पर्य काय? तिचें बलाबल कसें? ब्रह्मस्वरूप, आणि जगत्-स्वरूप हीं कशीं आहेत? ज्ञान म्हणजे काय? इत्यादि प्रश्नांसंबंधानें पुष्कळच मतभेद आहे. ही गोष्ट श्रुतीला प्रमाण मानणाऱ्या लोकांची झाली. याशिवाय शुद्ध नास्तिक म्हणजे वेदप्रमाण न मानणारे, 'जीवानें कर्म केलें असतां तो बद्ध होतो' असें म्हणणारे, सांख्य-योग इत्यादि अनेक पक्षांचा उल्लेख जागोजाग उपनिषदांमध्यें आला आहे. असो; या नास्तिक लोकांच्या मतांचा विचार आज न करितां केवळ श्रुतीस प्रमाण मानणाऱ्या प्रमुख आचार्यांचे पंथांचा थोडासा विचार करून या पूर्वप्रस्तावांत त्यांच्या मताचें सामान्य दिग्दर्शन करण्याचें योजिलें आहे.

असें करण्याचें कारण उघड आहे कीं, उपनिषदांचें व्याख्यान करितांना भरतखंडांत झालेल्या जगत्-प्रसिद्ध चार आचार्यांचीं भाष्यें उद्धृत करून त्या भाष्यांचा अर्थ देण्याची योजना ठरली आहे. आतां, या पुस्तकाच्या वाचकांस ही गोष्ट विदित असेल कीं, प्रस्थानत्रयीवर जो पंडित स्वतंत्र व अविकारी भाष्यें करील, त्यालाच आचार्य ही बहुमानाची पदवी देण्यांत येत असे. प्रस्थानत्रयी म्हणजे दशोपनिषदें, ब्रह्मसूत्रें आणि भगवद्गीता, हे ग्रंथ होत. हे तीन्ही ग्रंथ आमचें तत्त्वज्ञान, आमचीं शास्त्रें, आमचा धर्म, आमची नीति, आमचें शील, आणि आमचे शिष्ट आचार, या सर्वांस आधारभूत आहेत. या तीन्ही ग्रंथांची जो विद्वान् पंडित योग्य रीतीनें व्यवस्था लावून 'सर्वत्र समन्वय आहे' असें दाखवील, तोच आचार्य पदवीला योग्य होत असे.

## श्रीमच्छंकराचार्य-सिद्धान्त-दिग्दर्शन.

असो, या भरतखंडांतील शककालांतील सर्व-लोकप्रसिद्ध प्रथम आचार्य म्हटले म्हणजे श्रीमच्छंकराचार्य होत. यांनीं वेदधर्माची आणि वेदमार्गाची परंपरा यत्किंचितही न सोडितां, श्रुतीच्या साहाय्यानें व बुद्धीच्या बलानें अशी एक उत्तमोत्तम विचार-माला निर्माण केली आहे कीं, तिचा आस्वाद प्राचीन व अर्वाचीन, पौरस्त्य आणि पाश्चात्य, विद्वानांनीं कितीहो घेतला तरी त्यांची तृप्तिच होत नाहीं. यांची भाषासरणी, शब्दसौष्ठव, ग्रंथरचना व विषयाची मांडणी इतकी मनोहर आहे कीं, यांच्या लेखांच्या नादब्रह्मानें सर्व आस्तिक-नास्तिक, वेदान्ती व संसारी, संस्कृतज्ञ व असंस्कृतज्ञ इत्यादि सर्व लुब्ध होऊन जातात. असो; या आचार्योंनीं वैदिक धर्माची स्थापना करून भरतखंडास व भारतीय तत्त्वज्ञानास पुनः जिवंत केलें अथवा जीवदान दिलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांची विचारपद्धति तर अर्वाचीन शास्त्री पंडितांस सुद्धां थक्क करून

सोडिते. वेदवेदान्तांचें अति गूढ रहस्य जर कोणास यथास्थितपणें कळलें असेल, तर तें याच माहात्म्यास होय, असें मला वाटतें. यांनीं जें तत्त्वज्ञान प्रस्थापित केलें व ज्याच्या जोरावर वेद, उपनिषदें आणि स्मृति यांची संगति लावली, तें सर्व तर केवळ अपूर्व आहे; आणि हें या आचार्यांचें तत्त्व अलीकडील शास्त्रज्ञ पंडितांसही मान्य होऊं लागलें आहे, हाही अपूर्व योगच होय !

एकच एक ब्रह्मवस्तु सर्वत्र सत्यत्वानें आहे, बाकीचें हें सर्व दृश्य आणि कल्पना-गम्य विश्व, आणि ह्यांत राहणारे चौऱ्यांशीं लक्ष योनींतील अनंत प्राणी व अनंत जड पदार्थ मिथ्या आहेत, हा यांचा पहिला व मुख्य सिद्धान्त आहे. आपल्यास जें हें विश्व दिसतें, या दृश्य विश्वाचे द्रष्टे ( पाहणारे ) जे जीव दिसतात आणि या दृश्य विश्वास पाहून त्याच्या द्रष्टयांस ( जीवांस ) दृश्य ज्ञान होतें, हे ' माया ' नामक अविद्येचे विलास होत. ही माया सत्य आणि असत्य यांचें अघटित मिश्रण करून कांहीं एक निराळाच भास उत्पन्न करणारी आहे; हा यांचा दुसरा सिद्धान्त आहे. दृश्य जगत् आणि सुखदुःख भोगणारे जीव हीं आतांच सांगितलेल्या मायेचीं कार्यें आहेत. हें दिसणारें विश्व जर मिथ्या आहे, येथें शुद्ध आणि निर्मळ सुख मिळण्याचा जर संभवच नाहीं, तर अज्ञानांत लोळणाऱ्या व दुःखानें तळमळणाऱ्या जीवानें करावयाचें तरी काय ? असा प्रश्न होईल. त्यावर या आचार्यांचें असें उत्तर आहे कीं, ह्या जिज्ञासु मुमुक्षूंनीं चित्तशुद्धिपूर्वक ज्ञान संपादन करावें व ब्रह्मस्वरूपाचा निश्चय करून घ्यावा. 'मीच ब्रह्म आहें' 'जगत् व सुख-दुःख मिथ्या आहेत,' हाही निश्चय करावा, म्हणजे ते दुःख-मुक्त होतील व त्यांची तळमळ संपेल. ब्रह्मज्ञान-विज्ञान हा दुःखनिवृत्तीचा आणि सुखप्राप्तीचा एकच सरळ मार्ग आहे. सर्व कर्मांचा कर्ता मी आहें, व पुत्र-मित्र-कलत्रादि सर्व माझीं आहेत, असा अभिमान आणि मीं केलेल्या कर्मांचें फल मलाच मिळालें पाहिजे, ही वासना, या उभयतांचा त्याग, कर्म करीत असतां, हळू हळू केला पाहिजे. हा त्याग सर्वस्वी होणें व एकदम होणें प्रायः दुष्करच आहे. यासाठीं सर्व जगतास उत्पन्न करून त्याचें पालन करणारा जो देव-देवेश्वर त्याची अखंड आणि एकनिष्ठ उपासना करण्याचें व्रत जर जीव पत्करील, तर त्याला ईशप्रसादानें अहंममतादिकांचा व अखिल विश्वास मोह घालणाऱ्या मायेचाही निरास करितां येईल. हें वर्णाश्रम-विहित कर्म आणि परमेश्वराची अखंड उपासना, या जसजशा सिद्ध होत जातील, त्या त्या प्रमाणांनीं जीवाचें चित्त, शुद्ध आणि निर्मल होत जाऊन उपनिषच्छ्रवणानें त्याला आपलें स्वरूप स्पष्ट आणि स्पष्टतर दिसूं लागेल. सारांश, चित्तशुद्धि हें मोक्षमार्गाला लागण्याचें मुख्य आणि प्रथमद्वार आहे. चित्तशुद्धि होऊन वेदान्ताचें मनन आणि निदिध्यास अखंड झाला म्हणजे आपल्या स्वरूपाची पूर्ण ओळख पटून "एकमेवाद्वितीयम्" ( एकच एक अद्वितीय वस्तु आहे ) असा निश्चय होतो आणि

अज्ञान, मोह, वासना, भय, दुःख, शोक, ताप, इत्यादि सर्व शत्रूंचें उन्मूलन होऊन तळमळ संपते व जीव आपल्या स्वरूपाला जाऊन मिळतो. आतां शेवटीं हें सांगावयाचें कीं, ज्या अहंममतेनें सकाम कर्म उत्पन्न करून जीवाला जन्ममरणाच्या चक्रांत घातलें, त्या अहंममतेचा सर्वथा नाश करण्यासाठीं निष्काम वृत्तीनें व उपासना करीत असतां प्रथमतः अभिमान व वासना यांचा क्षय करण्यासाठीं देवेश्वराचें आणि मग ब्रह्माचें ध्यान केलें पाहिजे. हा निरास झाला म्हणजे तत्त्वचिंतनाला व तत्त्वध्यानाला आरंभ होऊन ध्यानद्वारा तत्त्वनिश्चय होतो. हें सर्व कार्य ज्ञानाचें आहे. कर्म व उपासना, चित्त निर्मळ व स्थिर करितात व श्रुतीचें मनन हें निश्चय उत्पन्न करितें व मोक्ष देतें. यावरून असें दिसेल कीं, सायुज्यता मुक्तीला तत्त्वज्ञानाची मात्र आवश्यकता आहे. सकाम अथवा निष्काम कर्माची आवश्यकता शेवटपर्यंत नाहीं.

या उपनिषदांत मुख्यत्वानें ज्या सिद्धान्ताचें प्रणयन होणार आहे, त्यांच्या सामान्य समजुतीसाठीं वरील आचार्यांचे हे चार ठाम झालेले निश्चय समजून घेतले म्हणजे पुरें होईल असें वाटतें. परमार्थतः (१) एकच एक अद्वितीय वस्तु आहे. (२) जगत्, जीव आणि ईश्वर हे स्वरूपतः एकच आहेत. (३) आपल्यास या तीन व्यावहारिक वस्तूंचें जें भान होतें तें माया-निर्मित आहे. माया ही वस्तुतः नसून व व्यवहारांतही दिसत नसून, परमार्थाचा विचार करूं लागलें म्हणजे व्यवहाराची व्यवस्था लावण्याकरितां कांहीं कालपर्यंत ग्रहण केलेली ही वस्तु होय. पण व्यवहारदृष्टीनें व्यवहाराची व्यवस्था लावीत असतां माया असत नाहीं व दिसत नाहीं. (४) जीव सकाम व साभिमान कर्म भ्रांतीनें करीत असतो व सकाम आणि साभिमान ज्ञान भ्रांतीनें मिळवित असतो. त्यांचा त्याग करावयासाठीं आणि परमार्थ प्राप्त करून घेण्याकरितां व या व्यवहाराचा नाश करण्याकरितां, म्हणजे अहंममतेनें जीवाचे ठिकाणीं उत्पन्न झालेल्या मायेचा नाश करण्याकरितां अथवा मायेनें निर्माण झालेल्या अहंममतेचा नाश करण्यासाठीं, निष्काम व निराभिमान कर्म आणि ज्ञान यांचें परमार्थाकडे दृष्टि ठेवून अनुष्ठान करावयाचें, व पुढें चित्तशुद्धि झाल्यावर श्रुतिवाक्यानें सांगितलेल्या बोधाचा अखंड-मनन-निदिध्यास करून व ब्रह्मोपासना करून स्वरूपाचे ठिकाणीं निश्चय करावयाचा. ह्या चार गोष्टी लक्षांत ठेवून श्रीमच्छंकराचार्यकृत उपनिषद्-भाष्याचें श्रवण करावें, अशी वाचकांस मी नम्रपणानें विनंति करितों.

## श्रीमद्रामानुजाचार्य-सिद्धान्त-दिग्दर्शन.

श्रीमच्छंकराचार्यांच्या पाठीमागून सुमारें दोनतीनशें वर्षांनीं श्रीमद् रामानुजाचार्यांचा उदय झाला. हेही आचार्य अतिशय जाडे विद्वान् व जगत्-कल्याणकारी होते. यांनींही श्रीमद्भगवद्गीतेवर व श्रीमद्व्यासकृत ब्रह्मसूत्रांवर फार विस्तृत व अधिकारयुक्त व्याख्यानें अथवा भाष्यें लिहिलीं आहेत.

उपनिषदांवर यांचीं भाष्यें नाहींत; पण यांच्या शिष्य-प्रशिष्यांनीं केलेलीं भाष्यें उपलब्ध आहेत. या आचार्यांची भाषापद्धति आणि विषय-प्रतिपादन करण्याची शैली गंभीर व गहन असून सामान्यतः सर्व भाविक पंडितांस समजून उमजेल व लवकर पटेल अशा प्रकारची आहे. यांची विचारपद्धति व भाषासौंदर्य विशेष प्रौढ व विशेष गहन आहे. नीट विचार केल्याखेरीज यांची मीमांसा-सरणि सामान्य मनुष्यास सहसा आकलन करितां येणार नाहीं. यांची भाषा व विचार न्यायघटित असून परमेश्वराचे ठिकाणीं यांची परम निष्ठा आहे, असें दाखवितात. पंचरात्रादि जे भक्तिप्रतिपादक पंथ उपनिषत्कालापासून प्रचलित होते, त्या परंपरेमध्यें यांचें अध्ययन झालें होतें. सांख्यकृत परिणामवादाचा आश्रय घेऊन यांनीं पंचरात्र पद्धतीचा उद्धार केला. यांनीं ज्ञानमार्गाची बाजू धरली आहे, हें खरें; परंतु उपासना मार्गाला अद्वैतपद्धतीमध्यें गौणत्व प्राप्त झालें, असें वाटून यांनीं जगत्कल्याणाच्या बुद्धीनें उपासना पंथाचा जीर्णोद्धार केला, व त्याला ज्ञान-विज्ञानाच्या पंक्तीला आणून बसविलें आहे. ज्ञान आणि उपासना ह्या दोहोंचीही आवश्यकता संसाऱ्याला, मुमुक्षूला व ज्ञानीजीवाला आहे, असा यांचा निश्चय होता, असें वाटतें. यांचा पंथ विशेषतः कावेरी नदीच्या दक्षिणेस विशेष जोरानें प्रचलित आहे व उत्तरहिंदुस्थानामध्येंही अंगवंगादि देशांत ( बंगाल वगैरे प्रांतांत ) हा तत्त्वविचार बराच प्रसृत झाला आहे. शंकराचार्यांचें मत सामान्य जनांपासून तों महाविद्वानांपर्यंत प्रायः सर्व भारतीयांस संमत झालेंसें दिसतें, तसें यांचें मत दिसत नाहीं; तरी श्रद्धापूर्वक विचार करणाऱ्या कांहीं महापंडितांस यांचेंच मत ग्राह्य व जीवोपकारक आहे, असें निश्चयपूर्वक वाटतें. असो; या आचार्यांनीं उपासनापंथाला पुनः जोराचें आयुष्य दिलें, हें मात्र सर्वतोग्राह्य आहे.

आतां, शंकराचार्यांचे म्हणून वर जे चार सिद्धान्त उल्लेखित केले, त्यांचा या आचार्यांनीं कसा विचार केला हें पाहूं. (१) एकच अद्वितीय ब्रह्म आहे, हा श्रुतिप्रणीत सिद्धान्त यांसही मान्य आहे. मात्र ब्रह्माच्या एकरसस्वरूपासंबंधानें शंकराचार्य व रामानुज यांत मतैक्य नाहीं. शंकराचार्यांचें ब्रह्म निर्गुण आहे, तर यांचें ब्रह्म अनंत मंगलगुणांनीं युक्त आहे. पहिल्या आचार्यांचें ब्रह्म सद्रूप चिद्रूप, किंवा आनंदरूप मात्र आहे. तर यांचें ब्रह्म सच्चिदानंद रूप असून पुनः तें सत्ताधारी, ज्ञानी व आनंदी आहे. शंकराचार्यांनीं सत्, चित् व अनंत ( किंवा आनंद ) या तिन्ही शब्दांचा अर्थ एकच करून ब्रह्म निर्गुण व एकरूप, आहे असें ठरविलें आहे; तर यांनीं वरील तिन्ही शब्दांचे तीन निरनिराळे रूढ व यौगिक अर्थ कायम ठेवून ( वाच्यार्थ कायम ठेवून ) तीन धर्म असणारा किंबहुना अनेक अथवा अनंत मंगल धर्म असणारा धर्मी परमात्मा आहे, असें ठरविलें आहे. सारांश, यांचें 'ब्रह्म' एक आहे या दृष्टीनें एकरस आहे; पण गुणदृष्टीनें यांच्या ब्रह्मांत एकरसता आहे असें दिसत नाहीं. सामान्यतः बोलावयाचें म्हणजे

शंकराचार्यांस केवलब्रह्म ( The Absolute ) मान्य होतें, व श्रुतीला हेंच ब्रह्म मान्य आहे, असा निर्गुण प्रतिपादक श्रुतींच्या वाक्यांवरून त्यांचा निश्चय झाला होता. निर्गुण बोध करणाऱ्या श्रुतीप्रमाणेंच सगुणप्रतिबोधक श्रतीही पुष्कळ आहेत. वाद असा आहे कीं, निर्गुण श्रुतींच्या अभिप्रायानुसार सगुण श्रतींची व्यवस्था लावावयाची आणि सर्व श्रुतींचा समन्वय 'निर्गुण ब्रह्म-प्रतिपादनपर आहे' असें ठरवावयाचें, किंवा सगुण प्रतिपादक श्रतींच्या अर्थबलानें निर्गुण-बोधक श्रुतींची सगुणपर व्यवस्था लावून सर्व श्रुतींचा समन्वय सगुण ब्रह्माच्या संकीर्तनामध्यें करावयाचा. शंकराचार्यांनीं पहिला पंथ स्वीकारून ब्रह्म हें निर्गुण आणि अंतर्बाह्य एकरस आहे, असा निर्गुण श्रुतींच्या बलानें निश्चय केला. रामानुजाचार्यांनीं दुसऱ्या मार्गाचें अवलंबन केलें, आणि अद्वितीय ब्रह्म सगुण असून तें अनंत कल्याणकारीगुणांना आश्रय देणारें आहे; असें सगुणश्रुतींच्या अथवा गुणव्यंजक श्रुतींच्या आधारानें ठरविलें. याचमुळें शंकराचार्यांच्या पंथांत कर्म व उपासना हीं गौण ठरलीं आणि रामानुजाचार्यांच्या पंथांत ज्ञान आणि उपासना ( यांतच विहितकर्माचा अंतर्भाव होतो ) यांची योग्यता सारखी ठरली. सारांश, 'ब्रह्म एकच आहे' असा उभय आचार्यांचा निश्चय आहे. पण एकाचें ब्रह्म एकरूप व एकरस आहे व दुसऱ्याचें ब्रह्म एक असूनही अनेक कल्याणकारी गुणांनीं संवलित झालें आहे. हा पहिल्या निश्चयासंबंधानें विचार झाला. ह्याचाच परिणाम दुसऱ्या निश्चयावर कसा झाला तें पाहूं. ( २ ) वरतीं सांगितलेंच आहे कीं, शंकराचार्यांचें मत-'जीव आणि ब्रह्म हीं स्वरूपतः एकच आहेत'-असें आहे. रामानुजाचार्यांस हा निश्चय अर्थातच संमत नव्हता. त्यांच्या ब्रह्मामध्यें अनंत धर्मांचें व अनंत धर्मी यांचें स्वरूपतः वास्तव्य असल्यामुळें त्यांच्या ब्रह्मांत अनंत निरनिराळे धर्मी ( चेतन आणि अचेतन वस्तू ) साहजिकपणेंच प्राप्त झाले. 'या सर्वांचीं स्वरूपें भिन्न, गुण भिन्न आणि शरीरेंही भिन्न आहेत. तथापि सर्व जीवांचा संग्रह चिद्वस्तूंत व अचेतन वस्तूंचा संग्रह अचिद्वस्तूंत (जड वस्तूंत ) करून ब्रह्म हें चिदचिद्रूप आहे.' असा ह्या आचार्यांनीं निश्चय केला आहे. ब्रह्मांत असणाऱ्या अनंत जीवांचें व अनंत जड वस्तूंचें बाहेरून व आंतून नियमन करणारें एक मात्र ब्रह्म आहे, असें हे आचार्य म्हणतात; तसेंच जीवांचे जे निरनिराळे अनंत आत्मे आहेत ते सर्व मिळून ब्रह्माचें चिद्रूपी, ज्ञानरूपी, शरीर होतें, व जीवात्म्यांचें नियमन हा परमेश्वराचा मंगलगुणकारी आत्मा करितो. तसेंच, परब्रह्माचें अचिद्रूपी ( जड ) शरीर सर्व जड वस्तूंच्या मूळ स्वरूपानें घटलेलें असतें, म्हणजे जीव आणि जड वस्तु अथवा चेतनाचेतन वस्तु परमेश्वराचें शरीर आहेत आणि या विराट् शरीराचा स्वतंत्र परमात्मा निराळाच आहे. सारांश, जीव, जगत् आणि ब्रह्म हीं वस्तुतः, स्वरूपतः आणि व्यवहारतः एक नसून जीव निराळा, जड निराळें आणि ब्रह्म निराळें, असें रामानुजाचार्यांचें मत आहे. मात्र हे अनंत जीव व अनंत वस्तू मिळून परमेश्वराचें शरीर होतात, व ह्यांचा अंत-

र्यामी नियामक परमात्मा, हा ब्रह्माचा आत्मा होतो. आपण एखादा मनुष्य पाहिला असतां तो एकच आहे असें म्हणतों, व एकाच नांवानें त्याला हांक मारितों. पण त्या मनुष्यामध्येंच शरीर निराळें, आणि बुद्धि-मनासह इंद्रियें निरनिराळीं, प्राण निराळे आणि आत्मा निराळा, असे वास्तविक भेद असतात. त्याप्रमाणेंच परब्रह्म ही एक धर्मी वस्तु असून, सर्व जीव हे त्या वस्तूच्या शरीराचा एक भाग, व जड पदार्थ हे त्या वस्तूच्या शरीराचा दुसरा भाग आणि आत्मा हा तिसरा भाग, असे वास्तविक भेद आहेत; असें या आचार्यांचें मत आहे. अथवा हा त्यांचा ठाम निश्चय आहे. एवंच ह्या दोन्ही आचार्यांस 'एक ब्रह्म आहे' हा सिद्धान्त मान्य होता; पण एकाचें ब्रह्म निर्गुण असल्यामुळें सर्व दिसणारे जड–जीव–पदार्थ परमार्थतः एकरूपच म्हणजे ब्रह्मरूप आहेत असें त्यांनीं (शंकराचार्यांनीं) ठरविलें. आणि रामानुजाचार्यांनीं ब्रह्म सगुण आहे हें गृहीत केल्यामुळें, जीव, जगत् आणि ब्रह्म असे निरनिराळे भाग–प्रभाग दिसतात, तसेच वस्तुतः आहेत; असा त्यांचा निश्चय झाला. दुसऱ्या सिद्धान्ताच्या संबंधानें अशी वस्तुस्थिति आहे असें मला वाटतें. असो; आतां मायेसंबंधानें अथवा शंकराचार्यांच्या तिसऱ्या निश्चयासंबंधानें काय स्थिति आहे, हें यापुढें आपण पाहूं. (३) एकच वस्तु जें ब्रह्म, तें ज्ञानरूप आहे, पण ज्ञानी नाहीं, असा शंकराचार्यांचा अभिप्राय आहे. रामानुजाचार्य म्हणतात कीं, ब्रह्म ज्ञानरूप असून ज्ञानीहि आहे, हें वर सांगितलें. आतां ज्या अर्थी ब्रह्म ज्ञानी आहे, त्याअर्थी अधिक ज्ञान होण्यास ब्रह्माशिवाय कांहीं तरी निराळा विषय पाहिजे. तो विषय म्हणजे हें दिसणारें विश्व आणि या विश्वाला पाहणारा व त्याचा भोग घेणारा जीव होय. याप्रमाणें ब्रह्म ज्ञानी असून नित्य आहे, यास्तव जीव आणि जगत् हे नांवाचे ज्ञानविषयही नित्य आहेत असें झालें. तेव्हां सत्यस्वरूपी ब्रह्माला होणारें जें ज्ञान तेंही सत्यस्वरूप असून त्याचे विषयही सत्यस्वरूप असले पाहिजेत. म्हणजे ब्रह्म खरें, जीव खरा, आणि जगतही खरें, असा सिद्धान्त प्रकट होतो. ब्रह्मात्म्यैक्यवादी शंकराचार्यांना मायेची कल्पना करावी लागते, ती 'जीव-जगत् मिथ्या आहे' असें ते मानतात म्हणून होय. पण रामानुजाचार्यांस ही आवश्यकता नाहीं. कारण यांच्या मतानें हें सत्य जगत् सत्यरूपी परमेश्वरानें सत्य जीवाच्या पापपुण्यजन्य सुखदुःखांच्या उपभोगासाठीं निर्माण केलें आहे. तेव्हां या आचार्यांस मायेची कल्पना घेण्याचें कारणच नव्हतें. वेदान्तामध्यें कांहीं निर्गुण ब्रह्मपर श्रुति आहेत; पण त्यांचा अर्थ नीट केला म्हणजे सगुण ब्रह्म, सगुण जीव व सगुण जगत् यांची व्यवस्था ठीक लागते. 'जगताचें मूळ स्वरूप काय?' असें या आचार्यांस कोणी विचारिलें, तर 'परब्रह्माचें जें अचिदात्मक शरीर आहे, तें जड वस्तूंचें उपादान कारण असून, त्याचा परिणाम हें जगत् आहे,' असें हे आचार्य उत्तर देतात. ब्रह्मामध्यें जो चित्भाग आहे, ज्ञानभाग आहे, तो

जीवांचें आदिकारण होय. या आदिकारणाचा जीव हा परिणाम आहे. तेव्हां परमार्थानें ब्रह्मच जर चिदचिदात्मकांचे ( जड-जीवांचें ) आदिकारण झालें, तर मायेची निरर्थक कल्पना कां मानावी, असें हे आचार्य विचारतात. मायेला श्रुति, स्मृति, आणि इतिहास-पुराणें यांमध्यें कोठेंही आधार नाहीं. आपल्याला शुक्तीचे ठिकाणीं रजताचा आभास होतो, हेंही भ्रांतिज्ञान नसून रजतज्ञान होण्याचे वेळीं 'रजतच पुढें होतें, खरें ज्ञान खऱ्या वस्तूवर झालें, येथें भ्रांतीचा लवलेशही नाहीं,' असें हे आचार्य म्हणतात. याचप्रमाणें स्वप्नांत पाहिलेले पदार्थ आणि अनुभवलेलें सुखदुःख हीं खरींच असतात. स्वप्नांतील पदार्थ जागृतावस्थेमध्यें नसतात व तेथें अनुभवलेलें सुख-दुःखही जागृतावस्थेंमध्यें बाधित होतें, हें खरें; तथापि 'ज्या वेळीं मला स्वप्न पडत होतें, त्यावेळीं माझे स्वप्नगत पदार्थ खरेच असतात आणि मला अनुभवही खराच येतो.' याप्रमाणें मृगजल, दर्पणांतील प्रतिबिंब, इत्यादि कोणत्याहि स्थानीं भ्रांतीचा लवलेशही नसतो. भ्रांति म्हणजे माया. भ्रांति म्हणजे अन्यथाज्ञान. भलतेच ठिकाणीं भलत्याच अर्थाची संभावना करणें यालाच भ्रांति, अन्यथाज्ञान किंवा माया, असें म्हणत असतात. ही भ्रांति किंवा हें अन्यथाज्ञान जीवांच्या अनुभवाला येणें हें यांच्या मतानें केव्हांही शक्य नाहीं. तसेंच या आचार्यांच्या मतानें मायेला प्रमाण नाहीं, व मायेचें कारणही नाहीं. सारांश, ही मायेची कल्पना सर्वथा त्याज्य, उपेक्षणीय आणि गर्हणीय आहे. वर सांगितलेंच आहे कीं, जीवाला जें कांहीं ज्ञान होतें तें सर्वथा खरेंच असतें, असें यांचें मत आहे. ज्ञान होण्याला साधन असणारीं जीं नेत्रश्रवणादि इंद्रियें, मन आणि बुद्धि, हीं सर्व आपापलें नियमित काम बरोबर करीत असलीं म्हणजे तीं अंतर्बाह्य ज्ञानेंद्रियें आपल्यास जगताचें खरें ज्ञान देत असतात. एवंच, मायेचा पक्ष यांना बिलकुल संमत नाहीं. हा तिसऱ्या निश्चयाचा विचार झाला. आतां चौथ्या निश्चयाच्या संबंधानें यांचें काय म्हणणें आहे तें पाहूं.

( ४ ) मानवी जीवानें आपल्या वर्णास आणि आपल्या आश्रमांस योग्य असणारें श्रुति-विहित कर्म केलेंच पाहिजे, असें शंकराचार्यांप्रमाणें यांचेंही मत आहे, हें सांगावयास नको. तसेंच, उभयतांमध्यें दुसरेंही ऐकमत्य हें आहे कीं, निष्काम कर्मांचें अनुष्ठान केलें तरच जीवाला तद्-द्वारा मुक्ति मिळेल. आतां शंकराचार्य असें म्हणतात, कीं जीवन्मुक्त स्थितीमध्यें योगी पुरुषानें श्रुतिविहित कर्म केलें नाहीं, तरी कांहीं प्रत्यवाय नाहीं. कारण जीवन्मुक्तस्थितींत ज्ञानयोग्याचा असा ठाम निश्चय झालेला असतो कीं, 'मीं शरीराहून, इंद्रियांहून, मन-बुद्धींहून निराळा आहें,' सुख-दुःखादिकांचा व माझा कांहींएक संबंध नाहीं, कर्म केलें तरी माझा आत्मा मोठा किंवा लहान होत नाहीं, व कर्म केलें नाहीं तरी त्याच्या स्वरूपांत वालाग्रही फरक पडत नाहीं.' असा त्याचा दृढ निश्चय झाल्यामुळें तो उपासनेसंबंधानें उदासीन होतो. 'आत्मा व ब्रह्म हीं उभयतांही एकच आहेत,' असें ज्ञान-विज्ञान यास झालें असल्यामुळें, हा जीवन्मुक्त पुरुष

कर्माविषयीं व उपासनेविषयीं उदासीन होतो, हें नीटच आहे. पण रामानुजाचार्यांस जीव-ब्रह्मांच्या एकत्वाचें तत्त्व, जीवांच्या कल्याण दृष्टीनें, या आचार्यांस मान्य नसल्यामुळें, अद्वैती जीवन्मुक्तांची स्थितीच त्यांस संमत नाहीं, व या अद्वैती जीवन्मुक्त योग्यांची कर्मविषयक व उपासनाविषयक उदासीनता या आचार्यांच्या प्रकोपास मात्र कारण होते. मागें दिग्दर्शित केल्याप्रमाणें यांचें मत असें आहे कीं, जीव हा अल्प परिमाणाचा असल्यामुळें त्याचें ज्ञान व त्याचें सामर्थ्य हीं फारच संकुचित असतात. म्हणून अल्पज्ञानी व अल्पसामर्थ्याच्या जीवानें सर्वज्ञ, सर्वशक्ति आणि सर्वव्यापी परब्रह्माशीं कोणत्याही प्रकारें बरोबरीचें नातें न लावितां, आराधना व उपासना ही एक निष्ठेनें अखंड केलीच पाहिजे. जीव हा सदा उपासक स्थितीमध्येंच असावयाचा, आणि परमेश्वर हा सदैव उपास्य अथवा सेव्यच असावयाचा. जीवाला आपलें मूळ स्वरूप जर हवें असेल, म्हणजे त्याला जर सरूपता नामक मुक्ति प्राप्त करून घ्यावयाची असेल आणि ही प्राप्त झालेली मुक्ति अखंड ठेवावयाची असेल, तर त्यानें मुमुक्षु स्थितींत व वैकुंठलोकांतील मुक्त स्थितींतही परमेश्वराची उपासना अखंड केलीच पाहिजे. सारांश, जीवाची उपासना कोठेंही व कालत्रयींही चुकत नाहीं. इतकेंच नव्हे, तर तीच कायती जीवाचें कल्याण करणारी माउली आहे. म्हणून जीवानें तिचा केव्हांही परित्याग करूं नये. असा निष्काम कर्मासंबंधानें या दोन्ही आचार्यांत मोठा विरोध आहे. आतां सकाम कर्मासंबंधानें व उपासनेसंबंधानें दोघांच्याही मतांत सुसंवाद आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. उभयतांचेंही म्हणणें असें आहे कीं, सकाम कर्म किंवा सकाम उपासना केली असतां जीवाला संसारस्थिति प्राप्त होऊन, तो जन्ममरणाच्या आणि सुख-दुःखाच्या चक्रांत सांपडतो; पण येथें एक गोष्ट सांगितली पाहिजे कीं, रामानुजांस जीव हा नित्य म्हणजे अमर आहे असें वाटतें; व शंकराचार्यांस वाटतें कीं, पूर्ण ज्ञान-विज्ञान यथाविधि होऊन ब्रह्म-साक्षात्कार झाला म्हणजे जीवाची जीव-स्थिति नाहींशी होऊन त्याला ब्रह्मस्थिति प्राप्त होते; म्हणजे जीवाला ब्रह्मरूप प्राप्त झाल्यावर त्याचें जीवत्व नष्ट होतें. तथापि जावत्कालपर्यंत जीवस्थिति आहे, तावत्कालपर्यंत त्याच्या जीवत्वाला मरण नाहीं. म्हणून तो सकाम कर्म करील तर तो आपल्याला भवसागरांत व जन्ममरणांत लोटून देणाराच होतो. रामानुजाचार्यांचेंही हेंच म्हणणें आहे. सारांश, दोघांसही सकाम कर्म निंद्य वाटत असल्यामुळें, अहं-ममतादि दोष सकाम कर्माच्या अनुष्ठानानें उत्पन्न होतात हें उभयतांसही मान्य आहे. असो; याप्रमाणें निष्काम कर्मांचें अनुष्ठान केलें असतां मुक्ति मिळते, आणि सकाम कर्माचेंच व्रत अंगीकृत केलें, तर जीवाला भवसागरांत पडावें लागतें, हें तत्त्व उभयतांसही मान्य आहे.

## ( ३ ) श्रीमन्मध्वाचार्य–सिद्धान्त–दिग्दर्शन.

या नंतर श्रीमद्मध्वाचार्य यांचे विचार पूर्वोक्त चार प्रश्नांसंबंधानें काय आहेत, हें आतां पहावयाचें. हेही आचार्य महा-विद्वान् व महत्-सात्विक शीलाचे होते. यांचें लिहिणें थोडकेंच, परंतु मुद्देशीर आणि विशेष जोरदार असतें. हे उपासनेचे कट्टे भक्त होते. हे आचार्य रामानुजानंतर शें दोनशें वर्षांनीं झाले असावे, म्हणजे तेराव्या किंवा चौदाव्या शतकांत यांचा अवतार झाला असें म्हणतात. यांनीं शुद्ध द्वैतमताची संस्थापना केली. शंकराचार्य किंवा रामानुजाचार्य यांनीं आपल्या मताचा भार प्रायः श्रुतीवरच घातला होता. पण तसेंच केवळ न करितां या आचार्यांनीं आपलें मत सिद्ध करण्यासाठीं व ह्याला गौरव आणण्यासाठीं श्रुतिस्मृतिप्रमाणेंच इतिहासपुराणांचेंही साहाय्य घेतलें आहे. पुराण ग्रंथ सर्व-सुलभ आहेत. असो; यांचा पंथ उत्तर कर्नाटकामध्यें म्हणजे बेळगांव, धारवाड, विजापुर, म्हैसूर इत्यादि प्रांतांत प्रसिद्ध आहे. आतां आपल्या चार प्रश्नांच्या संबंधानें यांचीं उत्तरें कशीं येतात तें आपण पाहूं. ( १ ) पहिला विचार ब्रह्मरूपाच्या संबंधाचा होय. यांच्या मताप्रमाणें या सृष्टीमध्यें किंवा विश्वामध्यें एक-पणा मुळींच नसून सर्वत्र द्वैताचें साम्राज्य आहे. ब्रह्म आणि जीव परस्पर-भिन्न आहेत. जीव–जगतांत भेद आहे. जगत्–परमेश्वरांत भेद आहे. जीवजीवांमध्येंही भेद आहे. असे अनेक भेद नित्य आहेत व असणार, असें या आचार्यांनीं न्यायाच्या, इतिहास–पुराणांच्या आणि आपल्या अपूर्व विद्वत्तेच्या साहाय्यानें सिद्ध केलें आहे. यांना एकत्व कोठेंच दिसत नाहीं. म्हणून यांस शुद्धद्वैती म्हणतात. यांचा परमेश्वर श्रीविष्णु होय. हा अनंतगुण-संपन्न आहे, आणि यांचें साम्राज्य सर्वत्र आहे. तेहतीस कोटी देव याचीच सेवा करितात. ह्या अनंत कोटि ब्रह्माण्डनायकानें हें जगत् आपल्या स्वतःच्या संकल्पानें व कर्तृत्वानें नित्य व स्वयंभू प्रकृतीपासून क्रीडासुखासाठीं उत्पन्न केलें, आणि ह्या आपण उत्पन्न केलेल्या विश्वांत नित्य व स्वयंभू जीवांनीं पूर्वसंचित व प्रारब्ध स्वकर्मानुसार सुख-दुःखें भोगावीं, अशी व्यवस्था केली. परमेश्वर हा सर्वांचें निमित्तकारण मात्र आहे. तात्पर्य, परब्रह्म म्हणजे विष्णु निराळा, जीव निराळे, आणि जगत् निराळें, असें पहिल्या प्रश्ना संबंधानें या आचार्यांचें उत्तर आहे. ( २ ) या नंतर जीव ब्रह्माच्या संबंधानें फारसें विवेचन करावयास नकोच आहे. जीव हा नित्य सेवक आणि विष्णु नित्य सेव्य असा उभयतांमध्यें नित्य संबंध आहे, हें पूर्वोक्त श्रीविष्णूच्या स्वरूपावरून सिद्धच झालें आहे. परमेश्वर सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वशक्ति इत्यादि गुणांनीं युक्त आहे, आणि जीव हा अणु, अल्पज्ञ, अल्प सामर्थ्याचा इत्यादि गुणांनीं युक्त आहे. अर्थातच उभयतांमध्यें केव्हांही, तादात्म्य, एकात्मता उत्पन्न होणें शक्यच नाहीं. उलट, श्रीविष्णूनें जीवांस व जगतांस प्रस्तुतची स्थिति दिली अस-

त्यामुळें तो ह्यांचा स्वामी, नियन्ता, माता, पिता, असा होतो. जीव आणि विष्णु यांच्या मध्यें दक्षिण आणि उत्तर ध्रुवांइतका भिन्नस्वरूपभाव आहे. उभयतांचें स्वरूप एक नाहीं, गुण एक नाहींत, आणि कर्महीं एकरूप नाहीं. तात्पर्य, सर्वत्र शुद्ध द्वैतभाव आहे. ( ३ ) असें आहे म्हणून एकात्मता प्रस्थापित करण्यास साहाय्यभूत होणाऱ्या शंकराचार्यकृत मायेची कल्पना तर या आचार्यांस सर्वात्मना संमत नाहीं, हेंही नीटच आहे. निर्गुण श्रुतींनीं प्रतिपादिलेलें अद्वितीय ब्रह्म सिद्ध करण्यासाठीं शंकराचार्यांनीं गृहीत केलेल्या मायेचा या आचार्यांनीं ( श्रीमन्मध्वाचार्यांनीं ) विरोध करावा व सगुण ब्रह्म-प्रतिपादक श्रुतींस व इतिहासपुराणांस मात्र प्रमाण मानून निर्गुण श्रुतींचा सगुण ब्रह्मपर अर्थ या शुद्धद्वैतमतप्रतिपादक आचार्यांनीं करावा, हें सर्व सुसंगतच आहे. येथील सर्व वस्तू सत्य आहेत, जीव नित्य आणि सत्य आहे, हा यांचा ठाम निश्चय होता, व त्यांच्या परंपरेंतील वैष्णवांचा आहेही. सर्वच विश्व सत्यमय आहे, म्हणून सत्य जीवांस होणारें सत्य विषयांचें ज्ञानही सत्यच असलें पाहिजे, असा निश्चय एकदां गृहीत केला—आणि आपण संसारी जीवही आपल्या अनुभवांत सत्य ज्ञानाचाच स्वीकार नेहमीं करीत असतो—म्हणजे मायेचा किंवा अज्ञानाचा स्वीकार करण्याचें कारणच उरत नाहीं. विषयज्ञान उत्पन्न होतें व नाहींसें होतें हा आपल्यास नित्य येणारा अनुभवच खरा आहे असें धरिलें, म्हणजे मायेचा स्वीकार करण्याची आवश्यकता राहत नाहीं. शंकराचार्यांच्या मतें ब्रह्मरूप ज्ञान किंवा ज्ञानरूप ब्रह्म हेंच एक नित्य आहे. याला येणें जाणें नाहीं, किंवा जन्ममरणही नाहीं. अर्थातच त्रिकालीं नित्य असणारें ज्ञान मात्र सत्य असलें पाहिजे, असा ह्यांचा ठाम निश्चय होता. बाह्य किंवा आत्मेतर विषयांपासून उत्पन्न होणाऱ्या व विषय नाहींसे झाले म्हणजे नाहींसें होणाऱ्या आणि इंद्रियादि बाह्य व जड इंद्रियांच्या द्वारानें प्राप्त होणाऱ्या ज्ञानाच्या खरेपणाविषयीं त्यांस तीव्र संशय उत्पन्न झाला, आणि ( त्यांच्या मतानें वेदांत सुचविल्याप्रमाणें ) त्यांनीं मायेचा स्वीकार करून आत्मज्ञानाची व विषयज्ञानाची व्यवस्था केली. इतर आचार्यांस कोणत्याही 'सत्' द्वारानें प्राप्त झालेल्या ज्ञानाचा खरेपणा निश्चितच आहे, असें वाटल्यावरून श्रुतीमध्यें जिचा फारसा उल्लेख झाला नाहीं, त्या मायेचा या आचार्यांनीं जगावर उपकार करण्याच्या हेतूनें तिरस्कार केला, हेंही सुसंगतच झालें. श्रीमद्मध्वाचार्य तर याही टप्प्याच्यापुढें जाऊन असें म्हणत असत कीं, या मायेची उत्पत्ति केवळ लोकांना मोह घालण्यासाठीं व अनार्य अशा बुद्ध जैनादि धर्मांमध्यें आर्यांस ओढून नेण्यासाठीं झाली आहे! असो; मायावाद यांना सर्वथा कबूल नव्हता, एवढें समजलें म्हणजे आपलें काम झालें. याप्रमाणें तिसऱ्या प्रश्नाचा विचार झाला.

(४) आतां कर्मासंबंधानें या आचार्यांचें मत पाहून हा श्रीमद्मध्वाचार्यविषयक विचार आटपावयाचा. निष्कामकर्म पूर्वोक्त दोन्ही आचार्यांप्रमाणें याही आचार्यांस मान्य आहे, व सकाम कर्मासंबंधानें हे आपला तिरस्कार पूर्वोक्त आचार्यांइतक्याच तीव्रतेनें प्रकट करीत असत. पण शंकराचार्यांनीं केलेली स्वकर्मांची निंदा व उपासनेची उपेक्षा हीं या आचार्यांस मुळींच संमत झालीं नाहींत. नीटच आहे कीं, जेथें श्रीविष्णु व जीव यांमध्यें भेद निश्चित केल्यानंतर (सेव्य-सेवक किंवा उपास्य-उपासकसंबंध नित्य असावयाचा, हें मत प्रस्थापित केल्यावर) परमेश्वरार्पण बुद्धीनें केलेल्या कर्मांची निंदा व एकनिष्ठ उपासनेची उपेक्षा यांस सहनच झाली नाहीं. श्रुतिविहित कर्म केलें तरच ईशप्रसादानें आत्मज्ञान-विज्ञानाचा पूर्ण लाभ होऊन मुक्ति मिळेल, असा यांचा दृढ निश्चय होता; व याच मार्गानें जगताचें परम कल्याण होईल, अशी यांची दृढश्रद्धा होती. या आचार्यांनीं सर्व काळीं व सर्व स्थळीं मोठ्या आग्रहानें व मोठ्या कळकळीनें भक्तीचा उपदेश केला आहे. यांनीं भक्तीचें माहात्म्य इतकें वाढविलें कीं, श्रौत कर्मास व श्रौतज्ञानासही ह्या भक्तिप्रेमानें व ईश्वरीनिष्ठेनें किंचित् कमीपणा येईल अशी भीति वाटूं लागली. शिवाय (अ) श्रीविष्णूसच यांनीं परम दैवत मानिल्यामुळें (आ) शंकराचार्य हे शंकराचे अवतार आहेत असें शंकरभक्त मानीत होते म्हणून, आणि (इ) विष्णु व शंकर यांचे सारखेच उपासक समाजामध्यें होते म्हणून, या आचार्यांनीं नव्हे; पण-यांच्या शिष्यपरंपरेनें-शंकरदेवतेची विलक्षण अवहेलना केली. इचा परिणाम शंकरभक्तांनीं विष्णूची अवहेलना करण्यामध्यें झाला. सारांश, भक्तीमध्यें व भक्तीपासून उत्पन्न होणाऱ्या ज्ञानामध्यें भक्तांचा जो काळ जावयाचा व बुद्धीचा विनियोग व्हावयाचा त्याला भलतेंच वळण लागून समाजामध्यें परस्पर-कलह, द्वेषोत्पादक वाद, यादवी, इत्यादि निंद्य प्रकार सुरू होऊन समाजाचा धार्मिक एकपणा होता त्याचा विध्वंस झाला. हें थोडेंसें मीं विषयान्तर केलें आहे, पण तें इतक्या साठींच केलें आहे कीं, भक्तीचा महिमा व विशेषतः विशिष्ट भक्तीचा महिमा, योग्य प्रमाणापेक्षां जास्त वाढल्यास श्रौतस्मार्त कर्म आणि वेदान्त ज्ञान यांची पायमल्ली विशिष्ट मताच्या अन्धश्रद्धेनें कशी होते व समाजाचें स्थैर्य कसें मोडतें, हें लक्षांत यावें. असो; आनंदाची गोष्ट ही आहे कीं, निष्काम कर्मासंबंधानें व सकामकर्मासंबंधानें या व इतर आचार्यांत मतैक्यच आहे; म्हणजे निष्काम कर्मानें मुक्तिमार्ग सुकर होतो, व सकामकर्म आणि उपासना संसार दृढ करितात, हें वरील तिन्हीं आचार्य एककंठानें व एकमतानेंच सांगतात.

## श्रीमद्वल्लभाचार्य-सिद्धान्त-दिग्दर्शन.

आतां अगदीं अलीकडे, म्हणजे सोळाव्या शतकाच्या आगें मागें अवतीर्ण झालेले श्रीमद्वल्लभाचार्य यांचा शुद्धाद्वैत नामक पंथ कसा आहे, हें थोडक्यांत

पहावयाचें. हे आचार्य महा अधिकारी असून जाडे विद्वानही होते. यांची भाषासरणी बरीच स्वच्छ व पाणोदार आहे. विरोधी मतांचा तीव्र उपहास कसा करावा, विरोधी मताला प्रतिबंदी कशी द्यावी, आपला पक्ष विद्वत्तेच्या बळावर कसा सजवावा, इत्यादि गोष्टी या आचार्यांपासूनच कित्येक महा पंडितांनीं शिकल्या पाहिजेत. यांनीं ब्रह्मसूत्रांवर व श्रीमद्भगवद्गीतेवर विस्तृत भाष्यें केलीं आहेत. हीं भाष्यें प्रसिद्ध आहेत; पण उपनिषदांवर यांचें अथवा यांच्या एखाद्या शिष्याचें भाष्य मला पहावयास मिळालें नाहीं, म्हणून वाईट वाटतें. काय चमत्कार असेल तो असो; पण वस्तुस्थिति ही आहे कीं, एक श्रीमच्छंकराचार्यांशिवाय इतर स्वतंत्र पंथ-प्रस्थापक आचार्यांनीं उपनिषदांवर स्वतंत्र व सविस्तर भाष्यें स्वतः लिहिलीं आहेत असें मला वाटत नाहीं. श्रीमद्-रामानुजाचार्यांच्या भाष्यांची व श्रीमद्वल्लभाचार्यशिष्यांच्या अनुपलब्ध उपनिषद्-भाष्यांची तर प्रसिद्धिच नाहीं, आणि श्रीमद्मध्वाचार्यांच्या अल्प विस्तृत भाष्यानें त्यांचें मत जितकें उद्घाटित व्हावें तितकें होत नाहीं. बाकी श्रीमज्जयतीर्थांनीं श्रीमन्मध्वाचार्यांच्या मताचा उत्तम ऊहापोह केला आहे, ही महल्लाभाची गोष्ट आहे. एवंच उपनिषदें हा जो मुख्य श्रुतिप्रणीत ग्रंथ, ज्याच्या पासून ब्रह्म-सूत्रांची व श्रीमद्भगवद्गीतेची अवतार-कथा उत्पन्न होऊन संसारी जीवाच्या भवविमोचनाला ती कारण झाली, त्या उपनिषद्रूपी माउलीच्या संबंधानें वरील तिघांही आचार्यांनीं साक्षात् नव्हे, पण परोक्षतः तरी, मौनच कां स्वीकारावें, हें निदान मला तरी नीटसें समजत नाहीं. असो; ह्या आचार्यांचें मत सौवीर, सौराष्ट्र इत्यादि प्रांतांत चांगलें प्रसिद्ध आहे. असो; ( १ ) श्रीमद्वल्लभाचार्यांना ब्रह्माचें एकत्व पूर्णपणें संमत होतें. त्यांनीं शंकराचार्यांच्याही पुढें जाऊन असें प्रतिपादिलें आहे कीं, सर्वत्र शुद्ध आणि निर्भेळ ब्रह्मच कायतें अस्तित्वांत आहे. तें पूर्ण स्वरूप असून निर्विकार व सविकारही आहे! सर्व विरोधात्मक गुणधर्म ब्रह्मामध्यें सामाऊन जातात. म्हणजे तें निर्गुण असून सगुण आहे, सर्वालिप्त असून भोग भोगणारें आहे, स्थिर असून चंचल आहे, कांहींही न करितां सर्वकर्तृ आहे, इत्यादि अनेक प्रकारांनीं ब्रह्मामधील विरोधी गुणांची एकवाक्यता या आचार्यांनीं कोठें चातुर्यानें, कोठें विद्वत्तेच्या जोरावर, कोठें आपल्या अधिकाराच्या जोरावर आणि कोठें शुद्ध विधान मात्र करून केली आहे. 'जसें दिसतें तसेंच आहे व जसें आहे तसेंच दिसतें; आणि असतें व दिसतें यांत विरोध नसून तें सर्वच ब्रह्म आहे,' हा यांच्या मताचा परिपाक आहे. 'दिसतें तीं माया, व आहे तें ब्रह्म,' हा शंकराचार्यांचा पक्ष आहे. श्रीमद्वल्लभाचार्यांचा मुख्य कटाक्ष होतां होईल तोंपर्यंत मायापक्षाचें खंडन करावें हा होता व आहे. त्यांनीं शंकराचार्यांच्या ब्रह्मास 'मायोपाधिक ब्रह्म' असें नांव देऊन आपल्या मतास शुद्ध म्हणजे मायाशून्य अद्वैत असें गोडसें नांव घेतलें आहे. ( २ ) वरील संक्षिप्त वर्णना-

वरूनही असें समजून येईल कीं, यांच्या मतानें जीव, जगत् आणि ब्रह्म हीं वास्तविक रीतीनें सर्व एकच आहेत. ब्रह्माचा आविर्भाव म्हणजे जीव आणि जगत् होत; पण हा आविर्भाव होत असतां ब्रह्मस्वरूपास यत्किंचितही विकार होत नाहीं. जीव आणि जगत् यांचें विरोधान झालें, जीव आणि जगत् अंतर्धान पावलीं, म्हणजे ब्रह्मस्वरूप मात्र शिल्लक राहतें. सुवर्ण आणि सुवर्णाचे अलंकार यांमध्यें जसा स्वरूपभेद मुळींच असत नाहीं व दिसत नाहीं, त्याप्रमाणेंच ब्रह्माचे जीव आणि जगत् हे अलंकार असून यांच्या आविर्भावानें ब्रह्मामध्यें कोणत्याही प्रकाचा भेद उत्पन्न होत नाहीं. ( ३ ) अर्थातच आतां हें सांगावयास नको आहे कीं, या मतामध्यें मायेला अवसर मिळतच नाहीं. असो; ( ४ ) जीवाचें मुख्य कर्तव्य म्हटलें म्हणजे ब्रह्माची ( श्रीकृष्णाची ) अखंड उपासना करणें हें होय. श्रीमद्वल्लभाचार्यांनीं भक्तिपंथाचा अतिरेक केला आहे. यांनीं " पुष्टिमार्ग " नामक एका अपूर्व पंथाची स्थापना करून सर्वत्र भक्तिपंथाचा प्रमाणापेक्षां अधिक जोरानें विस्तार केला आहे. यांच्याही पंथांत श्रौत व स्मार्त कर्मांचें व वेदान्त ज्ञानाचें बीज योग्य प्रमाणांनीं वाढलें असें मला म्हणतां येत नाहीं. इतर आचार्यांप्रमाणें यांसही सकाम कर्मांचा व सकाम उपासनेचा अत्यंत तिटकारा होता. या भक्त्यैकनिष्ठ आचार्यांनीं किंवा त्यांच्या शिष्यांनीं 'उपनिषदांवर' भाष्यें केलीं असतील, पण मला तीं उपलब्ध झालीं नाहींत, म्हणून माझा निरुपाय झाला आहे. मात्र हे एक मोठे आचार्य म्हणून यांच्या मताचें दिग्दर्शन विचारमीमांसेसाठीं केलें आहे.

## श्रीदयानंदस्वामींच्या सिद्धान्तांचें दिग्दर्शन.

श्रीमद्दयानंदस्वामी हे अलौकिक बुद्धीच महात्मे होते. यांचा जन्म एकोणिसाव्या शतकांत झाला. हे थोर स्वामी वेदशास्त्रसंपन्न असून यांची व्याकरण-कुशलता व व्युत्पत्तिप्रतिभा केवळ अपूर्व व अलौकिक होत्या. जगत्कल्याणा-विषयींची यांची तत्परता सर्व-प्रसिद्ध आहे. हे वेदाचे खरे अभिमानी असून, सर्व प्रमाणांत श्रुतिप्रमाण बलवत्तर आहे, असें म्हणत असत. यज्ञयागादि श्रुतिविहित कर्मं यांस इष्ट असत, पण यज्ञांतील हिंसा मात्र यांस बिलकुल संमत नसे. जातिभेद, मूर्तिपूजा, इत्यादि प्रकार वैदिक नाहींत, हे अलीकडील प्रचार वेदमान्य नाहींत, असें सिद्ध करण्याचा यांनीं बराच यशस्वी प्रयत्न केला. अनार्याला धर्मानें आर्य होतां येईल, असें यांचें म्हणणें असे. हे द्वैतवादी म्हणजे परमेश्वर हा सेव्य आणि जीव हा सेवक ( उपासक ) हा उभयतांमध्यें संबंध असून, आपल्यास दृग्गोचर होणारी जगन्माला सत्य आहे, असें हे स्वामीजी प्रतिपादन करीत. रजपुतस्थान, पंजाब इत्यादि प्रांतांत यांचें 'आर्यमत' व यांनीं स्थापिलेले 'आर्यसमाज' मोठ्या प्रबलातमूलक चैत-

न्याचे अंशभागी आहे. या स्वामीजींनीं विद्येस प्रोत्साहन दिलें, व अखिल ज्ञानभांडार वेदांमध्यें सांठवून ठेविलें आहे, तें शोधपूर्वक संपादन करण्याचा जिवंत उपदेश केला. असो; पूर्वोक्त चार प्रश्नांसंबंधानें (१) जगत्, जीव व परमेश्वर ह्या तीन निराळ्या वस्तु आहेत, ह्या सर्व सत्य आहेत, ज्ञान-मर्यादा वेदाच्या साहाय्यानें वाढवून मनुष्यानें प्रकृतीचा स्वामी व्हावें, ज्ञान-मर्यादा संकुचित न होतां विस्तृत होईल, व सात्त्विक शील वाढेल, असे मात्र उपभोग परमेश्वराच्या साक्षित्वानें घ्यावे, सर्व जीवांस सारखें लेखावें, अशा प्रकारें या आचार्यांचा सर्वमान्य साधनमार्ग आहे. रामानुजाचार्य किंवा मध्वाचार्य याप्रमाणें हे उपासकपंथाचे आहेत. शंकराचार्यांचा जीवन्मुक्त जर ज्ञानैकप्रधान असतो, तर यांचा मुक्त, ज्ञान व उपासना यांनीं युक्त असतो. (२) मायेचा संबंध या आचार्यांस मुळींच संमत नाहीं. (३) परमेश्वर व जीव यांत उपास्य-उपासक संबंध आहे. (४) कर्म आणि उपासना यांचा ज्ञानाशीं संयोग झाला व परमेश्वरी-स्वरूप समजलें म्हणजे जीव मुक्त होतो. मुक्त जीव हा जीवस्थितींत प्रलयकालपर्यंत असतो. प्रलय झाला म्हणजे मुक्त जीवांचें नित्यत्व संपतें. 'न स पुनरावर्तते' इत्यादि वाक्यें प्रलयसापेक्ष म्हणजे या मन्वंतरापुरतींच आहेत.

सामान्यतः या स्वामीजींचे तत्त्वज्ञानविषयक विचार उपासनापंथी आचार्यांप्रमाणें असल्यामुळें यांच्या मताचें विशदीकरण सूत्ररूपानें केलें आहे. या मताचा विशेष विस्तार केनोपनिषदाचे वेळीं करावयाचा आहे, असो.

## मतवैचित्र्य व मतैक्यता.

याप्रमाणें भारतीय वेदांत-पंथप्रवर्तकांपैकीं मुख्य आचार्यांचा इतिहास सांगून त्यांच्या मतांचें स्वरूपवर्णन जितकें मला अवश्य वाटलें, तितकें वर केलें आहे. शंकराचार्य "केवलाद्वैती" ज्ञानमार्गाचे पुरस्कर्ते, मायेचे उपस्थापक आणि चित्तशोधनासाठीं कर्मोपासनांचें ग्रहण करणारे आहेत. श्रीमद्रामानुजाचार्यांनीं "विशिष्टाद्वैताची" प्रस्थापना केली; यांस वेदांतज्ञानाप्रमाणेंच कर्मोपासनांचा अभिमान आहे. ज्ञानाइतकीच कर्मोपासनांची महती आहे व ज्ञानाप्रमाणें व ज्ञानाबरोबर कर्मोपासनांचें अनुष्ठान नित्य चाललें पाहिजे, असें हे आचार्य म्हणतात. हे मायाविरोधी आणि भक्तिप्रतिपादक आहेत. श्रीमद्मध्वाचार्य आपल्यास "शुद्धद्वैती" म्हणवितात. या आचार्यांनीं भक्तीचें माहात्म्य विशेष वाढवून जीवानें नित्य सेवा करावी असें ठरविलें. हे मायेचे कट्टे विरोधी आहेत. अद्वैती श्रीमद्वल्लभाचार्य हे मायेचा सर्वथा विरोध करितात म्हणून यांस शुद्धाद्वैती असें म्हणतात. यांनीं भक्तीचा अतिरेक केला आहे. यांच्याही मतांत जीव नित्य सेवक असावा, असें आहे. श्रीमन्माध्व व श्रीमद्वल्लभ यांच्या मतप्रभावामुळें ज्ञानमार्ग कांहीं थोडा संकुचित झाला असें मला वाटतें. श्रीदयानंदस्वामी आर्यधर्माचे पुरस्कर्ते, कर्मोपासना-संवलित ज्ञानमार्गाचा अवलंब करितात.

जीव-जगताचें स्पष्टीकरण करण्यासाठीं शंकराचार्यांनीं " विवर्त वादाचा " अंगीकार केला आहे, व असतें तसें दिसत कां नाहीं, याचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. श्रीमद्रामानुजाचार्यांनीं "परिणामवादाचा" अंगीकार करून जीव आणि जगत ब्रह्माचे [ दुधाचें दही होतें त्याचप्रमाणें ] परिणाम आहेत असें सांगितलें आहे. श्रीमद्मध्वाचार्यांनीं "आरंभवादाचा" स्वीकार केला आहे व ते 'ब्रह्मानें जीव-जगतादि उत्पन्न केलें' असें म्हणतात. श्रीमद्वल्लभाचार्य हे परिणामवादाचाच स्वीकार करितात, पण त्यांच्या मतें ब्रह्मस्वरूपामध्यें या परिणामानें यत्किंचितही भिन्नता उत्पन्न होत नाहीं. सुवर्णाचे अलंकार केले, तरी सुवर्ण स्वरूपांत अंतर होत नाहीं, व सुवर्णाला विकारही होत नाहीं.

याप्रमाणें शंकराचार्य हे मायावादी, तर इतर सर्व आचार्य मायाविरोधी आहेत. शंकराचार्यांनीं ज्ञानमार्गाला श्रेष्ठ ठरविलें, रामानुजाचार्यांनीं ज्ञान आणि भक्ति यांची योग्यता एकच ठरविली, तर बाकीच्या दोघा आचार्यांनीं भक्तीचें महात्म्य विशेष वाढविलें. श्रीस्वामीजी कर्मउपासना व ज्ञान या सर्वांचें माहात्म्य वाढवितात.

पण सर्व आचार्यांस कांहीं विशेष गोष्टी सर्वथा मान्य आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. ( १ ) सर्वांस वेद प्रमाण आहेत. वेदवाक्यांवर सर्वांचीच सारखी श्रद्धा आहे. वेदप्रमाणापुढें प्रत्यक्ष, अनुमान, इत्यादि प्रमाणें फिकीं पडतात, हें सर्वांस संमत आहे. (२) सर्वांच्या मतें ब्रह्म हें सर्व-कारण आहे, असें ठरतें. शंकराचार्य " विवर्तकारण " म्हणतील, रामानुज व वल्लभ उपादान व निमित्त कारण ब्रह्म आहे, असें म्हणतील, मध्वाचार्य 'निमित्त कारण' म्हणतील, असा विसंवाद ( मतवैचित्र्य ) आहे; पण ब्रह्म–कारणत्वासंबंधानें सर्वत्र सुसंवादच आहे. (३) जीव अमर आहे, हा सिद्धान्त सर्व वादी–प्रतिवाद्यांस कबूल आहे. जीव–स्थितींत जीवाला मरण नाहीं, असें शंकराचार्य म्हणतात; तर जीव हा सर्वदां जीव–स्थितींतच राहून अमर असतो, असें बाकीचे आचार्य म्हणतात. (४) जीव–स्थितींत जीवानें श्रुतिविहित कर्म आणि उपासना केलीच पाहिजे, असें शंकराचार्य म्हणतात; तर जीवानें जीवस्थितीप्रमाणें दुसऱ्या कोणत्याही स्थितींत कर्म आणि उपासना अखंड केलीच पाहिजे, असें श्रीस्वामीजीसह इतर आचार्य म्हणतात.

## विभिन्नमतांची मंगलकारिता.

अशा प्रकारें या तत्त्वप्रपंचकांत संप्रतिपत्ति ( एकवाक्यता ) व विप्रतिपत्ति ( विरोध ) कसे आहेत, यांचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें. उपनिषदांवर ज्या ज्या भाष्यांचें मीं अवतरण करणार आहे, त्यांच्या समजुतीसाठीं वरील अवश्य दिग्दर्शन पुरेसें आहे, असें मला वाटतें.

## आक्षेप–कथन.

वेदान्ताच्या अभ्यासानें 'विहितकर्मांच्या अनुष्ठानाला प्रत्यवाय उत्पन्न झाला' असें जुने कर्मठ म्हणत असत, व नवे पाश्चात्य व कर्मोत्साही तरुण पौरस्त्य म्हण-

तात. तसेंच वेदांतांतर्गत निवृत्ति-पंथानें विश्वज्ञानावर विरजण पडल्यामुळें आमचा समाज मागें राहिला व हीन दीन झाला, असें अर्वाचीन ज्ञानाभिमानी विद्वान् म्हणतात. शेवटीं, अद्वैतवेदांत भक्तीच्या ' मुळावर ' आला, भक्तीचा वृक्ष या वेदांताभ्यास–जड वेदांत्यांनीं ठार सुकविला, असाही आधुनिक भक्ति–सुधारकांचा आक्षेप आहे. हा वाद फारच मोठा आहे व याचें सांगोपांग विवेचन करण्यास स्थलावकाश ही फार लागणार ! तेव्हां वरील आक्षेपांचा विचार करण्याचें काम भविष्यकालावर ठेवून आतां फक्त राजा जनक, राजा रामचंद्र, पंडुकुमार अर्जुन, शंकराचार्य, ज्ञानेश्वर, तुकारामप्रमुख पट्टीचे वेदान्तीही जगत्कल्याण करणारे महात्मे होते, एवढाच निर्देश करितों; व जागोजाग पूर्वोक्त आक्षेपांचा विचार यथामति करून वादाचा निकाल माझ्या समजुतीप्रमाणें यथास्थित करीन असें आश्वासन देतों.

असो; आतां मी उल्लेखिलेल्या पांच मतांपैकीं कोणतें मत ग्राह्य आहे, कोणतें मत श्रुतीच्या, युक्तीच्या आणि अनुभवाच्या कसोटीला कितपत उतरतें, कोणत्या मताचा स्वीकार केला असतां जीवाचें परमकल्याण होईल आणि कोणतें मत व्यवहारालाही सुखमय करून सोडील, हें सांगण्याचा अधिकार मी आपल्याकडे घेत नाहीं. हा प्रश्न ज्याचा त्यानेंच सोडवावयाचा आहे. तथापि एवढेंच सांगणें मला इष्ट वाटतें कीं, ज्या आत्मिक स्थितींत जीव असेल त्या जीवाला आपल्या कल्याणास योग्य असा मार्ग वरील पांचही पंथांतून निवडून काढितां येईल. कारण केवलाद्वैतसिद्धांत सर्वतः खरे आहेत, असा जरी कोणत्याही विचारी पुरुषाप्रमाणें सर्व श्रीमदाचार्योंचा निश्चय होता, तथापि अद्वैत-सिद्धांताचें साम्राज्य झालें असतां अनधिकारी लोक उन्मत्त व उन्मार्गगामी होतील, असें वाटून मात्र बाकींच्या चार आचार्यांनीं लोककल्याणास्तव कर्मोपासनांचा गौरव करून अज्ञानीं जीवाचे कल्याणाचा मार्ग–या अलौकिक महापुरुषांनीं–दयार्द्र अंतःकरणानें सांगितला आहे, असें मला वाटतें. पुनः; वास्तविक पाहिलें असतां सर्वच मार्ग कल्याण करणारे म्हणजे ब्रह्मस्थितीकडे नेणारे आहेत. यद्वाः–जोंपर्यंत अहंममता ( अभिमान आणि वासना ) जिवंत आहेत, तोंपर्यंत आणि त्यांच्या आत्यंतिक निरासासाठीं, श्रुतिविहित आणि शास्त्रोक्त कर्म करून आपलें चित्त ( मन, ज्ञान देणारी बुद्धि, वासना देणारी बुद्धि, आणि अहंकार ) निर्मळ केलें पाहिजे. ज्या योगानें देहाभिमान नाहींसा होईल, आणि कुटुंब-अभिमान प्रेमपूर्वक वाढेल, कुटुंबाभिमानाची वाढ जात्यभिमानांत होऊन तेथें प्रेम अवतीर्ण होईल, हा ही वृद्धिंगत होऊन बंधुप्रेमपूर्वक राष्ट्राभिमान वाढेल, व या शेवटच्याचाही विस्तार होऊन प्रेमबद्ध अभिमानाचा सप्रेम विश्वाभिमान आणि सर्व भूताभिमान वाढेल, व शेवटीं अभिमानाचाही अभिमान सर्वथा आत्मरूप होऊन प्रेमाचा पूर्ण अवतार करील, असें कोणतेंही कर्म (आपल्या किंवा इतर प्रामाणिक शास्त्रांनीं सांगितलें असेल तें कर्म ) अधिकारानुसार स्वीकार्य आहे, अशी माझी

समजूत आहे. अभिमानाचा नाश करणें व आपलें व इतरांचें सामर्थ्य वाढवून म्हणजे शील व योग्यता सुधारून तो अभिमान नाहींसा करणें, हा मुख्य मुद्दा आहे. पुनः; हा व्यक्ति–अभिमान, कुटुंबाभिमान, इत्यादि नाहींसें करण्याला आपल्या ' मा बाप ' परमेश्वराच्या भक्तीची जोड हेंच उत्तमोत्तम साधन आहे. भक्ति म्हणजे पूज्य भावानें केलेलें सेवा–प्रेम होय. अभिमान द्वेषमूलक आहे तर भक्तीचें अधिष्ठान व जीवनामृत, प्रेम हें आहे. यास्तव भक्तीचा स्वीकार आपापल्या अधिकाराप्रमाणें प्रत्येकानें केलाच पाहिजे. तुम्ही वल्लभाचार्यांच्या ' श्रीकृष्णाचें, ' मध्वाचार्यांच्या ' विष्णूचें, ' रामानुजांच्या ' वासुदेवाचें, ' किंवा शंकराचार्यांच्या ' नारायणाचें ' अथवा स्वामी दयानंदाच्या मताप्रमाणें निर्विकार, निर्विकल्प, निर्गुण परमेश्वराचें, कोणाही देवाचें भजन करा; किंवा जातिभेद व वर्णाश्रमभेद परमार्थतः मायिक आहेत, असें शंकराचार्यांप्रमाणें म्हणा; परंतु वर ज्या देवतांचा निर्देश केला आहे, तदुद्दिष्ट जगत्पालक देवेश्वराची एकनिष्ठ भक्ति मात्र करा, म्हणजे या देवतांचें ज्ञान, गुणधर्म आणि निष्काम कर्म एकनिष्ठेनें करावयास लागा. याचें फल असें आहे कीं, अधिकारानुसार अभिमानाचा व वासनांचा उच्छेद होऊन स्वतःचें, कुटुंबाचें, जातीचें, राष्ट्राचें, राष्ट्रपतीचें, विश्वाचें आणि विश्वभूतांचें कल्याण उत्पन्न करणारें कर्म, प्रेमानें करण्याचा तुम्हांस उत्साह प्राप्त होईल. याच दृष्टीनें ज्ञानरूप परमेश्वराचें आराधन ध्यानपूर्वक करावें; म्हणजे जीवांचें ज्ञान उदित करून वृद्धिंगत करण्यासाठीं व ज्ञानवृद्धीस्तव मात्र जगण्यास अवश्य असणाऱ्या भोगप्राप्तीसाठीं हें जगत् ज्यानें उत्पन्न केलें, त्याचें ज्ञान करून घेऊन व ह्या ज्ञानाचे योगानें भगवद्गुणांचें ध्यान करणें हें आराधन समजून जगत्कल्याणाची व स्वतःच्या परम सुखाचीं साधनें वाढतील. याच दृष्टीनें उपनिषदांचें काय, अथवा भगवद्गीतेचें काय, श्रवण, पठन, निदिध्यास करावयाचा आहे. विशिष्ट मताचा अभिमान सुटेल तर प्रत्येक पंथ विशिष्ट अधिकाऱ्यांच्या उपयोगी पडतो; म्हणून प्रत्येक पंथाचें विशिष्ट कार्य आहे, व अर्थातच कोणत्याही पंथामध्यें विरोध असण्याचें कारण नाहीं; हा प्रत्येकाचा निश्चय हवा. असो; अशी दृष्टि ठेवून निर्मळ मनानें उपनिषदांचे भाष्यांसहित भाषांतर करण्याचा मीं संकल्प केला आहे. होतां होईल तितकें प्रामाणिकपणाचें व्रत स्वीकारून प्रत्येक मताचें योग्य भाषांतर यथामति व यथाश्रुत करावयाचें हा माझा निश्चय आहे. ह्या माझ्या निश्चयाला परमेश्वराचें साहाय्य असावें अशी त्या भक्तवत्सल आणि विश्वकल्याणकारी सर्वनियंत्या प्रभूची प्रार्थना करून कार्यास आरंभ करितों.

**चिंतामण गंगाधर भानु.**



ॐ

# उपनिषत्-प्रकाश.

## उपोद्घात.

### ईशावास्योपनिषद.

ज्ञानमार्ग सांगणारीं जीं दहा किंवा बारा उपनिषदें आहेत, त्यांत प्रथमतः 'ईशावास्य' (याला 'ईश' असेंही म्हणतात) येतें. या उपनिषदाला 'ईशावास्यं' या पदद्वयानें आरंभ झाला आहे, म्हणून याला प्रस्तुतचें नांव प्राप्त झालें आहे. हें यजुर्वेदांतर्गत वाजसनेयी संहितेमध्यें शेवटच्या अध्यायांत आहे. यांत मंत्र १७ किंवा १८ आहेत, याविषयीं वाद आहे. श्रीमच्छंकराचार्य व श्रीमद्रामानुजाचार्यसंप्रदायी म्हणतात कीं, या ज्ञानखंडांत १८ मंत्र आहेत. श्रीमन्मध्वाचार्यांनीं ही मंत्रसंख्या २० केली आहे; पण ती पूर्वोक्त १८ मंत्रांतच अंतर्भूत होते. श्रीमद्दयानंदजी मात्र येथें १७ मंत्र आहेत, असें म्हणतात. संहितेंत खरें म्हटलें असतां पाठभेद असूं नयेत, पण येथें तेही दृग्गोचर होतात.

कोणतेंही उपनिषद् घेतलें, तरी तें समजण्यास प्रायः कठिणच असतें. या आमच्या पुराण व सर्वतोपरि पूज्य उपनिषन्नामक तत्त्वज्ञानी ग्रंथांची भाषा सामान्यतः सूत्रात्मक असते. पुनः; या ग्रंथांची भाषा प्राचीन, शब्द व शब्दयोजना प्राचीन, वाक्यरचना प्राचीन, विचारसरणी व दृष्टांत प्राचीन, असा सर्वच अपरिचित प्रकार असतो. हा प्राचीन प्रकार पाहून अर्वाचीन वाचक सामान्यतः बांभावून जातो. शिवाय, आर्यसंप्रदायपद्धति व तिची परंपरा ज्यांस अविदित असतात, त्यांची तर सामान्यतः तारंबळच उडून जाते. मंत्राचा अर्थ, व्याकरण, पूर्वापरसंगति व तात्पर्य, यांचा कांहींच उलगडा होत नाहीं. यासाठीं प्रत्येक ब्रह्मजिज्ञासूनें कोणतें तरी एक सांप्रदायिक अधिकारी भाष्य हातांशीं घेऊन मग आर्यतत्त्वांची मीमांसा करण्यास आरंभ करावा. असें केलें तरी या प्रायः दुर्गम व गूढार्थप्रचुर उपनिषदांचें रहस्य एकनिष्ठ मननानिदिध्यास केल्याशिवाय कळावयाचें नाहीं. असो; ह्या अडचणी मनांत आणूनच प्रस्तुतच्या 'प्रकाशांत' प्रमुख भाष्यांचें व त्यांच्या अर्थांचें अवतरण केलें आहे. प्राचीन व अर्वाचीन संप्रदायज्ञ पंडितांचें निरनिराळें विवरण वाचून जिज्ञासूंस मंत्रार्थ व ज्ञानरहस्य स्वतंत्र रीतीनें समजण्याचें सामर्थ्य प्राप्त

व्हावें, अशा उमेदीनें प्रस्तुतचा प्रयत्न करण्याची योजना झाली आहे. भिन्न आचार्यांचे भिन्न सिद्धांत समजले म्हणजे, त्या सर्वांत कोणत्या गोष्टी सर्वसामान्यत्वानें आढळतात, भिन्न गोष्टींत आग्रह किती आहे, हें ध्यानांत येऊन सत्य अर्थाची प्रतिभा होते आणि जीवास कृतार्थ होण्याचें साधन उपलब्ध होतें. ही सर्व सामान्यत्वानें गोष्ट झाली. 'ईशावास्य' उपनिषद् तर अतिक्लिष्ट व अतिदुर्गम आहे, म्हणून तें समजण्याला भाष्यविशेषांची अपेक्षा अनिर्वाह-पक्षानें प्राप्त होते. शिवाय, भिन्न भाष्यांच्या अवलोकनानें आर्यतत्त्वज्ञानाचा विकास व संकोच कसा होत आला, हेंही कळतें.

या पुस्तकांत प्रथम मंत्र, अर्थासह अन्वय, शांकरभाष्य, नंतर रामानुज-शिष्यकृत विवरण, नंतर श्रीमन्मध्वाचार्य भाष्यासह श्रीजयतीर्थकृत टीका व शेवटीं श्रीदयानंद–शिष्य भीमशर्माकृत–भाष्य, असा क्रम ठेविला आहे. मंत्रांचें अवतरण एकदांच केलें आहे. प्रत्येक मंत्रावरील निरनिराळीं भाष्यें प्रत्येक मंत्रांत न देतां, प्रत्येक संप्रदायाचें स्वतंत्र भाष्य व भाषांतर समग्रतेनें दिलें आहे. प्रत्येक मंत्रावरील निरनिराळ्या भाष्यांनीं समजुतीचा घोंटाळा होतो. माझ्या या पद्धतीनें वाचकांचा घोंटाळा होणार नाहीं, असें वाटतें. भाष्यार्थ समजावा म्हणून कित्येक ठिकाणीं विस्तार केला आहे, तो जिज्ञासूंस पटेल अशी उमेद आहे.

॥ शुभंभवतु. ॥

---

# प्रकाशकांची विनंती.

प्रसिद्ध केल्याप्रमाणें उपनिषत्-प्रकाशाचा हा पहिला अंक मराठी वाचकांच्या सेवेंत सादर करीत आहोंत. हिंदुधर्मग्रंथांत उपनिषदें सर्वमान्य आहेत. उपनिषदां-च्याच आधारावर हिंदुशास्त्रांची, हिंदुतत्त्वज्ञानाची व हिंदुधर्माची रचना झालेली आहे. तेव्हां अशा ग्रंथांचें आणि त्यावर वेगवेगळ्या आचार्यांनीं केलेल्या भाष्यांचें ज्ञान, केवळ मराठी वाचकांस सुलभ रीतीनें व्हावें, ह्या हेतूनेंच हें काम आम्हीं हातीं घेतलेलें आहे. कोणत्याही मताचा किंवा पंथाचा अभिमान न धरितां प्रत्येकांचें मत सरळ मार्गानें वाचकांपुढें ठेवण्याचा आमचा निश्चय आहे. वेगवे-गळ्या मतांचें मंथन करून त्यांतून नवनीत काढणें हें काम तूर्त तरी आमच्या सूज्ञ विचारी वाचकांवरच सोंपविणार आहोंत. तथापि चारही आचार्यांचीं भाष्यें दिल्यानंतर, प्रत्येक उपनिषदाचा अन्वय, अर्थ, व विवरण आमच्या मतानें करून तें शेवटीं देण्याचा क्रम ठेविला आहे; हें ह्या नमुन्याच्या अंकावरून

वाचकांच्या लक्षांत येणार आहे. सर्व स्थितींतील सर्व प्रकारच्या लोकांस आमच्या प्राचीन सर्वमान्य ग्रंथांतील खऱ्या तत्वज्ञानाचा खरा लाभ व्हावा; हाच आमचा मुख्य उद्देश आहे. आमची दिशा चुकत असल्यास किंवा अर्थांत चूकभूल झाल्यास सूज्ञ वाचकांनीं वेळींच सूचना करावी अशी त्यांस आमची नम्र विनंती आहे.

हें महाभारती कार्य शेवटास जाणें जसें सर्वशक्तिमान परमेश्वराचे इच्छेवर आहे, तसेंच सूज्ञ वाचकांच्या आश्रयावरही तें अवलंबून आहे, हें वेगळें सांगावयास नकोच. आमची ही कृति ज्यांस पसंत पडेल त्यांनीं स्वतः आश्रयदात्यांत नांव नोंदवून आपल्या मित्रासही तसें करण्याविषयीं प्रोत्साहन दिलें; तर इष्ट कार्य सहज सिद्धीस जाणार आहे. दरमहा १२८ पृष्ठें या हिशेबानें दरसाल १५३६ पृष्ठें छापून काढण्याचा क्रम आम्ही ठेवणार आहोंत. आणि ह्या १५३६ पृष्ठांच्या ग्रंथाची किंमत वर्गणीदार होणारास ६ रुपये ठेवण्याचें ठरविलें आहे. ग्रंथाचें एकंदर महत्व, त्यास लागणारे श्रम व काल, इत्यादि गोष्टींचा विचार केला असतां आम्ही ठेवलेली ही किंमत अगदीं माफक आहे असें दिसून येईल. ज्यांस आमची ही कृति पसंत पडेल त्यांनीं अगाऊ वर्गणी पाठवून वर्गणीदाराच्या पटांत नांव नोंदविण्याची कृपा करावी.

दुसरा अंक येत्या कार्तिक महिन्यांत प्रसिद्ध होईल; व पुढें प्रत्येक महिन्यास नियमितपणें निघत जाईल. ह्या पहिल्या अंकांत ईशोपनिषत् संपूर्ण देण्याचा आमचा विचार होता; परंतु प्रत्येक आचार्यांचें भाष्य आणि त्यावरील विवरण आमच्या अंदाजाबाहेर वाढल्यामुळें तसें करतां आलें नाहीं. तथापि ह्या पहिल्या अंकांत श्रीमच्छंकराचार्य, श्रीरामानुजाचार्य अशा दोन आचार्यांची ईशोपनिषदावरील दोन भाष्यें पूर्ण आलीं आहेत; आणि मन्माध्वाचार्यस्वामींचे शिष्य जयतीर्थस्वामी यांचें भाष्य व टीका अर्ध्यापेक्षां अधिक आली आहे. बाकी राहिलेली जयतीर्थांची टीका, स्वामी दयानंद शिष्य–भीमशर्माकृत भाष्य व विवरण आणि आमच्या मतें होणारा संपूर्ण उपनिषदाचा अन्वय व अर्थ याप्रमाणें हें उपनिषद् पूर्ण होण्यास आणखी सुमारें ७५ तीं १०० पृष्ठें तरी लागतील असा अंदाज आहे; तो भाग दुसरे अंकांत पूर्ण होईल. तथापि ह्या १२८ पृष्ठांच्या पहिल्या अंकावरून आणि २० पृष्ठांच्या पूर्वप्रस्तव लेखावरून या कामाचें स्वरूप कशा प्रकारचें राहील त्याची कल्पना वाचकांस सहज करितां येईल.

आतांपर्यंत ज्या सद्गृहस्थांकडून आम्हाकडे ह्या मासिक पुस्तकासंबंधानें पत्रें आलीं आहेत, त्यांत विचार करण्यासारखे असे तीन मुद्दे आहेत. (१) कांहींचें असें म्हणणें आहे कीं, मासिकाचे रूपानें दरमहा १२८ पृष्ठांचा अंक काढण्याऐवजीं प्रत्येक उपनिषद स्वतंत्र छापून काढावें आणि वर्गणीदाराकडे तें व्ही. पी. नें पाठवीत जावें. (२) कांहीं गृहस्थांची अशी सूचना आहे कीं, वर्गणीदारांकडून प्रथम दोन रुपये--प्रवेश फी घेऊन, प्रत्येक तिमाहीस ३८४

पृष्ठांचा तिमाहीचा अंक त्यांजकडे व्ही. पी. नें पाठवावा, म्हणजे अंक गहाळ होण्याची भीति राहणार नाहीं. व ( ३ ) कांहींचें असें म्हणणें आहे कीं, मध्यम स्थितींतील लोकांस एकदम ६ रुपये देण्यास जड पडेल, याकरितां दरमहाचे दरमहा त्या त्या महिन्याचे अंक व्ही. पी. करून पाठवावा. अशाप्रकारें अंकाच्या व्यवस्थेसंबंधानें मुख्यत्वें तीन प्रकारच्या सूचना आहेत. पैकीं दरमहाचा अंक व्ही. पी. नें पाठविण्याची सूचना मान्य करितां येण्यासारखी नाहीं. कारण दर अंकामागें, पोष्ट, व्ही. पी. यासंबंधानें कमीतकमी तीन आणे अधीक खर्च होईल. अर्थात् हा बोजा वर्गणीदारांवर निष्कारण पडणार आहे; व हा प्रकार उभय पक्षासही त्रासदायक होणार आहे. म्हणून हा तिसरा मुद्दा शिवाय करून खालीं लिहिल्याप्रमाणें वर्गणीदारांचे दोन वर्ग ठरविले आहेत.

**वर्ग १ ला**—एकदम वर्षाच्या बारा अंकाचे ६ रुपये अगाऊ पाठविणारे वर्गणीदार. या वर्गांतील वर्गणीदारांनीं अगाऊ सहा रुपये एकदम पाठविले असतां त्याचें नांव पहिल्या वर्गांत दाखल करून त्यांजकडे दरमहाचे दरमहा १२८ पृष्ठांचा अंक पाठविला जाईल. टपाल खर्च वगैरे वेगळा आकारला जाणार नाहीं.

**वर्ग २ रा**—प्रवेश फी म्हणून दोन रुपये अगाऊ भरणारे वर्गणीदार. या वर्गांतील वर्गणीदारांनीं प्रवेश फी म्हणून अगाऊ दोन रुपये भरले असतां त्याचें नांव दुसरे वर्गांत दाखल करण्यांत येईल, आणि दर तीन महिन्यांनीं ३८४ पृष्ठांचा अंक म्हणजे ( तीनही महिन्यांचे तीन अंक ) त्यांजकडे, तिमाहीची वर्गणी रु. १॥ आणि तीन अंकास लागणारा टपाल व व्ही. पी. खर्च सहा आणे, मिळून एक रुपया चवदा आण्याची व्ही. पी. पाठविण्यांत येईल. आणि अगाऊ भरलेले दोन रुपये सर्व उपनिषदें पुरीं झाल्यानंतर शेवटीं मजरे देण्यांत येतील. परंतु व्ही. पी. परत आल्यास होणारें पोष्टाचें नुकसान मात्र सदर दोन रुपयांतून कापून घेतलें जाईल.

वरप्रमाणें वर्गणीदारांच्या सोईकरितां तूर्त दोन वर्ग केले आहेत. फुटकळ अंकच ज्यास घेणें असेल त्यांस प्रत्येक अंक बारा आणे किंमतीस मिळेल. बाहेर गांवचे लोकांस टपाल व्ही. पी. खर्च वेगळा पडेल. वर्गणीदार होऊं इच्छिणारांनीं ज्या वर्गांत आपलें नांव दाखल करावयाचें, त्याप्रमाणें अगाऊ रक्कम पाठवून वर्ग, नांव, ठिकाणा, जिल्हा, पोष्ट, वगैरे स्पष्ट लिहून कळवावें; म्हणजे कार्तिक शुद्ध ११ स निघणारा दुसरा अंक त्यांजकडे पाठविण्यास सोईचें पडेल.

**दामोदर सांवळाराम आणि मंडळी,**
ठाकुरद्वार–मुंबई.

# ईशोपनिषत्

## शाङ्करभाष्योपेता ।

### ( मराठी भाषांतरासहित. )

ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः ।

ॐ सद्वस्तुस्वरूपानें असणाऱ्या त्या ब्रह्माला नमस्कार असो !

## आचार्यांची प्रस्तावना.

ईशा वास्यमित्यादयो मन्त्राः कर्मस्वविनियुक्तास्तेषामकर्मशेषस्याऽऽत्मनो याथात्म्यप्रकाशकत्वात् । याथात्म्यं चाऽऽत्मनः शुद्धत्वापापविद्धत्वैकत्वनित्यत्वाशरीरत्वसर्वगतत्वादि वक्ष्यमाणम् । तच्च कर्मणा विरुध्येतेति युक्त एवैषां कर्मस्वविनियोगः । न ह्येवंलक्षणमात्मनो याथात्म्यमुत्पाद्यं विकार्यमाप्यं संस्कार्यं कर्तृभोक्तृरूपं वा येन कर्मशेषता स्यात् । सर्वासामुपनिषदामात्मयाथात्म्यनिरूपणेनैवोपक्षयात् । गीतानां मोक्षधर्माणां चैवंपरत्वात् । तस्मादात्मनोऽनेकत्वकर्तृत्वभोक्तृत्वादि चाशुद्धत्वपापविद्धत्वादि चोपादाय लोकबुद्धिसिद्धं कर्माणि विहितानि । यो हि कर्मफलेनार्थी दृष्टेन ब्रह्मवर्चसादिनाऽदृष्टेन स्वर्गादिना च द्विजातिरहं न काणकुब्जत्वाद्यनधिकारप्रयोजकधर्मवानित्यात्मानं मन्यते सोऽधिक्रियते कर्मस्विति ह्यधिकारविदो वदन्ति । तस्मादेते मन्त्रा आत्मनो याथात्म्यप्रकाशनेनाऽऽत्मविषयं स्वाभाविकमज्ञानं निवर्तयन्तः शोकमोहादिसंसारधर्मविच्छित्तिसाधनमात्मैकत्वादिविज्ञानमुत्पादयन्ति । इत्येवमुक्ताधिकार्यभिधेयसंबन्धप्रयोजनान्मन्त्रान्संक्षेपतो व्याख्यास्यामः ।

भाष्यार्थ—‘ परमेश्वरानें आच्छादित केलेलें.’ इत्यादि जे-हे अठरा—मंत्र आहेत, त्यांचा कर्मकांडाशीं कोणताही प्रकारचा संबंध नाहीं. कारण, कर्माशीं

ज्याचा कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं, अशा आत्म्याचें यथार्थ–स्वरूप–वर्णन करण्यासाठीं ह्या मंत्रांची योजना आहे.

पूर्वपक्षी—आत्म्याचें यथार्थ स्वरूप तें कसें असतें ?

सिद्धान्ती—ह्या स्वरूपाचें सविस्तर वर्णन पुढें यावयाचेंच आहे. पुढें असें सांगतील कीं,–'आत्मा शुद्ध आहे, तो कोणत्याही, यत्किंचित्‌ही, पातकानें दूषित होत नाहीं. तो एक आहे, नित्य आहे, आकाशाप्रमाणें अशरीर आहे आणि सर्वव्यापी म्हणजे सर्वत्र भरलेला आहे.' हेंच स्वरूप पुढील मंत्र स्पष्ट करणार आहेत, म्हणून या मंत्रांचा उपयोग कर्माविरुद्ध जें ज्ञान तिकडेच करणें योग्य आहे. कर्मकांडांत मात्र कर्मांची अपेक्षा असते. पहा कीं, पुरोडाश ज्याप्रमाणें आपण उत्पन्न करितों म्हणजे संस्कारक कर्म केल्यावर व संस्कृत झाल्यावर त्याला पूर्णता येते, किंवा सोमादि रस ज्याप्रमाणें उत्पन्न झाल्यावर विकार पावतात किंवा बिघडतात, मंत्र जसे शिकल्यावर येऊं लागतात, तांदुळांना ज्याप्रमाणें अग्निसंस्कार दिल्यावर ते शुद्ध होतात, ज्याप्रमाणें 'हें माझें उत्तम साधन आहे,' 'आतां असें काम करीन, असे भोग भोगीन' इत्यादि कामविकृत जीव बोलत असतो, त्याप्रमाणें आत्म्यास कांहींच रूपांतर होत नाहीं; कारण, तो उत्पन्न होत नाहीं, बिघडत नाहीं, नाश पावत नाहीं, त्याला संस्कार नको, त्याला कार्य नाहीं, भोग नाहीं, म्हणजे तो शुद्ध, अविकारी, एक, नित्य, अशरीर आणि सर्वव्यापी आहे. अर्थातच त्याला कोणताही विकार होत नाहीं, म्हणून त्याचे ठायीं कर्मशेषताही नाहीं.–येथें कर्म सांगितलें नाहीं म्हणून हें उपनिषद कर्मपर नव्हे.–ह्याचप्रमाणें इतर सर्व जीं उपनिषदें आहेत, त्या सर्वांची परिसमाप्ति, पर्यवसान, आत्मस्वरूपाचें स्पष्टीकरण करण्यामध्येंच होतें. उपनिषदांचाच अर्थ स्पष्ट करण्यासाठीं भगवंतांनीं गायिलेली गीता आणि इतर मोक्षशास्त्रें अगर भारतांतील मोक्षधर्म हीं सर्व आत्मस्वरूपाचें ऐक्य व ज्ञानरूपत्व मात्र सिद्ध करणारीं आहेत.

पूर्व०—मग या मंत्रांस संहितेमध्यें कां घातलें ?

सिद्धान्ती—कर्मकांडांत घातलें याचा उद्देश कर्म करण्यास अधिकारी कोण, ज्ञानी पुरुषास कर्म करण्याची आवश्यकता कां नाहीं, हें सांगण्याकरितां या मंत्रांची योजना येथें केली, व ज्ञानी पुरुषास 'कर्म नको' असें सांगितलें.

पूर्व०—तर मग तुमच्या या म्हणण्यावरून यज्ञयागादि व इतर कर्में निरुपयोगीच ठरतात; आणि हें तर सर्व वेदशास्त्रांस विरुद्ध आहे.

सिद्धान्ती—तुम्ही समजला नाहीं. 'आत्मे अनेक आहेत, ते कर्ते व भोक्ते आहेत, म्हणजे सुख मिळविण्यासाठीं व दुःखाचा परिहार करण्यासाठीं त्या आत्म्यांनीं कर्म केलें पाहिजे, व कर्मफल भोगिलें पाहिजे. तसेंच, आत्मे पापमग्न आहेत म्हणजे स्वभावतःच त्यांची पापाकडे प्रवृत्ति आहे.' अशी ज्यांची बुद्धि

आहे; सारांश, आत्म्याचें स्वरूप अशुद्ध आहे,' असें ज्या अविद्वान् लोकांस वाटतें; त्यांच्यासाठीं कर्मकांड, उपासना, नीति-नियम, समाज-शासन वगैरे शास्त्रें केलीं आहेत. सारांश, जैमिन्यादि कर्मकांडप्रतिपादकांच्या मताप्रमाणें असा सिद्धान्त आहे कीं, 'इहलोकीं केलेल्या कर्मांचें फल येथेंच मिळावें अशी जो पुरुष इच्छा करितो, किंवा यज्ञयागादि केले म्हणजे स्वर्गलोकीं सुख मिळेल अशी जो इच्छा करितो, त्याचप्रमाणें मी ब्राह्मण आहें, काणा, कुब्ज खञ्ज इत्यादि नसल्यामुळें मला सर्व कर्मे करण्याचा अधिकार आहे, असें ज्या पुरुषाला वाटतें, त्याच पुरुषाला म्हणजे अहंवृत्तीचा अभिमान असणाऱ्या प्रत्येक पुरुषाला कर्म करण्याचा अधिकार आहे.' हा जैमिनिप्रभृति मीमांसकांचा सिद्धान्त योग्य आहे. परंतु, येथें ह्या वेदान्तविषयांत अभिमानरहित पुरुषाचा विचार कर्तव्य आहे. हे जे मंत्र आहेत, ते आत्म्याचें यथार्थ स्वरूप प्रकट करून आत्म्याविषयीं जें स्वाभाविक अज्ञान असतें त्याचा निरास करितात. सारांश, संसारांत पडलेल्या प्राण्यांस उत्पन्न होणारे जे शोक, मोह, (संताप आणि मूर्खता) त्यांचा समूळ नाश करण्याचें उत्कृष्ट साधन जें 'आत्मा एकच आहे इत्यादि' ज्ञान, तें या मंत्रांच्या योगानें उत्पन्न होतें. सारांश, ज्ञानकांड ज्ञान्यासाठीं मात्र प्रवृत्त होतें.

याप्रमाणें हे मंत्र वाचण्याचा अधिकारी कोण, या मंत्रांचा अगर उपनिषद्रांचा विषय काय, ग्रंथाचा विषयाशीं संबंध काय आणि हा ग्रंथ लिहिण्याचें कारण काय, हें सांगितलें.—म्हणजे निराभिमानी व विरक्त पुरुष मात्र हा ग्रंथ वाचण्याचा अधिकारी, 'ईशावास्य' हें या उपनिषदाचें नांव, ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय होणें शक्य नाहीं हा विषय, आत्मस्वरूपाचें विवेचन हा संबंध आणि संसाराचा (जन्ममरणाचा) नाश हें फल, असें सांगितलें. या चार गोष्टींसच 'अनुबन्धचतुष्टय' म्हणतात.—असो. आतां ह्या मंत्रांचें संक्षेपतः व्याख्यान करण्यास शांतिपठनपूर्वक आरंभ करितों.

### उपनिषदारम्भशान्तिमन्त्रः ।

**ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥**

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।

तें पूर्ण आहे, हें पूर्ण आहे. पूर्णापासूनच पूर्णाचा उदय होतो. पूर्णांतून पूर्ण काढून घेतलें असतां बाकी पूर्णच राहतें! ब्रह्म हें पूर्ण आहे, आणि ह्या दृश्यजगाचें मूळस्वरूपही पूर्णच आहे. पूर्ण ब्रह्मापासूनच पूर्ण दृश्यजगाची उत्पत्ति झाली आहे, आणि पूर्ण ब्रह्मांतून पूर्ण दृश्यजग जरी काढून टाकिलें तरी शिलक बाकी पूर्ण ब्रह्मच राहतें!—आधुनिक वरिष्ठगणिताच्या शून्यलब्धीचा व अनंतलब्धीचा ज्यांस पूर्ण परिचय झाला आहे, त्यांस अनंतांतून अनंत काढून घेतलें तरी पुनः अनंतच शिलक कसें राहतें याचा परिचय आहेच!—

बृहदारण्यकोपनिषदांत हा शांति-मंत्र आहे. याचा अर्थ आचार्यांनीं तेथें स्पष्ट करून सांगितला आहे. त्याचें तात्पर्य सांगतों: ‘ हें ब्रह्म आकाशाप्रमाणें सर्वव्यापी असून निरंतर (सर्वत्र घनदाट पसरलेलें ) व उपाधिशून्य आहे. ह्या सर्व-व्यापी ब्रह्मानें नामरूपामुळें दृश्य होणाऱ्या सृष्टीसही स्वस्वरूपानें व्यापून पूर्णत्व दिलें आहे, म्हणजे नामरूपात्मक सृष्टिसुद्धां ब्रह्ममयच आहे. नामरूपें मात्र मायेनें उत्पन्न होतात म्हणून असत्य आहेत. नामरूपाचें असत्यत्व स्थापन होऊन मी व ही अखिल सृष्टि, ब्रह्मच आहोंत, आम्ही भिन्न नाहीं ’ असें अनुभवपूर्वक ज्ञान झालें, म्हणजे आपल्यासही पूर्णत्व येऊन सर्वत्र ब्रह्ममात्र शिलक राहतें.

‘ शांति असो ’ अशा त्रिवार उच्चारानें हें मंगलाचरण समाप्त करितात.

---

हरिः ॐम् ।

**ईशा वास्यमिद्ँ सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ॥**
**तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्य स्विद्धनम् ॥१॥**

**पदान्वयार्थ.**—**यत्किंच** ( जें सर्व कांहीं हें ) **जगत** ( जग, विश्व )-आहे,—**इदं** ( हें ) **जगत्यां** ( जगांतील, दृश्य जगांतील ) **सर्वं** ( सर्व, सगळें ) **ईशा** ( सर्वांचें नियमन करणारा जो परमेश्वर त्यानें ) **वास्यं** ( राहण्याची जागा केली आहे, किंवा आच्छादन करून टाकिलें आहे. ) **तेन त्यक्तेन** ( तें सर्व टाकून देऊन, त्याचा त्याग करून ) **भुञ्जीथाः** ( उपभोग करीत रहा, स्वस्वरूपाचे ठायीं रममाण हो; ) **कस्यस्वित्** ( कोणाचेंही ) **धनं** ( द्रव्य, पैसा, संपत्ति, वस्तु ) **मा गृधः** ( घेण्याविषयीं इच्छा करूं नकोस,—हें जें सर्व दिसतें आहे, इंद्रियगोचर आहे. त्या सर्व जगताचा स्वामी जो परमेश्वर त्यानें हें सर्व जग भरून गेलें आहे. सर्वत्र परमेश्वरस्वरूपी ब्रह्म भरलें आहे. परंतु हे जीवा! ‘ हें माझें ’ हा अभिमान सोडून दे, व या दृश्य जगाचा त्याग-पूर्वक उपभोग घे, दुसऱ्या कोणत्याही किंवा कोणाच्याही वस्तूचा अभिलाष धरूं नको.

**भाष्यम्—ईशा वास्यमित्यादि । ईशा ईष्टे इतीट् तेनेशा । ईशिता परमेश्वरः परमात्मा सर्वस्य । स हि सर्वमीष्टे सर्वजन्तूनामात्मा सन्प्रत्यगात्मतया तेन स्वेन रूपेणाऽऽत्मनेशा वास्यमाच्छादनीयम् । किम् । इदं सर्वं यत्किंच यत्किंचिज्जगत्यां पृथिव्यां जगत्तत्सर्वं स्वेनाऽऽत्मना ईशेन प्रत्यगात्मतयाऽहमेवेदं**

सर्वमिति परमार्थसत्यरूपेणानृतमिदं सर्वं चराचरमाच्छादनीयं स्वेन परमात्मना। यथा चन्दनागर्वादेरुदकादिसंबन्धजक्लेदादिजमौपाधिकं दौर्गन्ध्यं तत्स्वरूपनिर्घर्षणेनाऽऽच्छाद्यते स्वेन पारमार्थिकेन गन्धेन। तद्वदेव हि स्वात्मन्यध्यस्तं स्वाभाविकं कर्तृत्वभोक्तृत्वादिलक्षणं जगद् द्वैतरूपं जगत्यां पृथिव्यां जगत्यामित्युपलक्षणार्थत्वात्सर्वमेव नामरूपकर्माख्यं विकारजातं परमार्थसत्यात्मभावनया त्यक्तं स्यात्। एवमीश्वरात्मभावनया युक्तस्य पुत्राद्येषणात्रयसंन्यास एवाधिकारो न कर्मसु। तेन त्यक्तेन त्यागेनेत्यर्थः। न हि त्यक्तो मृतः पुत्रो वा भृत्यो वाऽऽत्मसंबन्धिताया अभावादात्मानं पालयत्यतस्त्यागेनेत्ययमेव वेदार्थः। भुञ्जीथाः पालयेथाः। एवं त्यक्तैषणस्त्वं मा गृधः गृधिमाकाङ्क्षां मा कार्षीर्धनविषयाम्। कस्यस्विद्धनं कस्यचित्परस्य स्वस्य वा धनं मा काङ्क्षीरित्यर्थः। स्विदित्यनर्थको निपातः। अथवा मा गृधः। कस्मात्। कस्यस्विद्धनमित्याक्षेपार्थो न कस्यस्विद्धनमस्ति यद् गृध्येत। आत्मैवेदं सर्वमितीश्वरभावनया सर्वं त्यक्तमत आत्मन एवेदं सर्वमात्मैव च सर्वमतो मिथ्याविषयां गृधिं मा कार्षीरित्यर्थः॥ १॥

भाष्यार्थ—जो सर्वांचें नियमन करितो तो ईश. त्यानें म्हणजे परमेश्वरानें अथवा सर्वांच्या व सर्व प्राण्यांच्या अंतर्यामी राहणारा जो श्रेष्ठ परमात्मा त्यानें, हें सर्व स्वरूपानें आच्छादन करून किंवा वसतिस्थान करून टाकिलें आहे.

शिष्य—महाराज! हें म्हणजे काय? आणि परमात्म्यानें तें कसें आच्छादन केलें आहे?

गुरु—अरे! हें म्हणजे या सर्व पृथ्वीवर जें कांहीं द्वैतात्मक दिसत आहे तें. हें सर्व परमेश्वरानें आपल्या स्वरूपानें आच्छादन करून टाकिलें आहे.

शिष्य—महाराज! तर मग अत्यंत श्रेष्ठ जो परमात्मा त्यालाच आपण ईश्वर म्हटलें. आणि आतां त्यानें हें सर्व आच्छादून टाकिलें आहे असें म्हणतां, तेव्हां परमेश्वराकडे म्हणजे परब्रह्माकडे कर्तृत्व येतें. नाहीं काय?

गुरु—अरे! तूं सर्व शब्द लक्ष्यांत ठेवीत नाहींस आणि उगीच शंका काढितोस. सर्वांच्या अंतर्यामीं राहून तो आच्छादन करितो असें मीं सांगितलेंना? पुनः, आपण अज्ञानी आहों, मायेला वश आहों तोंपर्यंत मायारूपी जें हें जग त्याला कोणी नियंता पाहिजेच्च कीं नाहीं? अज्ञान स्थितींतील मनुष्यांस सन्मार्ग दाखविण्याच्या हेतूनें परमेश्वरही मायावी होऊन सर्वांचें नियमन करितोसा दिसतो. समजलास? वस्तुतः जगही नाहीं आणि नियमनही नाहीं. आरशांत पडलेल्या

प्रतिबिंबांचा नियंता आरशांत पाहणारा मनुष्य असतो; आरसा काढून घेतला म्हणजे जसें प्रतिबिंब व नियामकत्व हें सर्व नाहींसें होतें, तसाच हा प्रकार होय. वस्तुतः भेद नाहीं, मायेनें भेद उत्पन्न होतो, व नियामकत्वही उत्पन्न होतें. आपण अज्ञानवश असतों, म्हणून हें सर्व जगत् आपल्यास ब्रह्ममय नाहीं असें वाटतें. पण सर्वत्र परमात्माच आत्मरूपानें भरला आहे आणि मीही तोच परमात्मा आहें आणि हें सर्व स्थावरजंगम मला भिन्नसें दिसतें, तें दिसणें व दिसलेलें खोटें आहे असें ज्ञान झालें आणि सतत विचार करून हें ज्ञान दृढ केलें म्हणजे सर्वत्र परब्रह्मच आहे असा सिद्धान्त होतो व आपण मुक्त होतों. पहा कीं एखादा मैलागिरीवरील उत्तम चंदन स्वभावतः अति सुगंधि असतो, पण त्यास पाण्याचा संसर्ग झाला तर तो कुजतो व त्यास घाण येऊं लागते. पुढें तो कुजलेला भाग घासून पुसून काढून टाकिला म्हणजे जसें चंदनाचें पूर्व स्वरूप प्रकट होऊन घाण नाहींशी होते, त्याचप्रमाणें निर्विकारी आत्म्यावर 'तो कर्ता आहे, भोक्ता आहे' इत्यादि जे खोटे आरोप केले जातात, व नाम आणि रूप यांच्या योगानें विकारवश झाल्यासारखें भासणारें सर्व विश्व, द्वैतरूपी आहे म्हणजे परब्रह्माहून निराळें आहे असें जें खोटें ज्ञान होतें, त्या सर्वांचा नाश होतो. हा नाश किंवा त्याग वस्तुतः सत्य असणाऱ्या केवल-ब्रह्मज्ञानाच्या अनुभवानें होतो. समजलें ?

असें ज्याला ज्ञान झालें व एकच ब्रह्म आहे अशी ओळख स्वानुभवानें पटली म्हणजे मात्र 'पुत्र असावा, धन असावें, कीर्ति मिळावी किंवा स्वर्गलोक असावा.' अशा तीन्ही प्रकारच्या वासनांचा नाश होतो, व तो पुरुष संन्यासाला योग्य होतो. अशा पुरुषाला सकाम कर्माचें कारण उरत नाहीं. त्यानें मग सर्व कर्मांचा फलत्याग करावा. कारण टाकलेला किंवा मेलेला मुलगा किंवा सेवक, यांचा व आपला संबंध नाहींसा झाल्यावर, ते जसें आपलें पालनपोषण करीत नाहींत, तसेंच वासनारहित केलेलें कर्महीं आपल्यास फल देत नाहीं. म्हणून त्याचा, अर्थात् सर्व कर्मांचा फलत्याग व सकाम कर्मांचा त्याग करणें इष्ट आहे, असाच मंत्राचा वैदिक अर्थ आहे.

सर्व कर्मांचा फलत्याग केल्यावर मग तूं आत्मस्वरूपाच्या आनंदामध्येंच रममाण होऊन रहा. आत्मस्वरूपीं तल्लीन झाल्यावर अर्थातच तुला धनाची वासना ठेवण्याचें कारण राहणार नाहीं. कारण आत्मसुखाची प्राप्ति झाल्यावर विषयसुखाची अगर दुसऱ्याच्या धनाची वासना नष्टच झाली पाहिजे. शिवाय, दुसरा पदार्थच नाहींसा झाल्यावर परधनापहरणाची वासना तरी राहणार कशी ? आपणच हें सर्व आहों, सर्वत्र ईश्वरच आत्मस्वरूपानें भरला आहे असा परिचय झाल्यावर दृश्यजात खोटें भासतें, 'हें माझें' असा भ्रम नाहींसा होऊन वासनेचा उद्भवही होत नाहीं. सर्वत्र आत्मस्वरूपच दिसतें. तथापि एखादे वेळीं तरी जीव मायेला वश होईल, म्हणून तूं वासनाच ठेवूं नको, तिला उत्पन्न होऊं देऊं नको असा उपदेश केला आहे. सारांश, सर्वत्र

ईश्वर आत्मस्वरूपानें भरला आहे, असें ज्ञान करून घे, मिथ्या विषयाचा त्याग कर आणि मिथ्या विषयांबद्दल जी वासना उत्पन्न होते तिचाही त्याग कर असा उपदेश प्रथम मंत्रांत केला आहे ॥ १ ॥

---

**एवमात्मविदः पुत्राद्येषणात्रयसंन्यासेनाऽऽत्मज्ञाननिष्ठतयाऽऽत्मा रक्षितव्य इत्येष वेदार्थः । अथेतरस्यानात्मज्ञतयाऽऽत्मग्रहणाशक्तस्येदमुपदिशति मन्त्रः—**

याप्रमाणें शास्त्रोक्त आत्मज्ञान ज्याला झालें आहे, त्यानें पुत्रादिसंबंधी वासनांचा प्रथमतःच त्याग करून आत्मज्ञानाची जी निष्ठा (जें सदोदित चिंतन) त्याच्यायोगानें आत्म्याचें रक्षण करावें असा पहिल्या मंत्राचा अर्थ झाला. आतां ज्या मनुष्याला आत्म्याचें तत्त्व समजत नाहीं आणि म्हणून आत्मज्ञान ग्रहण करण्याचें सामर्थ्य नाहीं, त्यांच्यासाठीं हा दुसरा मंत्र सांगतातः—

**कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतꣳ समाः ।**
**एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥ २ ॥**

**पदान्वयार्थ**—इह (येथें) **कर्माणि** (विहित कर्में) **कुर्वन् एव** (करीत असतांना, करून मात्र) **शतं** (शंभर) **समाः** (वर्षें) **जिजीविषेत्** (जिवंत राहण्याची इच्छा करावी) **एवं** (याप्रमाणें) **नरे** (मनुष्यत्वाचा अभिमान धरणाऱ्या) **त्वयि** (जगण्याची इच्छा करणारा जो—तूं त्या तुला) **इतः** (यापासून—कर्में केल्यापासून) **अन्यथा** (दुसरा प्रकार) **न अस्ति** (नसतो.— हीं सांगितलेलीं कर्में जन्मभर केलीं असतां कोणताही दोषाचा प्रकार होत नाहीं— ) **कर्म** (कर्म हीं) **न लिप्यते** (लिप्त होत नाहीं अंगाला लागत नाहीं.) सारांश, ज्या पुरुषाला आत्मज्ञान झालें नाहीं, त्यानें निष्कामबुद्धीनें शास्त्रोक्त कर्म जन्मभर आचरण करावें. त्यापासून पाप होत नाहीं आणि कर्मापासून उत्पन्न होणारें सुखदुःखही त्यास भोगावें लागत नाहीं.

**भा०—कुर्वन्नेवेति । कुर्वन्नेव इह निर्वर्तयन्नेव कर्माण्यग्निहोत्रादीनि जिजीविषेज्जीवितुमिच्छेच्छतं शतसंख्याकाः समाः संवत्सरान् । तावद्धि पुरुषस्य परमायुर्निरूपितम् । तथा च प्राप्तानुवादेन यज्जिजीविषेच्छतं वर्षाणि तत्कुर्वन्नेव कर्माणीत्येतद्विधीयते । एवमेवं प्रकारेण त्वयि जिजीविषति नरे नरमात्राभिमानिनीत एतस्मादग्निहोत्रादीनि कर्माणि कुर्वतो वर्तमानात्प्रकाराद-**

न्यथा प्रकारान्तरं नास्ति येन प्रकारेणाऽशुभं कर्म न लिप्यते कर्मणा न लिप्यत इत्यर्थः । अतः शास्त्रविहितानि कर्माण्यग्निहोत्रादीनि कुर्वन्नेव जिजीविषेत् । कथं पुनरिदमवगम्यते पूर्वेण मन्त्रेण संन्यासिनो ज्ञाननिष्ठोक्ता, द्वितीयेन तदशक्तस्य कर्मनिष्ठेत्युच्यते । ज्ञानकर्मणोर्विरोधं पर्वतवदकम्प्यं यथोक्तं न स्मरसि किम् । इहाप्युक्तं यो हि जिजीविषेत् स कर्म कुर्वन् । ईशा वास्यमिदं सर्वं, तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यस्विद्धनमिति च न जीविते मरणे वा गृधिं कुर्वीताऽरण्यमियादिति च पदम् । ततो न पुनरियादिति संन्यासशासनात् । उभयोः फलभेदं च वक्ष्यति । इमौ द्वावेव पन्थानावनु निष्क्रान्ततरौ भवतः क्रियापथश्चैव पुरस्तात्संन्यासश्चोत्तरेण निवृत्तिमार्गेण एषणात्रयस्य त्यागः । तयोः संन्यासपथ एवातिरेचयति " न्यास एवात्यरेचयत् " इति च तैत्तिरीयके । " द्वाविमावथ पन्थानौ यत्र वेदाः प्रतिष्ठिताः । प्रवृत्तिलक्षणो धर्मो निवृत्तश्च विभावितः " इत्यादि पुत्राय विचार्य निश्चितमुक्तं व्यासेन वेदाचार्येण भगवता । विभागं चानयोर्दर्शयिष्यामः ॥ २ ॥

भाष्यार्थ—येथें अग्निहोत्रादि-वेदविहित कर्मे करीत असतांनांच शंभर वर्षे जगण्याची इच्छा करावी. कारण पुरुषाचें आयुष्य तितकेंच, शंभर वर्षेच, आहे, असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें मागचा पुढचा संबंध लक्ष्यांत ठेवून अनुवाद केला असतां असें ठरतें कीं जगण्याची इच्छा करावयाची ती कर्म करण्यासाठीं मात्र पूर्णतः असावी. येणेंप्रमाणें जगण्याची इच्छा करणारा नराभिमानी जो तूं त्या त्वां अग्निहोत्रादि विहित कर्मे केलीं असतां, सारखें शास्त्रोक्त आचरण ठेविलें असतां, पुण्यमार्गापासून भ्रष्ट होऊन अन्य प्रकाराला म्हणजे अन्यमार्गाला-पापमार्गाला जाशील असें होणार नाहीं [ पहा भगवद्गीता अ० २ श्लोक ४७, अ० ३ श्लोक १९, अ० ५ श्लोक १० व बृहदारण्यक ४।४।२२ ] आणि पापकर्म तुझ्या हातून झालें नाहीं म्हणून पापाचा किंवा पापकर्मांचा अथवा कोणत्याही कर्मांचा, संपर्कही तुला लागणार नाहीं. म्हणून अहंकाराला वश होऊन तूं जगण्याची इच्छा जर करीत असशील तर चित्तशुद्धीसाठीं तुला अग्निहोत्रादि विहित कर्मेच केलीं पाहिजेत; आणि हीं कर्मे निष्काम बुद्धीनें केलीं पाहिजेत. या अग्निहोत्रादि विहित कर्मांशिवाय दुसरें कोणतेंही असें कर्म नाहीं कीं, जें तुला स्वपाशांत आणून लिप्त करणार नाहीं ! म्हणून विहित कर्म मात्र कर.

शिष्य—भगवन् ! आपण असें कसें म्हणतां ? मला असें वाटतें कीं, ज्या पुरुषाला पूर्व मंत्रामध्यें ज्ञानाचा उपदेश केला, त्याच पुरुषानें कर्म करावें

असें दुसऱ्या मंत्रानें सांगितलें आहे. आपण हा भेद काढीत आहां व ज्ञान आणि कर्म एका पुरुषाला सांगितलें नाहीं असें म्हणतां, हें कशावरून ? पहिल्या मंत्रामध्यें पुत्रादिकांचा त्याग करणाऱ्या संन्याशालाच ज्ञाननिष्ठा सांगितली आणि दुसऱ्या मंत्रामध्यें संन्यास करण्याला अशक्त असणाऱ्या मनुष्याला कर्मनिष्ठा सांगितली असा भेद मुळांत तर नाहीं. आपण कोठून काढितां हा भेद भगवन् ?

गुरुजी—अरे ! तूं इतका विसराळू कधीं झालास ? 'मी कर्ता आहें, मी भोक्ता आहें' हें ज्ञान नव्हे. अज्ञान आहे. हा अज्ञानी ज्ञानाभास कर्म करण्याचे वेळीं असतो आणि "आत्मा शुद्ध आहे, अविकारी आहे, अकर्ता आहे,' इत्यादि आत्मज्ञानाचे वेळीं 'हा मी, हें माझें' हें अज्ञान नाहींसें होतें; सारांश, ज्ञान आणि कर्म यांच्यामध्यें जो विरोध आहे, तो पर्वतासारखा न ढळणारा आहे, हें मागें तुला सांगितलें होतें; ज्ञान व कर्म एकत्र राहूं शकत नाहींत हेंही सांगितलें होतें, तें तूं विसरलास वाटतें ? या उपनिषदांत व याच मंत्रांत सांगितलें आहे कीं, ज्याला जगण्याची इच्छा आहे त्यानेंच कर्म करावें म्हणून. तसेंच परमेश्वरानें हें सर्व दृश्य जग आपल्या मायेच्या आवरणानें आच्छादून टाकिलें आहे; तें टाकून देऊन 'कोणत्याही प्रकारच्या विषयाविषयीं अभिलाष धरूं नये' असें पहिल्याच मंत्रांत आत्मज्ञाला सांगितलें आहेना ? जिवंत राहण्याची आशा किंवा मृत्यूची काळजी करूं नये, याचा अर्थ कर्म करूं नये, अरण्यांत जावें, सर्व संग सोडावा, या शिवाय मुक्ति मिळविण्याला दुसरा मार्गच नाहीं, असाच नव्हे काय ? त्याचप्रमाणें आयुष्याची आशा सोडून दिलेला पुरुष पुनः कर्मामध्यें प्रवृत्त होत नाहीं, व होऊं नये, हेंच 'त्याग कर' या मंत्रशब्दानें सांगितलेंना ? मग असें भ्रांतिष्ठासारखें काय विचारतोस ? तसेंच ज्ञानाचें फल निराळें आहे, कर्माचें फल निराळें आहे, हें याच उपनिषदांत ठरणार आहे. हे दोन पंथ एका पाठीमागून एक असे आचरितां येतील. प्रथम कर्ममार्ग अगर प्रवृत्तिमार्ग आणि दुसरा ज्ञानमार्ग अगर निवृत्तिमार्ग हे दोन मार्ग आहेत. भगवत्पादाचार्यांचे मतें 'प्रथम वेदोक्त कर्में करून मग पुत्र, धन, मित्रांचा सर्वस्वाचा त्याग केला असतां निवृत्तिमार्ग सिद्ध होतो.' असें नारायण उपनिषदांत सांगितलें आहे. या दोन मार्गांपैकीं संन्यासमार्गच श्रेष्ठ आहे. 'त्याग करणें हा श्रेष्ठ पंथ आहे' असें तैत्तिरीयक उपनिषदामध्येंही सांगितलें आहे. महर्षि वेदाचार्य भगवान् व्यास हे सुद्धां पूर्ण विचार करून निश्चयानें असेंच आपल्या मुलास सांगतातः 'वेदांनीं सांगितलेले हे दोन मार्ग आहेत. एक प्रवृत्ति आणि दुसरा निवृत्ति. प्रवृत्ति म्हणजे कर्म करणें हें आहे लक्षण ज्याचें तें वेदोक्त धर्मकर्म होय. त्याचप्रमाणें आत्मप्राप्तीस अत्यंत सुलभ असा ज्ञानी पुरुषाचा निवृत्तिमार्ग आहे.' आम्हींही हा विभाग पुढें याच उपनिषदांत दाखवून देऊं. सारांश, ज्याला संन्यास साधत नाहीं त्यानेंच

कर्म करावें. ज्ञानमार्ग आणि कर्ममार्ग हे दोन्ही मार्ग एका पुरुषाला एकाच काळीं अनुसरतां येणार नाहींत. ॥ २ ॥

---

अथेदानीमविद्वन्निन्दार्थोऽयं मन्त्र आरभ्यते—

यानंतर हा तिसरा मंत्र आत्मज्ञानशून्य म्हणून अविद्वान् लोक त्यांची निंदा करण्यासाठीं योजिला आहे.—

**असुर्या नाम ते लोका अन्धेन तमसाऽऽवृताः ।**
**तांस्ते प्रेत्याभिगच्छन्ति ये के चाऽऽत्महनो जनाः ॥३॥**

**पदान्वयार्थ—अन्धेन तमसा** ( न दिसणाऱ्या अशा अंधकारानें, अज्ञानानें ) **आवृताः** ( गुरफटून गेलेले, झांकून गेलेले, मंद तेज झालेले ) ते (ते) **लोकाः** ( जन्म ) **असुर्या नाम** ( राक्षसीच, केवळ प्राणपोषक, ज्ञानहीन ) होत. **ये के** ( जे कोणी ) **आत्महनो जनाः** ( आत्मघात करणारे लोक ) **तान्** ( त्या लोकांना; त्या जन्माला ) **प्रेत्य** ( मरणानंतर ) **अभि गच्छन्ति** ( आपआपल्या कर्मानुसार जातात. ) तात्पर्य हें आहे कीं आत्म्याचा विचार न करितां केवळ अज्ञानामध्यें आयुष्य कंठणारे विषयासक्त आत्मघाती लोक आपआपलीं शरीरें नष्ट झाल्यावर अंधकारानें व अज्ञानानें पूर्ण अशा राक्षसी जन्माला जातात, म्हणजे आत्मज्ञान न झालेले लोक जन्ममरणाच्या चक्रांत सांपडतात.

**भा०—असुर्याः परमात्मभावमद्वयमपेक्ष्य देवादयोऽप्यसुरास्तेषां च स्वभूता लोका असुर्या नाम । नाम शब्दोऽनर्थको निपातः । ते लोकाः कर्मफलानि लोक्यन्ते दृश्यन्ते भुज्यन्त इति जन्मानि । अन्धेनादर्शनात्मकेनाज्ञानेन तमसाऽऽवृता आच्छादितास्तान्स्थावरान्तान्प्रेत्य त्यक्त्वेमं देहमभिगच्छन्ति यथा कर्म यथाश्रुतम् । ये के चाऽऽत्महनः । आत्मानं घ्नन्तीत्यात्महनः । के ते जनाः । येऽविद्वांसः । कथं त आत्मानं नित्यं हिंसन्ति । अविद्यादोषेण विद्यमानस्याऽऽत्मनस्तिरस्करणात् । विद्यमानस्याऽऽत्मनो यत्कार्यं फलमजरामरत्वादिसंवेदनलक्षणं तद्धतस्येव तिरोभूतं भवतीतिप्राकृताऽविद्वांसो जना आत्महन उच्यन्ते तेन ह्यात्महननदोषेण संसरन्ति ते ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—खरें जें आत्मज्ञान, अद्वैतज्ञान, तें ज्यांना नाहीं ते सर्व लोक—देवकोटींतले असले तरी—असुर्यवासी होत. राक्षस राहण्याच्या ज्या

जागा, जीं भुवनें, जे लोक, त्यांस असुर्य लोक असें म्हणतात. ह्या लोकांत केलेल्या कर्मांचीं फळें भोगलीं जातात म्हणून त्यांस जन्मही म्हणावें. जेथें कांहीं दिसत नाहीं, बुद्धि चालत नाहीं अशा अज्ञानरूपी अंधकारामध्यें गडप होऊन गेलेले जे दगड, धोंडे इत्यादि पर्यंतचे जड जन्म तेथपर्यंत सुद्धां, हें मानव शरीर टाकून दिल्यानंतर, ज्या ज्या प्रमाणें कर्म केलें असेल त्या त्या मानानें व ज्यानें जसें ज्ञान मिळविलें असेल त्याप्रमाणें—कर्मभूमीवर अज्ञानी लोक पुनः जन्म घेतात.—मुंडकोपनिषदांत हेंच सांगितलें आहे.—[ पहा भगवद्गीता अ० १५ श्लोक १० ].

शिष्य—भगवन् ! जन्ममरणाचें चक्र कोणाच्या पाठीमागें लागलें आहे ?

गुरु—अरे ! जे लोक आत्म्याचा घात करितात, त्या आत्मज्ञानशून्य अज्ञानी लोकांच्या पाठीमागें जन्ममरणाचें चक्र लागलेलें आहे ! आत्मे अनेक आहेत असें मानणाऱ्या लोकांच्या मागें जन्ममरणाची साडेसाती असावयाचीच.

शिष्य—गुरुजी ! नित्य आणि अविनाशी अशा आत्म्याचा घात होतो ?

गुरु—अरे वत्सा ! हा घात म्हणजे प्रत्यक्ष नाश करणें किंवा मारणें नव्हे; आत्म्याचा घात होत नाहीं हें सिद्धच आहे. पण अविद्या, अज्ञान किंवा माया जी असते तिला वश झाल्यामुळें दुष्टबुद्धि झालेले लोक नित्य जो आत्मा त्याचा तिरस्कार करितात; म्हणजे आत्मस्वरूपाचा विचारच करीत नाहींत. म्हणून त्या पापी लोकांस लक्षणेनें आत्मघाती असें म्हटलें आहे. नेहमीं राहणारी जी सद्वस्तु, जो आत्मा, तो कळला असतां ‘ मी अज आहें, मी अमर आहें ’ इत्यादि फळें वरील दुर्दैवी मायावश मनुष्यास मिळत नाहींत, म्हणूनही या अज्ञ आणि प्राकृत लोकांस आत्मघाती असें म्हटलें आहे. अर्थातच या दोषानें ते लोक अज्ञान-जन्य संसारांत, जन्ममरणाच्या फेऱ्यांत, सांपडतात ॥ ३ ॥

---

यस्याऽऽत्मनो हननादविद्वांसः संसरन्ति, तद्विपर्ययेण विद्वांसो जना मुच्यन्ते ते नाऽऽत्महनः । तत्कीदृशमात्मतत्त्वमित्युच्यते—

शिष्य—ज्या आत्म्याचा घात करून अविद्वान् लोक जन्ममरणांत सांपडतात व ज्या आत्म्याच्या, स्वानुभवानें विद्वान् लोक मुक्त होतात व आत्मघाती होत नाहींत, तो आत्मा व तें आत्मतत्त्व काय हें मला समजून सांगाल ? भगवन् !

गुरु—एक मी काय सांगतों तें:—

**अनेजदेकं मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्षत् ।**
**तद्धावतोऽन्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति ४**

**पदान्वयार्थ—अनेजत्** ( कंप होणें, हालचाल होणें, विकार पावणें, हें नाहीं ज्याला असें ) **एकं** ( अद्वितीय, ) **मनसः** ( मनापेक्षां ) **जवीयः** अत्यंत चपल ) **एतत्** ( ह्या अमृतत्वाला ) **देवाः** ( प्रकाशणारीं नेत्र इत्यादि इंद्रियें ) **न आप्नुवन्** ( मिळवूं शकलीं नाहींत.—इंद्रियांस हें आत्मतत्त्व गोचर होत नाहीं. ) कारण **पूर्वं** ( पूर्वींच ) **अर्षत्** ( गेलेलें आहे असें हें,–तत्त्व आहे–). म्हणजे इंद्रियें हीं मनाशिवाय आपआपलीं कामें करूं शकत नाहींत. आत्मतत्त्व हें मनापेक्षांही चपल आहे. तेव्हां इंद्रियांचा व्यापार सुरू होण्यापूर्वींच तें इंद्रियांच्या विषयांत शिरलेलें असतें.— **तत्** ( तें—आत्मतत्त्व—) **धावतः** ( लवकर लवकर चालूं लागणारीं ) **अन्यान्** ( आत्म्याशिवाय बुद्धि, मन, इंद्रियें यांस ) **अत्येति** ( पाठीमागें टाकितें ). **तिष्ठत्** ( अविक्रिय स्थितीमध्यें राहणारें, अविकारी, जें आत्मतत्त्व अविकारी आहे. ) **तस्मिन्** ( त्या आत्मतत्त्वामध्यें ) **मातरिश्वा** ( अंतरिक्षामध्यें गमन करणारा वायु ) **अपः** ( आपलें कर्म ) **दधाति** (धारण करितो ) आत्मा हा इंद्रियें, मन, बुद्धि यांस अगोचरच आहे आणि या आत्म्यामध्यें वायु आपलें काम म्हणजे प्राणिमात्राकडून हालचाल करण्याचें काम करितो.—

**भा०—अनेजदिति । अनेजत् न एजत् । एजृ कम्पने । कम्पनं चलनं स्वावस्थाप्रच्युतिस्तद्वर्जितं सर्वदैकरूपमित्यर्थः । तच्चैकं सर्वभूतेषु मनसः संकल्पादिलक्षणाज्जवीयो जववत्तरम् । कथं विरुद्धमुच्यते ध्रुवं निश्चलमिदं मनसो जवीय इति च । नैष दोषः । निरुपाध्युपाधिमत्त्वेनोपपत्तेः । तत्र निरुपाधिकेन स्वेन रूपेणोच्यतेऽनेजदेकमिति । मनसोऽन्तःकरणस्य संकल्पविकल्पलक्षणस्योपाधेरनुवर्तनादिह देहस्थस्य मनसो ब्रह्मलोकादिदूरगमनं संकल्पेन क्षणमात्राद्भवतीत्यतो मनसो जविष्ठत्वं लोके प्रसिद्धम् । तस्मिन्मनसि ब्रह्मलोकादीन्द्रुतं गच्छति सति प्रथमं प्राप्त इवाऽऽत्मचैतन्यावभासो गृह्यतेऽतो मनसो जवीय इत्याह नैनद्देवा द्योतनाद्देवाश्चक्षुरादीनीन्द्रियाण्येतत्प्रकृतमात्मतत्त्वं नाऽऽप्नुवन्न प्राप्तवन्तः । तेभ्यो मनो जवीयो मनोव्यापारव्यवहितत्वात् । आभासमात्रमप्यात्मनो नैव देवानां विषयीभवति । यस्माज्जवनान्मनसोऽपि पूर्वमर्षत्पूर्वमेव गतम् । व्योमवद्व्यापित्वात् । सर्वव्यापि तदात्मतत्त्वं सर्वसंसारधर्मवर्जितं स्वेन निरुपाधिकेन स्वरूपेणाविक्रियमेव सदुपाधिकृताः सर्वाः संसारविक्रिया अनुभवतीवा-**

विवेकिनां मूढानामनेकमिव च प्रतिदेहं प्रत्यवभासत इत्येतदाह। तद्धावतो द्रुतं गच्छतोऽन्यानात्मविलक्षणान्मनोवागिन्द्रियप्रभृतीनत्येति, अतीत्य गच्छतीव। इवार्थं स्वयमेव दर्शयति तिष्ठदिति। स्वयमविक्रियमेव सदित्यर्थः। तस्मिन्नात्मतत्त्वे सति नित्यचैतन्यस्वभावे मातरिश्वा मातर्यन्तरिक्षे श्वयति गच्छतीति मातरिश्वा वायुः सर्वप्राणभृत्क्रियात्मको यदाश्रयाणि कार्यकरणजातानि यस्मिन्नोतानि प्रोतानि च यत्सूत्रसंज्ञकं सर्वस्य जगतो विधारयितृ स मातरिश्वा। अपः कर्माणि प्राणिनां चेष्टालक्षणानि। अग्न्यादित्यपर्जन्यादीनां ज्वलनदहनप्रकाशाभिवर्षणादिलक्षणानि दधाति विभजतीत्यर्थः। धारयतीति वा। "भीषाऽस्माद्वातः पवते" इत्यादिश्रुतिभ्यः। सर्वा हि कार्यकारणादिविक्रिया नित्यचैतन्यात्मस्वरूपे सर्वास्पदभूते सत्येव भवन्तीत्यर्थः॥ ४॥

भाष्यार्थ—एजत् म्हणजे कांपणें, हलणें, चळणें, आपल्या अवस्थेपासून भ्रष्ट होणें होय. तें भ्रष्ट होणें ज्याला नाहीं, सर्वदा जें एकच स्वरूपानें राहतें तें आत्मतत्त्व होय. आत्मतत्त्व सर्व भूतांमध्यें एकच आहे. सारांश, एकच आत्मतत्त्व सर्वदा निर्व्यापारांत राहणारें आहे; आणखी तें तत्त्व असें आहे कीं संकल्प करणारें जें मन त्याच्यापेक्षां अत्यंत चपल आहे. मनापेक्षां हें आत्मतत्त्व चपल आहे.

शिष्य—महाराज! आपण हीं लक्षणें सांगितलीं हीं मला समजलीं नाहींत. आत्मतत्त्व स्थिर असून मनापेक्षां चपल आहे असें आपण म्हणतां. हीं परस्पर-विरोधी लक्षणें एका ठिकाणीं संभवतील कशीं? आत्मा ध्रुव व निश्चल आहे असें म्हणून लागलीच तो मनापेक्षां चपल आहे असें सांगतां. हें कसें? उपनिषद्काराची येथें कांहीं तरी चूक झाली आहे. किंवा या शब्दाचा अर्थ तरी निराळा आहे.

गुरु—अरे वत्सा! शब्दाचा अर्थ जो आम्हीं सांगितला तोच आहे व मंत्रकारही चुकले नाहींत. तुला जो विरोध दिसतो तो खरा नाहीं. तुला मंत्रद्रष्टयांचा सूक्ष्म अभिप्राय कळला नाहीं. अरे! असें पहाः—सर्वथा उपाधि नाहीं असें जें आत्मतत्त्व आहे, तें उपाधिरहित अशा स्वस्वरूपीं एकच असल्यामुळें स्थिर आहे हें तुला कळलेंच आहे. आतां त्या निरुपाधि आत्म्याला आपण सोपाधिक मनानें पहातों म्हणून आत्मा चपल आहे असा ज्ञानाभास होतो. समजलें?

शिष्य—नाहीं, मला कांहीं समजलें नाहीं.

गुरु—अरे! स्वरूपापासून चळणें हें ज्याला कधींच शक्य नाहीं असा आत्मा आहे हें तरी तुला समजलेंना? बरें. आतां मनाचे धर्म काय आहेत ते तुला अवगतच आहेत. कांहीं तरी संकल्प, संकेत, इच्छा, व निश्चय करावा. पुनः

संशय घ्यावा हा मनाचा व्यापार सारखा चाललेला असतो. सारांश, विकार पावणें ही उपाधि मनाच्या पाठीमागें नेहमी आहे म्हणून हें मन देहांत राहूनच बाहेर नेहमीं भटकत असतें.

शिष्य–हें कसें? देहांत राहून तें बाहेर जातें कसें व चपलत्वही त्याला कसें येतें?

गुरु—अरे! तें संकल्पात्मक आहेना? त्याला कल्पनाशक्ति आहे म्हणून तें देहांत राहूनच कल्पनेच्या साह्याय्यानें एका क्षणमात्रांत ब्रह्मलोकापर्यंत दूर जातें. तूं काशी पाहिलीसच आहेस. बरें, आतां मनांत आल्याबरोबर तूं कल्पनेनें काशीस जाऊन परत एका क्षणांत येतोसच कीं नाहीं? हीच मनाची गति आहे. अर्थातच त्याच्या इतकें जलद कोणासच चालवत नाहीं. म्हणून त्याची गति अति चपल असें म्हणतात. आतां हें अत्यंत शीघ्र गमन करणारें मन ब्रह्मलोकाला एका क्षणार्धांत जातें आणि पाहतें, तों तेथें चैतन्य आपल्या आधींच तेथें बसलेलें आहे! [ पहा श्वेताश्वतर ३।१९ ] म्हणजे आत्म्याला प्रथम एका ठिकाणीं पाहून, नंतर मन ब्रह्मलोकाइतकें दूर एका निमिषांत जातें, तरी त्या लोकीं आत्मदर्शन त्यास होतेंच! म्हणून मनापेक्षां आत्मा चपल आहे असें कां म्हणतां येणार नाहीं?

शिष्य—हा वेगवान् आत्मा, तर मग आपल्या इंद्रियांस गोचर झालाच पाहिजे; कारण जलद चालणें हें कोणी तरी पाहिलेंच पाहिजे कीं नको?

गुरु—छेः रे! ह्या ज्ञानाचा प्रकाश पाडणाऱ्या इंद्रियांपैकीं कोणालाही आत्मदर्शन घेण्याचा अधिकार नाहीं; कारण इंद्रियांचे सर्व व्यापार मनाच्या साह्याय्यानें चालतात. मन नसलें कीं, इंद्रियें व्यापारशून्य होतील. आतां मनालाही ज्याची गति अगोचर तो आत्मा मनाच्या जोरावर चालणाऱ्या इंद्रियांस कसा सांपडणार? म्हणून अर्थातच आत्म्याचा आभाससुद्धां इंद्रियांचा विषय होऊं शकत नाहीं. सारांश, इंद्रियांस आत्म्याचें आकलन होत नाहीं. तात्पर्य, आत्मतत्त्व सर्वत्र घनदाट भरलेलें आहे, आकाशासारखें तें सर्वव्यापी असल्यामुळें, तें मनापेक्षां चपल आहे असें म्हटलें; आणि म्हणून इंद्रियांस त्याचा अंशमात्रसुद्धां कळत नाहीं! [ पहा केनोपनिषत् ४ ] असो; तेव्हां हें सर्वव्यापी आत्मतत्त्व संसारधर्मांपासून, जन्ममरणादि सर्व विक्रियांपासून अलिप्त आहे. कारण त्याला कोणताच उपाधि नाहीं. अतएव तें स्वस्वरूपांत नित्य स्थित असतें. तथापि जे अविवेकी म्हणजे विचारशून्य मूढ असतात त्या बेट्यांना मात्र वाटत असतें कीं ह्या एक व निरुपाधिक आत्म्याला जन्ममरणादिक सर्व संसाराचे विकार होतात आणि तो प्रत्येक शरीरामध्यें एक एक असल्यामुळें आत्मे अनेक आहेत! ह्यांच्या समाधानासाठीं म्हणतातः—आत्म्याचीं लक्षणें अगर चिन्हें ज्यांस नाहींत अशीं आपलीं ज्ञानेंद्रियें, वाणी, मन अगर बुद्धि या सर्वांपेक्षां आत्मा अतिशय लवकर धांवतो असा दिसतो.

शिष्य—भगवन् ! धांवतोसा असा कोठें बरें अर्थ आहे ? नुसता धांवतो असाच अर्थ आहे, आणि त्यावरून आत्मा क्रिया करणारा आहे, असेंच मंत्रकाराचें म्हणणें असलें पाहिजे; नाहीं बरें ?

गुरु—हा वेड्या ! व्याकरणाच्या जोरावर तूं भलता अर्थ करीत आहेस झालें ! अरे 'तिष्ठत्' जेथल्या तेथेंच असून असा पुढचा शब्द आहे, त्याचा संबंध घेऊन नको का अर्थ करावयाला ? अरे स्वतः अविक्रिय असूनही, कोणतीही क्रिया न करितांही, 'तो पळतो' असें म्हटलें आहे, त्यावरून तो 'पळतोसा दिसतो' असा नकोका अर्थ करावयाला ? असो, तेव्हां हा आत्मा अत्यंत अविकृत असतो. याला विकार होत नाहीं, हें ठरलें. पुढें सांगतात कीं, हा नित्य चैतन्य आहे. म्हणून अंतरिक्षामध्यें भ्रमण करणारा वायु सर्वप्रवर्तक होतो. तो सर्व प्राणिमात्रास क्रिया करण्याचें सामर्थ्य देतो, म्हणजे त्याच्याच सत्तेनें सर्व व्यवहार चालतात; तसेंच त्याच्याच आश्रयानें कारणवस्तु व कार्यवस्तु सर्वत्र ओतप्रोत भरल्या असून आपापले व्यापार चालवितात आणि तो सर्व जगाचें अथवा विश्वाचें आधारसूत्र आहे. तो हा मातरिश्वा अगर वायु होय. ह्यालाच सूत्रात्मा अगर हिरण्यगर्भ लक्षणेनें म्हणावें. असो; तेव्हां हा वायु, हा सूत्रात्मा, हा हिरण्यगर्भ किंवा परमेश्वरच होय. ह्याच्या सत्तेनें सर्व प्राणिमात्रास चलन वलन शक्ति उत्पन्न होते व अग्नि, सूर्य, पर्जन्य इत्यादिकांस जळणें, दहन करणें, प्रकाश देणें, वृष्टि करणें वगैरे क्रिया विभागून देऊन आत्मा हा त्यांच्या करवीं क्रिया करवितो. 'याच्या भीतीनेंच वायु वाहतो' इत्यादि श्रुतींवरून हाच अर्थ दृढ होतो. तेव्हां सारांश काय कीं हा वायु अगर हिरण्यगर्भ परमेश्वरच वर सांगितलेला नित्यचैतन्यरूपी आत्मा असतांनाही ह्या सर्व कर्मांचा अधिपति होतो. म्हणजे कार्यकारणरूपी जे यच्चयावत् विकार आहेत त्या सर्वांस आधार जो आत्मा त्याच्याच सत्तेनें सर्व क्रिया होतात, सर्वव्यापी, चैतन्यस्वरूपी, विकारशून्य आत्मा दृश्यवस्तूंच्या आधाराशीं आहे म्हणून व्यवहारांतील सर्व क्रिया चालतात असें आपल्यास दिसतें. ॥ ४ ॥

---

**न मन्त्राणां जामिताऽस्तीति पूर्वमन्त्रोक्तमप्यर्थं पुनराह—**

मंत्राचा अर्थ पुनः पुनः मनाच्या दृढीकरणासाठीं ( श्रुतीचें मनुष्यावर मातेसारखें प्रेम आहे ! ) सांगितला तरी दोष नाहीं म्हणून मागील मंत्रांतीलच अर्थ पुनः सांगतातः—

**तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके ॥**
**तदन्तरस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः ॥ ५ ॥**

**पदान्वयार्थः**—तत् ( तें-आत्मतत्त्व. ) एजति ( चलन पावतें ); तत् ( तें ) न एजति ( चलन पावत नाहीं, स्थिर असतें ); तत् ( तें ) दूरे ( दूर आहे ); तत् ( तें ) उ अन्तिके ( जवळ आहे. ) तत् ( तें ) अस्य ( ह्या ) सर्वस्य ( सर्वांच्या ) अन्तः ( अंतर्यामीं आहे ); तत् (तें) उ अस्य सर्वस्य ( ह्या सर्वांच्या ) बाह्यतः (बाह्य प्रदेशींही आहे.); सारांश, आत्मा विकार पावतो आणि पावत नाहीं ! तो दूर असून अत्यंत जवळ आहे. तो सर्व विश्वाच्या अंतर्भागीं असून बाह्यभागींही ओतप्रोत भरलेला आहे.

भा०—तदेजतीति । तदात्मतत्त्वं यत्प्रकृतं तदेजति चलति, तदेव च नैजति स्वतो नैव चलति, स्वतोऽचलमेव सच्चलतीवेत्यर्थः । किंच तद्दूरे वर्षकोटिशतैरप्यविदुषामप्राप्यत्वाद्दूर इव । तत् उ अन्तिके इति च्छेदः, तद्वन्तिके समीपेऽत्यन्तमेव विदुषामात्मत्वान्न केवलं दूरेऽन्तिके च । तदन्तरभ्यन्तरेऽस्य सर्वस्य "य आत्मा सर्वान्तरः" अस्य सर्वस्य जगतो नामरूपक्रियात्मकस्य । तदु अपि सर्वस्यास्य बाह्यतो व्यापकत्वादाकाशवन्निरतिशयसूक्ष्मत्वादन्तः प्रज्ञानघन एवेति च शासनान्निरन्तरं च ॥ ५ ॥

**भाष्यार्थ**—आपण ज्याच्याविषयीं बोलत आहोंत, तें आत्मतत्त्व चपल आहे, पण स्वतः चपल नाहीं ! म्हणजे स्वतः अचल असूनही चपल असल्यासारखें दिसतें, अविकारी असून, विकारी आहे असें अज्ञ मनुष्यास भासतें हा अर्थ होय. आणखी अविद्वान् लोकांस—अनात्मज्ञ लोकांस—हें आत्मतत्त्व इतकें दूर आहे कीं त्यांनीं शेंकडों कोट वर्षें खटपट केली तरी त्यांस प्राप्त व्हावयाचें नाहीं ! [ पहा भगवद्गीता अ० १२ श्लोक १३।१४ ] पण जे विद्वान् आहेत, ज्यांनीं आत्मतत्त्वाची ओळख करून घेतली आहे, त्यांस तें दूर आहे असें नाहीं तर त्यांच्या तें अत्यंत निकट आहे. म्हणजे विद्वानच तें आत्मतत्त्व होत ! याचप्रमाणें तें आत्मतत्त्व सर्वांच्या ( नाम आणि रूप ज्यास आहे अशा सर्व जगाच्या, विश्वाच्या ) अंतर्यामी आहे. ' आत्मा सर्वांच्या अभ्यंतरीं आहे.' अशी श्रुतिच आहे. तसेंच तें आत्मतत्त्व सर्व वस्तूंस बाहेरूनही आच्छादून राहिलें आहे. आकाश जसें सर्वांस अंतर्बाह्य व्यापून टाकितें तसेंच आत्मतत्त्वही सर्वांस व्यापितें. सारांश, तें आकाशाप्रमाणें अत्यंत व्यापक आहे, व तें आत्मतत्त्व अतिशय सूक्ष्म असल्यामुळें सर्व विश्वाच्या अत्यंत सूक्ष्मपदार्थापासून तों ब्रह्माण्डापर्यंत सर्व पदार्थांच्या अंतर्यामांतही आहे. आणि 'आत्मा प्रज्ञानघन आहे ' ( सर्वत्र ज्ञानस्वरूपानें ओतप्रोत भरला आहे ) अशी श्रुति आहे म्हणून तो आत्मा निरन्तर घनदाट पसरलेला आहे. आत्मा नाहीं असा एक अत्यंत सूक्ष्म बिंदु सुद्धां सांपडणार नाहीं, हें तात्पर्य आहे.

शिष्य—तर मग आत्मा एकस्वरूपी नाहीं ?

गुरु—कां ? 'तो एकस्वरूपानें—सामरस्यानें घनदाट भरलेला आहे' ही श्रुति विसरलास वाटतें ? तो निरंतर म्हणजे एक अणूलाही न सोडतां सर्वत्र एक स्वरूपानें भरलेला आहे. सारांश, आत्मा हा अविकारी असून विकारीसा दिसतो, अतिशय जवळ असून फार लांब आहेसा वाटतो, आणि तो सर्व विश्वाच्या आंत बाहेर घनदाट भरून राहिला आहे. ॥ ५ ॥

---

**यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ॥**
**सर्वभूतेषु चाऽऽत्मानं ततो न विजुगुप्सते ॥ ६ ॥**

**पदान्वयार्थः**—**तु** ( पण) **आत्मनि एव** ( आत्म्यामध्येंच, परब्रह्म-स्वरूपामध्येंच) **सर्वाणि** ( सर्व ) **भूतानि** (शरीर धारण करणारे यच्चयावत् पदार्थ—आहेत असें ) **च** (आणि) **सर्वभूतेषु** ( सर्व भूतांमध्यें ) **आत्मानं** ( आत्म्याला, आत्मा, ब्रह्म—आहे, असें ) **यः** ( जो ) **अनुपश्यति** (विचारदृष्टीनें पाहतो )—तो—**ततः** ( असें ज्ञान झाल्यावर ) **न विजुगुप्सते** (—कधींही शोकमोहादिकांनीं—लज्जायुक्त अगर कृपायुक्त होत नाहीं. ) सारांश, सर्वविश्वामध्यें परब्रह्म आहे आणि ब्रह्मामध्यें सर्व विश्व आहे, म्हणजे एकच ब्रह्म आहे, असें ज्याला विवेकदृष्टीनें समजलें त्या जीवन्मुक्ताला—अज्ञान नसल्यामुळें—शोकमोहादिकांचें कारणच उरत नाहीं.—

भा०—यस्तु यः परिव्राण्मुमुक्षुः सर्वाणि भूतान्यव्यक्तादीनि स्थावरान्तान्यात्मन्येवानुपश्यत्यात्मव्यतिरिक्तानि न पश्यतीत्यर्थः । सर्वभूतेषु च तेष्वेव चाऽऽत्मानं तेषामपि भूतानां स्वमात्मानमात्मत्वेन यथाऽस्य देहस्य कार्यकारणसंघातस्याऽऽत्माऽहं सर्वप्रत्ययसाक्षीभूतश्चेतयिता केवलो निर्गुणोऽनेनैव स्वरूपेणाव्यक्तादीनां स्थावरान्तानामहमेवाऽऽत्मेति सर्वभूतेषु चाऽऽत्मानं निर्विशेषं यस्त्वनुपश्यति स ततस्तस्मादेव दर्शनान्न विजुगुप्सते विजुगुप्सां घृणां न करोति । प्राप्तस्यैवानुवादोऽयम् । सर्वा हि घृणाऽऽत्मनोऽन्यद्दुष्टं पश्यतो भवत्यात्मानमेवात्यन्तविशुद्धं निरन्तरं पश्यतो न घृणानिमित्तमर्थान्तरमस्तीति प्राप्तमेव । ततो न विजुगुप्सत इति ॥ ६ ॥

**भाष्यार्थ**—ज्याप्रमाणें या माझ्या देहाचा—कार्य आणि कारण हीं एकत्र होऊन दृश्यमान झालेल्या या माझ्या देहाचा—मी आत्मा आहें; त्या मन, बुद्धि,

व इंद्रियांसहित असणाऱ्या देहाला जें जें ज्ञान होतें, अगर अनुभव येतो त्याचा मी आत्माच साक्षी आहें, चेतना उत्पन्न करणारा आत्माच आहे, तो उपाधिशून्य आहे व निर्गुण आहे, असें मला समजतें; त्याचप्रमाणें अगदीं मूळच्या अव्यक्त प्रकृतीपासून तों स्थावर ( दगड धोंडे ) येथपर्यंत सर्व पदार्थमात्र आत्मस्वरूपांतच आहेत, आत्म्यावांचून वेगळे नाहींत, असें ज्या परमहंस मुमुक्षूला विचारपूर्वक ज्ञान स्वानुभवानें होतें, व त्याचप्रमाणें आत्मा हाही त्या सर्व पदार्थमात्रामध्यें भरलेला आहे, पदार्थांशिवाय आत्मा निराळा नाहीं व तोही मीच आहें, माझ्या शिवाय अन्य कोणीच नाहीं, असें ज्याला स्वानुभवपूर्वक ज्ञान होतें; सारांश, 'ब्रह्मच आहे' 'त्याशिवाय कांहीं नाहीं' असें स्वानुभवानें ज्याला समजतें त्याला संताप, शोक अगर दया उत्पन्न होण्याचें कारणच रहात नाहीं. हेतु उघडच आहे कीं जो आत्मव्यतिरिक्त दुसरें कांहीं अनित्य आहे, असें पाहतो त्याला शोक अगर दया उत्पन्न होणार. पण सर्वत्र एकसारखें आत्मतत्त्व भरलेलें आहे.—मी आनंदस्वरूपी, चित्तत्त्व आहें—असें जो पाहतो, त्याला शोकमोह उत्पन्न करील असलें दुसरें कारणच राहत नाहीं, हें सिद्धच झालें. ( पहा बृहदारण्यक, कैवल्यश्रुति व मुण्डकश्रुति. ) म्हणून जीवन्मुक्ताला निंदा–स्तुति यांचा खेद वगैरे उत्पन्न होत नाहीं, हें नीटच आहे. उघड रीतीनें जो सिद्धान्त प्राप्त झाला त्याचा हा अनुवाद आहे. आत्म्याशिवाय दुसरें कांहीं आहे व तें मलिन आहे, असें जो पाहतो त्याला लज्जा अगर द्वेष उत्पन्न होईल. पण नेहमीं अत्यंत निर्मळ अशा घनदाट पसरलेल्या आत्म्यालाच जो सर्वत्र पाहतो, त्याला लज्जा उत्पन्न करणारा दुसरा पदार्थच नसतो, म्हणून ती उत्पन्न होत नाहीं. ॥ ६ ॥

---

इममेवार्थमन्योऽपि मन्त्र आह—

हाच अर्थ पुढील मंत्रांत सांगतात:—

**यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः ॥**

**तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ॥ ७ ॥**

**पदान्वयार्थ—यस्मिन्** ( ज्या काळीं, जेव्हां, किंवा ज्या आत्म्यामध्यें ) **विजानतः** ( विद्वान् पुरुषाचा, विद्वान् पुरुषाला ) **सर्वाणि भूतानि** ( यच्चयावत् सर्वपदार्थमात्र हे ) **आत्मा एव** (आत्मा हाच) **अभूत्** (झाला)—म्हणजे ज्या विद्वान् पुरुषाला सर्व पदार्थ आत्ममयच दिसूं लागले—**तत्र** ( त्या काळीं, तेव्हां, किंवा त्या स्वस्वरूपामध्यें ) **एकत्वं** ( एकपणा आहे असें ) **अनुपश्यतः** ( विचारपूर्वक पाहणाऱ्याला ) **को मोहः** ( मोह

कोठील ?)–अगर–कः शोकः (शोक तरी कसला ?)–ब्रह्मय पाहणाऱ्याला अर्थातच शोक नाहीं आणि मोहही नाहीं—

**भा०—यस्मिन्निति । यस्मिन्सर्वाणि भूतानि । यस्मिन्काले यथोक्तात्मनि वा तान्येव भूतानि सर्वाणि परमार्थात्मदर्शनादात्मैवाभूदात्मैव संवृत्तः परमार्थवस्तु विजानतस्तत्र तस्मिन्काले तत्राऽऽत्मनि वा को मोहः कः शोकः । शोकश्च मोहश्च कामकर्मबीजमजानतो भवति । न त्वात्मैकत्वं विशुद्धं गगनोपमं पश्यतः । को मोहः कः शोक इति शोकमोहयोरविद्याकार्ययोराक्षेपेणासंभवप्रदर्शनात् । सकारणस्य संसारस्यात्यन्तमेवोच्छेदः प्रदर्शितो भवति ॥ ७ ॥**

भाष्यार्थ—सर्व चराचरपदार्थांचें खरें आणि मूळस्वरूप समजल्यामुळें, सर्व पदार्थ आत्मस्वरूपीच आहेत. अशा रीतीनें सद्वस्तूचें जेव्हां ज्ञान होतें, तेव्हां त्या पुरुषाला शोक, मोह कोठून प्राप्त होणार ? 'यस्मिन्' आणि 'तत्र' या शब्दांचा दुसरा अर्थ आचार्यांनीं 'ज्या पूर्वोक्त आत्मस्वरूपामध्यें' व 'त्या आत्म्यामध्यें' असा केला आहे. तात्पर्य एकच आहे. सर्व भूतें आत्मस्वरूपीच आहेत असें जेव्हां किंवा ज्या आत्म्याचें ज्ञान होतें, तेव्हां–किंवा त्या आत्म्या-संबंधानें–शोक–मोह उत्पन्नच होणें शक्य नाहीं. आत्मा हा शुद्ध आनंद-स्वरूपी आहे; व त्याला दुःखाचा स्पर्शसुद्धां होत नाहीं असें ज्याला समजलें नाहीं, त्याचप्रमाणें काम, व कर्म यांचें जें बीज अविद्या (अज्ञान) हें निवृत्त न झाल्यामुळें इच्छा, आशा, ठेवून कर्म केलें असतां, शोक, मोह उत्पन्न होतात हें ज्याला समजलें नाहीं, अशा अज्ञानी मनुष्याला 'अमुक गोष्ट साध्य झाली नाहीं म्हणून शोक होतो,' व–'आतां काय करूं ?' असें झालें म्हणजे–मोह होतो. पण ज्याला कांहीं साध्यच करून घ्यावयाचें नाहीं; व आत्मा आकाशा-सारखा निर्मळ असून एकच आहे, येथें दुसरें कांहींच नाहीं, जसें ज्याला समजलें त्याला शोक तरी कसला होईल, अगर मोह तरी कोठून प्राप्त होईल ? शोक, मोह हीं दोन्हीं अविद्येचीं, अज्ञानाचीं, मायेचीं, कार्यें आहेत. ज्ञानी मनुष्याला अज्ञान कसें बाधणार ? अर्थात् बाधण्याचा बिलकुल संभवच नाहीं. यावरून या मंत्रांत सकारण जो संसार किंवा अनित्य असें सदैव अज्ञानाचे पाठीमागें लागलेलें जन्ममरण, त्याचा अत्यंत उच्छेद केला आहे, संसार नाहींसा केला आहे, संसाराचें कारण जी आशा तिचा समूळ नाश विद्वानानें केला आहे, असें सांगावयाचें आहे ॥ ७ ॥

योऽयमतीतैर्मन्त्रैरुक्त आत्मा स स्वेन रूपेण किंलक्षण इत्याहायं मन्त्रः—

शिष्य—मागील मंत्रांत आत्मा म्हणून जो सांगितला आहे त्याचें, स्वस्वरूपाचें, लक्षण काय आहे बरें ? आत्म्याचें लक्षण काय आहे तें कृपा करून सांगावें.

गुरु—उत्तम प्रश्न विचारलास. सांगतों. ऐक हा मंत्रः—

**स पर्यगाच्छुक्रमकायमव्रण-**
**मस्नाविरँ शुद्धमपापविद्धम् ॥**
**कविर्मनीषी परिभूः स्वयंभूर्याथा-**
**तथ्यतोऽर्थान्व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥८॥**

**पदान्वयार्थ—सः** ( तो ) **पर्यगात्** (समोंवार सर्वत्र गेलेला, आकाशाप्रमाणें सर्वव्यापी, सर्वत्र विद्यमान असणारा, आहे; तशींच आणखी लक्षणें सांगतात— ) — तो—**शुक्रं** ( शुद्ध आहे ) **अकायं** ( त्याला लिंगशरीर* नाहीं ) **अक्षतं** ( त्याला कधींही क्षत पडत नाहीं ) **अस्नाविरं** ( किंवा त्याला शिरा, स्नायु, असें कांहीं नाहीं ) **शुद्धं** ( शुद्ध, निर्मळ ) **अपापविद्धं** ( कोणत्याही पापानें तो लिप्त झाला नाहीं ) **कविः** ( शहाणा ) **मनीषी** ( मनावर सत्ता चालविणारा ) **परिभूः** ( सर्व—श्रेष्ठ—असणारा ) **स्वयंभूः** (स्वतःसिद्ध)—असा असून त्यानें—**शाश्वतीभ्यः** (नित्य असणारे जे) **समाभ्यः** ( संवत्सर, त्यांस ) **याथातथ्यतः** ( ज्यांची जशी योग्यता आहे तशीं ) **अर्थान्** ( कर्तव्यकर्में ) **व्यदधात्** ( विभागून टाकिलीं आहेत. ) सारांश, आत्मा हा सर्वव्यापी, शुद्ध, शरीरशून्य, निर्मळ, पापशून्य, सर्वद्रष्टा, सर्वगामी, स्वयंभू असा असून त्याच्याच सत्तेनें हें सर्व चराचर विश्व आपआपलीं कामें नियमितपणें करित आहे.—

**भा०—स पर्यगादित्यादि । स यथोक्त आत्मा पर्यगात्परि समन्तादगाद्गतवानाकाशवद्व्यापीत्यर्थः । शुक्रं शुद्धं ज्योतिष्मद्दी-**

---

* प्राणिमात्रास तीन शरीरें असतात. एक स्थूलशरीर, दुसरें लिंगशरीर आणि तिसरें कारणशरीर, अशीं हीं तीन शरीरें होत; स्थूलशरीर हें तर सर्वांस दिसतेंच आहे; लिंगशरीर अंगुष्ठमात्र असून मनुष्याच्या मनोवृत्ति, आशा यांनीं बनलेलें आहे, व हा देहपात झाला तरी कांहीं काळपर्यंत हें लिंगशरीर विद्यमान असतें. कारणशरीर हें मनुष्याच्या कर्मानें बनलेलें आहे. ह्यालाच जीव म्हणतात. याला कर्माप्रमाणें पुनर्जन्म प्राप्त होत असतें असें शास्त्रकारांचें मत आहे.

तिमानित्यर्थः। अकायमशरीरो लिङ्गशरीरवर्जित इत्यर्थः। अव्रणमक्षतम्। अस्नाविरं स्नावाः शिरा यस्मिन्न विद्यन्त इत्यस्नाविरम्। अव्रणमस्नाविरमित्याभ्यां स्थूलशरीरप्रतिषेधः। शुद्धं निर्मलमविद्यामलरहितमिति कारणशरीरप्रतिषेधः। अपापविद्धं धर्माधर्मादिपापवर्जितम्। शुक्रमित्यादीनि वचांसि पुंलिङ्गत्वेन परिणेयानि। स पर्यगादित्युपक्रम्य कविर्मनीषीत्यादिना पुंलिङ्गत्वेनोपसंहारात्। कविः क्रान्तदर्शी सर्वदृक्। "नान्योऽतोऽस्ति द्रष्टा" इत्यादिश्रुतेः। मनीषी मनस ईषिता सर्वज्ञ ईश्वर इत्यर्थः। परिभूः सर्वेषां पर्युपरि भवतीति परिभूः। स्वयंभूः स्वयमेव भवतीति येषामुपरि भवति यश्चोपरि भवति स सर्वः स्वयमेव भवतीति स्वयंभूः। स नित्यमुक्त ईश्वरो याथातथ्यतः सर्वज्ञत्वाद्यथातथा भावो याथातथ्यं तस्माद्यथाभूतकर्मफलसाधनतोऽर्थान्कर्तव्यपदार्थान्व्यदधाद्विहितवान्यथानुरूपं व्यभजदित्यर्थः। शाश्वतीभ्यो नित्याभ्यः समाभ्यः संवत्सराख्येभ्यः प्रजापतिभ्य इत्यर्थः॥ ८॥

भाष्यार्थ—याप्रमाणें मागील मंत्रांत सांगितलेला आत्मा हा सर्वत्र विद्यमान असल्यामुळें, सर्वगामी—आकाशाप्रमाणें सर्वव्यापी—आहे. तो शुद्ध म्हणजे प्रकाशवंत आहे. (पहा कठ ५।८, श्वेताश्वतर व मुंडकही पहा) तो अशरीर आहे, त्याला लिंगशरीर नाहीं. त्याला कोणत्याही प्रकारचें क्षत पडत नाहीं, व त्याला शिरा, स्नायु, मज्जा, अस्थी वगैरे कांहीं नाहीं; यावरून म्हणजे क्षत न पडणें व शिरा नसणें यांवरून त्याला स्थूलशरीर नाहीं, असें सुचविलें. तसेंच तो निर्मल आहे; कारण अविद्येचा, सत्त्व, रज, आणि तम अशा गुणत्रयात्मक मायेचा, स्पर्शच त्याला नाहीं म्हणून मायेचा मळही त्याला नाहीं; यावरून आत्म्याला कारणशरीरही नाहीं, हें ठरलें. धर्म न केल्यामुळें व अधर्म केल्यामुळें लागणारीं पापें हींही त्याला स्पर्श करीत नाहींत, कारण हें कीं धर्माधर्मांचा त्याला संपर्कच नाहीं. (भगवद्गीता अ० १३ श्लोक ३१, ३२). पहिल्यापासून शेवटपर्यंत आत्म्याचा पुल्लिंगीच प्रयोग असल्यामुळें, मध्यें कांहीं नपुंसकलिंगी विशेषणें आहेत, तीं पुल्लिंगीच आहेत असें समजावें. तो कवि म्हणजे दूरदृष्टि, सर्वद्रष्टा आहे. 'याच्याशिवाय दुसरा द्रष्टा नाहीं,' अशी श्रुतिच आहे (व भगवद्गीता अ० ७ श्लोक २६ ही पहा). प्राणिमात्राच्या मनांत काय आहे तें त्याला समजतें; व सर्वांच्या मनांवर तो स्वामित्व चालवितो, म्हणून तो सर्वज्ञ आहे; व म्हणूनच तो सर्वांवर सत्ता चालविणारा ईश्वर आहे. सर्वांवर त्याची सत्ता आहे. तो सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे, तो कोणापासून उत्पन्न झाला नाहीं, म्हणून स्वयंभू आहे किंवा ज्यांच्यावर तो सत्ता चालवितो ते सर्व पदार्थ; व तो सत्ता चालविणारा, हें सगळें तोच आहे म्हणजे सर्व विश्व तोच आहे, तोच हें सर्व

झाला आहे, असें समजून त्या आत्म्याला स्वयंभू म्हणावें. शेवटीं तो सदैव मुक्त, निर्लेप, असणारा सत्ताधारी ईश्वर सर्वज्ञ आहे, म्हणून चिरंजीव असणारे जे संवत्सर नांवाचे प्रजापति त्यांस त्यांचीं जसजशीं कर्मफलें असतील, त्या त्या साधनानें त्या त्या प्रजापतींस तसतशीं कर्तव्यकर्में सांगून देतो; ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें तो सर्वांस सुखदुःख देतो हा भावार्थ होय. सारांश, कोणत्याही प्रकारचें शरीर नसणारा हा आत्मा सर्वगामी, सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वेश्वर, सर्वशक्तिमान् आणि स्वयंभू आहे असा या मंत्रानें सिद्धान्त केला ॥ ८ ॥

---

असो; याप्रमाणें वरील मंत्राचा अर्थ सांगून झालेल्या मंत्रांतील प्रकरणांचे अर्थ दृष्टीनें होणारे विभाग दाखविण्याच्या हेतूनें पूर्वप्रतिपादित सिद्धान्तांचा अनुवाद आचार्य करितातः—

**भा०—अत्राऽऽद्येन मन्त्रेण सर्वैषणापरित्यागेन ज्ञाननिष्ठोक्ता प्रथमो वेदार्थः। ईशा वास्यमिदं सर्वं, मा गृधः कस्यस्विद्धनमित्यज्ञानां जिजीविषूणां ज्ञाननिष्ठासंभवे कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेदिति कर्मनिष्ठोक्ता द्वितीयो वेदार्थः। अनयोश्च निष्ठयोर्विभागो मन्त्रप्रदर्शितयोर्बृहदारण्यकेऽपि प्रदर्शितः "सोऽकामयत जाया मे स्यात्" इत्यादिना। अज्ञस्य कामिनः कर्माणीति "मन एवास्याऽऽत्मा वाग्जाया" इत्यादिवचनात्। अज्ञत्वं कामित्वं च कर्मनिष्ठस्य निश्चितमवगम्यते। तथा च तत्फलं सप्तान्नसर्गस्तेष्वात्मभावेनाऽऽत्मस्वरूपावस्थानं जायाद्येषणात्रयसंन्यासेन चाऽऽत्मविदां कर्मनिष्ठाप्रातिकूल्येनाऽऽत्मस्वरूपनिष्ठैव दर्शिता "किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्माऽयं लोकः" इत्यादिना। ये तु ज्ञाननिष्ठाः संन्यासिनस्तेभ्योऽसुर्या नाम त इत्यादिनाऽविद्वन्निन्दाद्वारेणाऽऽत्मनो याथात्म्यं स पर्यगादित्येतदन्तैर्मन्त्रैरुपदिष्टम्। ते ह्यत्राधिकृता न कामिन इति। तथा च श्वेताश्वतराणां मन्त्रोपनिषदि—"अत्याश्रमिभ्यः परमं पवित्रं प्रोवाच सम्यगृषिसंघजुष्टम्" इत्यादि विभज्योक्तम्॥**

भाष्यार्थ—सर्व प्रकारच्या वासनांचा परित्याग करण्यास सांगणारा व परमेश्वरानें हें सर्व दृश्य विश्व आच्छादून टाकिलें आहे, तूं कोणत्याही प्रकारच्या धनाची अपेक्षा करूं नको' असें प्रतिपादन करणारा जो या उपनिषदांतील पहिला मंत्र त्यामध्यें ज्ञाननिष्ठा (ज्ञानाच्या साह्यानें ब्रह्मप्राप्ति) सांगितली आहे. परंतु जिवंत राहण्याची इच्छा करणाऱ्या अज्ञानी लोकांस ज्ञाननिष्ठा साध्य होणें कठीण, असें जाणून दुसऱ्या मंत्रामध्यें 'येथें कर्म करावें आणि जिवंत राहण्याची इच्छा करावी' असें सांगून कर्मनिष्ठा (कर्म करून चित्तशुद्धि करावयाची अशी भक्ति)

प्रतिपादन केली आहे. अशा प्रकारें दोन्ही प्रकारच्या निष्ठांचा या मंत्रद्वयामध्यें दिसणारा विभाग बृहदारण्यक उपनिषदांमध्येंही दाखविला आहे. 'मला जाया असावी अशी त्यानें इच्छा केली' 'फलाची आकांक्षा धरणारा जो अज्ञानी पुरुष असतो, त्याच्यासाठीं कर्म सांगितलें आहे; या अज्ञ पुरुषाचा मन हाच आत्मा असतो व प्रत्यक्ष पुत्र, कलत्र, वित्त, वगैरे मिळालें नाहीं तर तोंडानें अगर मनानें तो आपली इच्छा प्रकट करून 'मला जाया हवी' अशी मनांतून इच्छा करितो व तसेंच बोलतो!' यावरून अज्ञानी असणाऱ्या व इच्छा नष्ट न झालेल्या मनुष्यांसच कर्मनिष्ठा सांगितली आहे, व कर्मनिष्ठ असतो तोच अज्ञानी व फलाविषयीं उत्सुक असतो असा सिद्धान्त या वाक्यावरून होतो. व ह्या कर्मांचें फलही त्यांस संसाररूपानें ( सतानसर्ग रूपानें ) मिळतें, म्हणजे ते ममत्वाभिमानास वश होऊन जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतात. असो; आतां या सर्व दृश्यवस्तूंचे ठायीं 'सर्वच आत्मा आहे' अशा भावनेनें सर्वत्र ब्रह्मस्वरूप दिसूं लागलें आणि म्हणून ज्यांनीं पुत्र, मित्र, कलत्रादिकांचा त्याग केला व 'आम्ही पुत्रादिकांस घेऊन काय करावें ? कारण त्यांच्या योगानें आत्मस्वरूपाचें ज्ञान होत नाहीं' असें म्हणणाऱ्या विद्वान् पुरुषास कर्मनिष्ठा अशक्य व प्रतिकूल आहे, म्हणून त्यास आत्मनिष्ठाच सांगितली. सारांश, जे ज्ञाननिष्ठ आहेत, ज्यांनीं सर्व संन्यास केला, ज्यांच्या साठींच 'राक्षसी ते लोक आहेत' इत्यादि मंत्रांच्या द्वारें अज्ञानी लोकांची निंदा केली, त्या विद्वान् पुरुषांस आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान व्हावें म्हणून 'तो सर्वव्यापी आहे' वगैरे मंत्रांनीं उपदेश केला. यावरून ज्ञाननिष्ठा साध्य करून घेण्याला विद्वानासच अधिकार आहे, कर्मी मनुष्यास नाहीं, असें सिद्ध होतें. श्वेताश्वतर उपनिषदामध्येंही म्हटलें आहे. 'अत्यंत उत्कृष्ट असा जो सन्यासाश्रम त्या आश्रमांत असणाऱ्या विद्वानांस हें परमपवित्र आणि वामदेवादि अतिश्रेष्ठ ऋषींनीं सेवन केलेलें—हें—ब्रह्मतत्त्व—प्रकृत विद्वानांस सांगितलें.' यावरूनही कर्मनिष्ठा व ज्ञाननिष्ठा यांच्यामध्यें विभाग केला आहे हें स्पष्ट दिसतें. सारांश, संसारी लोकांस कर्म आणि विरक्त लोकांस आत्मज्ञान असा या उपनिषदांत भेद केला आहे, असें निश्चयानें सांगण्याचा आचार्यांचा हेतु आहे.

**ये तु कर्मिणः कर्मनिष्ठाः कर्म कुर्वन्त एव जिजीविषवस्तेभ्य इदमुच्यते—**

पण जे केवळ कर्म करणारे, कर्म करूनच जिवंत राहण्याची इच्छा करणारे आहेत त्यांच्यासाठीं सांगतात—

**अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते ॥**
**ततो भूय इव ते तमो य उ विद्यायाꣳ रताः ॥ ९ ॥**

**पदान्वयार्थ**—ये ( जे लोक) अविद्यां ( माया, अज्ञान किंवा विद्येहून निराळें जें अज्ञानजन्य कर्म—त्याची) उपासते (उपासना करितात ते) अन्धं

**तमः** (अत्यंत गाढ असा अंधकार त्यामध्यें) **प्रविशन्ति** (प्रवेश करितात.) **ततः** (यापेक्षांही) **भूय इव तमः** (जास्त–गाढ–अंधकारांत) **ते** (ते लोक शिरतात)–कीं–**ये** (जे) **उ** (पण) **विद्यायां** (विद्येमध्यें, देवतांच्या ज्ञानामध्यें मात्र) **रताः** (रममाण झाले.) सारांश, जे कर्ममार्गामध्यें शिरतात, ते गाढ अंधकारामध्यें जाऊन पडतात. पण जे लोक–पूर्णज्ञान झाल्याविना–कर्म सोडून देऊन, केवळ ज्ञानमात्र (शब्दज्ञान मात्र संपादन करितात, किंवा देवतांचें नुसतें ज्ञानमात्र) करून घेतात, ते कर्ममार्गांतील लोकांपेक्षांही जास्त अंधकारांत शिरतात; तात्पर्य, ते जास्त अज्ञानामध्यें व म्हणून संसारामध्यें जाऊन पडतात.–

भा०—अन्धं तम इत्यादि । कथं पुनरेवमवगम्यते न तु सर्वेषामित्युच्यते । अकामिनः साध्यसाधनभेदोपमर्देन "यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः । तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः" इति । यदात्मैकत्वविज्ञानं तन्न केनचित्कर्मणा ज्ञानान्तरेण वा ह्यमूढः समुच्चिचीषति । इह तु समुच्चिचीषयाऽविद्वदादिनिन्दा क्रियते । तत्र च यस्य येन समुच्चयः संभवति न्यायतः शास्त्रतो वा तदिहोच्यते । यद्दैवं वित्तं देवताविषयं ज्ञानं कर्मसंबन्धित्वेनोपन्यस्तं न परमात्मज्ञानम् । विद्यया देवलोक इति पृथक्फलश्रवणात् । तयोर्ज्ञानकर्मणोरिहैकैकानुष्ठाननिन्दा-समुच्चिचीषया न निन्दापरैवैकैकस्य पृथक्फलश्रवणात् । विद्यया तदारोहन्ति । विद्यया देवलोकः । न तत्र दक्षिणायन्ति । कर्मणा पितृलोक इति । न हि शास्त्रविहितं किंचिदकर्तव्यतामियात् । तत्रान्धं तमोऽदर्शनात्मकं तमः प्रविशन्ति । के येऽविद्यां विद्याया अन्याऽविद्या तां कर्मेत्यर्थः । कर्मणो विद्याविरोधित्वात् । तामविद्यामग्निहोत्रादिलक्षणामेव केवलामुपासते तत्पराः सन्तोऽनुतिष्ठन्तीत्यभिप्रायः । ततस्तस्मादन्धात्मकात्तमसो भूय इव बहुतरमेव ते तमः प्रविशन्ति । के । कर्म हित्वा ये उ ये तु विद्यायामेव देवताज्ञान एव रता अभिरताः ॥ ९ ॥

**गुरु**—याप्रमाणें कर्मनिष्ठ अज्ञानी लोकांस मात्र कर्म सांगितलें आहे.

**शिष्य**—भगवन्! आपण हें कशावरून म्हणतां? सर्वांनाही कर्म करणें अवश्य नाहीं असें आपण कशावरून म्हणतां?

**गुरु**—अरे! जेव्हां ज्ञानी पुरुषाला सर्व भूतें आत्मवत् होतात, तेव्हां त्या सर्वत्र 'एकच आहे.' असें पाहणाऱ्याला मोह उत्पन्न होत नाहीं, शोकही नसतो, हें

तत्त्व आतांच सांगितलेंना ? यावरूनच त्याला कांहीं साधावयाचें नसतें व साधनही नको असतें, साध्य जें आत्मतत्त्व तें आत्मतत्त्वाच्या ज्ञानाशीं एकरूप आहे म्हणून साध्य साधनांचा भेद नाहींसा होतो, हें सिद्ध होत नाहीं काय ? तेव्हां ज्या पुरुषाला आत्मा एकच आहे असें अनुभवपूर्वक ज्ञान झालें तो विद्वान् मनुष्य हें ज्ञान झाल्यावर श्रौत अगर स्मार्त कर्मे किंवा इतर दृश्यज्ञान यांचा व आत्मज्ञानाचा एकत्र समुच्चय करावा, किंवा ब्रह्मज्ञान झालेल्या पुरुषानें स्वर्गासाठीं अगर पुत्रमित्रांसाठीं स्वार्थी कर्म करावें अशी इच्छाच करीत नाहीं. खरेंच आहे; आत्मा एकच आहे, नित्य आहे, सुखस्वरूप आहे, असें ज्ञान झालेला पुरुष 'मला स्वर्ग मिळूं दे, मला सुख मिळूं दे' अशी इच्छा धारण करून कर्म करण्याच्या भानगडींत कशाला पडेल ? किंवा ज्ञान आणि कर्म हीं एकाच कालीं आपण करावीं अशी त्याला इच्छा तरी कशाला उत्पन्न होईल ? म्हणून प्रस्तुतच्या मंत्रामध्यें अविद्वान् वगैरे जे लोक आहेत, त्यांची निंदा केली आहे, कारण ते ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय करूं इच्छितात.

शिष्य—तर मग ज्ञानकर्मांचा कधींच समुच्चय होणें शक्य नाहीं काय ?

गुरु—सांगतों, ऐक. युक्तीनें आणि शास्त्रमतानें ज्या ज्ञानाशीं कर्माचा समुच्चय होतो, तें ज्ञान कसें आहे पहा:—ज्याला दैवी वित्त म्हणजे देवताविषयक ज्ञान म्हणतात, तें ज्ञान नेहमीं कर्माशीं संबद्ध असतें असें सांगितलें आहे, असा उपन्यास केला आहे, हें खरें; पण तें परमात्मज्ञान नव्हे. कारण परमात्मज्ञानाचा कर्माशीं कधींही कसलाच संबंध असत नाहीं. कर्माशीं संबद्ध असणारें ज्ञान म्हणजे 'ब्राह्मण यज्ञाच्या संबंधानें वादविवाद करितात' वगैरे प्रकारचें फल उत्पन्न करणारें ज्ञान होय. 'विद्येनें देवलोक मिळतो' असें ह्या विद्येचें निराळें फलही सांगितलें आहे. असो, या मंत्रांत ज्ञान आणि कर्मांपैकीं एकेकाचें अनुष्ठान समुच्चयाचे इच्छेनें केलें असतां निंदेला जागा होते, असा ध्वनि आहे. ज्ञानाचें अनुष्ठान व कर्माचें अनुष्ठान असे विभाग झाले तर अर्थातच निंदेचें कारण नाहीं; कारण प्रत्येक अनुष्ठानाचें फल सांगितलें आहे. 'विद्येनें तें ब्रह्म साध्य होतें.' 'विद्येनें देवलोक मिळतो.' 'विद्येनें दाक्षिणमार्गाला, पितृलोकाला, जावें लागत नाहीं, अगर दाक्षिणायनांत मृत्यु येत नाहीं.' तसेंच 'कर्मानें 'पितृलोक मिळतो.' 'शास्त्रानें सांगितलेलें कर्म कधींही केलें नाहीं असें होऊं नये.' वगैरे विद्या व कर्म यांचीं निराळीं फलें सांगितलीं आहेत, यावरून कर्मठांनीं तीं पृथक्पणानें करण्यास प्रत्यवाय नाहीं असें ठरतें. असो; तेव्हां या मंत्रामध्यें अहंता बाळगणाऱ्या अविद्वान् लोकांची निंदा कशी केली आहे तें स्पष्ट करून सांगतों. जे लोक विद्येहून, आत्मज्ञानाहून भिन्न जी अविद्या अथवा ज्ञानाशीं नित्य विरोधानें असणारें कर्मच यामध्यें मात्र निमग्न झालेले असतात, जे केवळ अग्निहोत्रादि कर्मांचीच उपासना करितात, ते

लोक गाढ आणि निबिड अंधकारामध्यें म्हणजे जड संसारामध्यें प्रवेश करितात; म्हणजे त्यांच्यामागें जन्ममरणाचें चक्र लागतें. परंतु जे लोक हें शास्त्रविहित कर्महि टाकून देतात आणि आत्मज्ञानाचें साधन न करितां किंवा आत्मसाक्षात्कार न होतां केवल देवतेच्या ज्ञानामध्येंच आसाळभूतपणानें रममाण होतात ते तर अभिमानजन्य संसारापेक्षांही अतिकष्टमय दुःखामध्यें जाऊन पडतात ! ॥ ९ ॥

---

तत्रावान्तरभेदं विद्याकर्मणोः समुच्चयकारणमाह ।
अन्यथा फलवदफलवतोः सन्निहितयोरङ्गाङ्गितैव स्यादित्यर्थः ।

शिष्य—भगवन् ! यावरून तर मग उपासना ही कर्मामध्येंच अन्तर्भूत असून त्याचा एक अवयवच आहे म्हणानात आपण ? कारण उपासना हें एक निष्फल कर्म आहे; तेव्हां सफल कर्माशीं तिचा संयोग होतो तो कर्म मुख्य व उपासना अवयव या दृष्टीनें होतो. होयना ?

गुरु०—मला वाटलेंच तूं कांहीं तरी अशी वेडी-वांकडी समजूत करून घेशील म्हणून ! अरे ! आतांच उपासना व कर्म यांचीं फळें निराळीं होतात म्हणून सांगितलें ना ? शिवाय समुच्चय होण्यास उपयोगीं पडणारा असा आणखी एक पोटभेद विद्या व कर्म यांमध्यें आहे, तो या मंत्रांत सांगतात. तो ऐकलास म्हणजे दोन्हीं समुच्चय होण्यास योग्य, परंतु स्वतंत्र आहेत असें तुला समजेल.

**अन्यदेवाहुर्विद्ययाऽन्यदाहुरविद्यया ॥**
**इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥ १० ॥**

**पदान्वयार्थ—विद्यया** ( विद्येच्या, देवताज्ञानाच्या योगानें ) **अन्यत्** ( दुसरें-फल ) **आहुः** ( सांगितलें आहे ) **अविद्यया** ( अज्ञानाच्या, कर्माच्या योगानें ) **अन्यत्** ( निराळेंच फल ) **आहुः** ( सांगितलें आहे ). **इति** ( याप्रमाणें ) **धीराणां** ( बुद्धिवंतांचें, बुद्धिमान् पुरुषांकडून ) **शुश्रुम** ( आम्ही ऐकिलें आहे ). **ये** ( जे ) **नः** (आम्हांला) **विचचक्षिरे** ( सांगते झाले ) सारांश, विद्येचें व कर्माचें फल निरनिराळें असतें असें आम्हांस ह्या उभयतांचें तत्त्वज्ञान-विज्ञान ज्या आचार्यांनीं स्पष्ट करून सांगितलें, त्यांकडून आम्ही हेंच अनेक वेळ ऐकिलें आहे.

भा०—अन्यदेवेत्यादि । अन्यत्पृथगेव विद्यया क्रियते फलमित्याहुर्वदन्ति विद्यया देवलोको, विद्यया तदारोहन्तीति श्रुतेः । अन्यदाहुरविद्यया कर्मणा क्रियते, कर्मणा पितृलोक इति श्रुतेः । इत्येवं शुश्रुम श्रुतवन्तो वयं धीराणां धीमतां वचनम् । आचार्या

**नोऽस्मभ्यं तत्कर्म च ज्ञानं च विचचक्षिरे व्याख्यातवन्तस्तेषामय-मागमः पारंपर्यगत इत्यर्थः ॥ १० ॥**

भाष्यार्थ—'विद्येनें देवलोक मिळतो,' 'विद्येनें त्याचें संपादन होतें' असें विद्येनें निराळें फल मिळतें असें, व 'कर्मांच्या योगानें पितृलोक मिळतो' असें आम्हीं बुद्धिमान् व श्रुतीमध्यें पारंगत असणाऱ्या ज्ञानी पुरुषांकडून (पहा बृहदारण्यक उपनिषद् १।५।१६) ऐकिलें आहे. ज्यांनीं आम्हांस ज्ञान आणि कर्म यांचा तारतम्यभाव स्पष्ट समजून सांगितला आहे, त्यांचा हें असें सांगण्याचा परंपरागत प्रपाठच आहे ॥ १० ॥

---

**यत एवमतः—**

असें आहे म्हणून

## विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयँ सह ॥
## अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते ॥ ११ ॥

**पदान्वयार्थ**—(जो) **विद्यां** (विद्येप्रत) **च** (आणि) **अविद्यां** (अविद्येप्रत) **उभयं सह** (एकत्र दोन्हीही, समुच्चयानें दोन्हीही) **वेद** (जाणतो)–तो–**अविद्यया** (अविद्येच्या योगानें, कर्मज्ञानाच्या योगानें) **मृत्युं** (मृत्यूप्रत) **तीर्त्वा** (तरून जाऊन) **विद्यया** (विद्येच्या साहाय्यानें) **अमृतं** (अमृताच्या–देवाच्यास्थितीचा)–**अश्नुते** (उपभोग घेतो).

**भा०—विद्यां चाविद्यां च देवताज्ञानं कर्म चेत्यर्थः । यस्तदेतदुभयं सहैकेन पुरुषेणानुष्ठेयं वेद तस्यैव समुच्चयकारिण एव एकपुरुषार्थसंबन्धः क्रमेण स्यादित्युच्यते । अविद्यया कर्मणाऽग्निहोत्रादिना मृत्युं स्वाभाविकं कर्म ज्ञानं च मृत्युशब्दवाच्यमुभयं तीर्त्वाऽतिक्रम्य विद्यया देवताज्ञानेनामृतं देवतात्मभावमश्नुते प्राप्नोति । तद्ध्यमृतमुच्यते यद्देवतात्मगमनम् ॥ ११ ॥**

भाष्यार्थ—विद्या म्हणजे देवताज्ञान आणि अविद्या म्हणजे कर्म. हीं दोन्हीं एकाच मनुष्यानें साध्य करून घ्यावयाचीं अशा प्रकारचें ज्ञान ज्यास प्राप्त झालें त्या पुरुषाला–कर्माचें व देवताज्ञानाचें साहचर्य ठेवून त्याप्रमाणें वागणाऱ्या पुरुषाला–असें फल मिळतें कीं, विद्येच्या म्हणजे अग्निहोत्रादिक कर्मांच्या योगानें तो पुरुष मृत्यु या शब्दानें ओळखलें जाणारें–नाशवंत–असें इहलोकाचें सकाम, लोभानें केलेलें व आत्मज्ञानाच्या आड येणारें कर्म व इहलोकाचें ज्ञान, या

दोन्हींच्या पलीकडे जाऊन, दोहींचेंही आक्रमण करून, पुनः देवताज्ञानाच्या साहाय्यानें अमृताची, देवत्वाची, योग्यता प्राप्त करून घेतो. देवतात्व प्राप्त करून घेणें यालाच अमृतत्वाची स्थिति म्हणतात. सारांश, ज्ञान आणि कर्म एकाच पुरुषानें साध्य करून घ्यावें असें ज्यास समजलें, त्यानें अग्निहोत्रादि कर्में केल्यामुळें ऐहिक म्हणून नाशवंत ज्ञान आणि कर्मफल प्राप्त होऊन तो मृत्यूचें अतिक्रमण करितो आणि दैविक ज्ञान झाल्यामुळें अमरलोकीं उपभोगासाठीं जाऊन राहतो.

टीपः—येथें म्हणजे या उपनिषदांत 'विद्या' हा शब्द (देवताज्ञान) अशा अर्थी योजिला आहे, हें भान न राहून कित्येक टीकाकार 'विद्या' म्हणजे ब्रह्मज्ञान आणि 'अमृत' म्हणजे मोक्ष असे, प्रकरणास विपरीत अर्थ करितात. कर्म आणि ज्ञान यांचा समुच्चय होणें शक्य नाहीं असें सर्व उपनिषदें, गीता व ब्रह्मसूत्रें अत्यंत आग्रहानें सांगत आहेत, आणि त्यांचें म्हणणें सयुक्तिकही आहे. हा सर्व भाग आमचे अनेक भाविक टीकाकार विसरले कीं काय ? ॥ ११ ॥

---

अधुना व्याकृताव्याकृतोपासनयोः समुच्चिचीषया प्रत्येकं निन्दोच्यते—

या मंत्रामध्यें व्याकृत, स्पष्ट झालेलें, जें दृश्य जग म्हणजे कार्यब्रह्म, हिरण्यगर्भ, त्याची व अव्याकृत, अस्पष्ट असणारी जी मूळ प्रकृति (कारण) तिची, सारांश, या दोहींच्या उपासनांचा समुच्चय करण्याच्या इच्छेनें प्रत्येकीची निंदा करितातः—

**अन्धं तमः प्रविशन्ति येऽसंभूतिमुपासते ॥**
**ततो भूय इव ते तमो य उ संभूत्याँ रताः ॥ १२ ॥**

**पदान्वयार्थ**—ये (जे—लोक) **संभूतिं** (जिला जन्मच नाहीं अशी कारण-रूपी व अविद्या नांवाची मूळ प्रकृति,—तिची—) **उपासते** (उपासना करितात)—ते लोक—**अन्धं तमः** (अत्यंत गाढ अशा अंधकारांत) **प्रविशन्ति** (प्रवेश करितात. ते लोक जेथें कांहीं दिसत नाहीं अशा अंधकारांत अगर अज्ञानांत जाऊन पडतात.) **ये उ** (पण जे, **संभूत्यां** (ज्याला जन्म आहे अशा दृश्य विश्वावरच) **रताः** (प्रेम करितात, दृश्य विश्वाचीच आराधना करितात) **ते** (ते—लोक—) **ततो भूय इव तमः** (त्यापेक्षांही जास्ती, वर अज्ञान सांगितलें त्यापेक्षांही जास्त, घनांध-कारांत, निबिड अंधकारांत)—प्रवेश करितात.—सारांश, अज्ञानरूपी प्रकृति, जी सर्व दृश्यजाताचें कारण आहे, त्या प्रकृतीचें मात्र आराधन

करणारे लोक अज्ञानांत बुडतात; पण त्या प्रकृतीचें कार्य जें हें दृश्य विश्व त्याचेंच मात्र जे लोक आराधन करितात, ते लोक तर वरील अंधकारापेक्षांही जास्त निबिड अंधकारांत—अज्ञानांत—जाऊन पडतात. नुसत्या कारणाची उपासना हा अंधेर तर त्या कारणाच्या कार्याचीच तेवढी उपासना ही अधिकच अंधारमय पाहिजे !—

**भा०—अन्धं तम इत्यादि । ये संभूतिं संभवनं संभूतिः सा यस्य कार्यस्य सा संभूतिस्तस्या अन्याऽसंभूतिः प्रकृतिः कारणमविद्याऽव्याकृताख्या तामसंभूतिमव्याकृताख्यां प्रकृतिं कारणमविद्यां कामकर्मबीजभूतामदर्शनात्मिकामुपासते ये, ते तदनुरूपमेवान्धं तमोऽदर्शनात्मकं प्रविशन्ति । ततस्तस्मादपि भूयो बहुतरामेव तमः प्रविशन्ति य उ संभूत्यां कार्यब्रह्मणि हिरण्यगर्भाख्ये रताः ॥ १२ ॥**

भाष्यार्थ—ज्याला ज्याला म्हणून जन्म आहे तें जन्मवंत होय. त्याच्या उलट म्हणजे जन्म नसणारी, अनादि असणारी, प्रकृति—मूळप्रकृति—सर्वांचें कारण असणारी—जिच्यापासून सर्व कार्यें होतात अशी—व विकार नसणारी म्हणजे नामरूपाप्रत न पावलेली, 'ही मूळ प्रकृति' नामक अविद्या होय. इच्छा उत्पन्न होणें व कर्म करणें हें सर्व या स्पष्ट न झालेल्या अविद्येचें कार्य होय. तेव्हां असल्या अविद्येचीच जे लोक उपासना करितात, ते लोक जेथें कांहीं दिसत नाहीं, समजत नाहीं, अशा अंधकारांत, अज्ञानांत, प्रवेश करितात. परंतु जे लोक हिरण्यगर्भ नांवाचें कार्यब्रह्म अगर नाशवंत असें दृश्य विश्व, त्याची मात्र आराधना करितात, ते लोक तर जास्तच अज्ञानांत जाऊन पडतात.—सांगावयाचें तात्पर्य हें आहे कीं, सांख्यांच्या प्रकृतीचें व कर्मठांच्या इंद्रचंद्रादि देवतांचें आराधन करणारे लोक अज्ञानामध्येंच असतात; त्यांना मोक्ष नाहीं. कारण ते चैतन्य नसणाऱ्या प्रकृतीची व नाशवंत असणाऱ्या देवतांची आराधना करितात. अर्थातच जड किंवा अनित्य यांची सेवा केल्यामुळें त्यांस फलही तसलेंच मिळतें. [ पहा भगवद्गीता अ० १९ श्लो० ८।९।१०।२० ] नाशवंताची आराधना सकामबुद्धीनें केली म्हणजे नाशवंतच फल मिळणार किंवा जडाची सेवा केल्यास अज्ञान प्राप्त होणार ! एतावता प्रकृतीच्या आराधनेपेक्षांही नाशवंताची आराधना जास्त अज्ञानमय व दुःखमय आहे. ॥ १२ ॥

अधुनोभयोरुपासनयोः समुच्चयकारणमवयवफलभेदमाह—

आतां या दोन्ही उपासनांच्या समुच्चयाचें कारण, त्या प्रत्येकीचें फल भिन्न असणें हें आहे, म्हणून ते प्रत्येकीचें अवयवद्वारा असणारें भिन्न फल सांगतातः—

**अन्यदेवाहुः संभवादन्यदाहुरसंभवात् ॥**
**इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥ १३ ॥**

**पदान्वयार्थ—संभवात्** ( जें उत्पन्न झालें आहे अशा कार्यरूपी हिरण्यगर्भाच्या उपासनेपासून ) **अन्यदेव** ( निराळेंच—फल आहे असें ) **आहुः** ( सांगतात ) **असंभवात** ( जी अनादि आहे, अशा प्रकृतीच्या उपासनेपासून ) **अन्यत्** ( भिन्न—फल आहे असें— ) **आहुः** ( म्हणतात ) **इति** ( याप्रमाणें ) **ये** ( जे—बुद्धिमान् ऋषी ) **नः** ( आम्हांस ) **विचचक्षिरे** ( स्पष्ट करून सांगते झाले )—अशा—**धीराणां** ( धीर बुद्धिवंत-लोकांचीं—वचनें ) **शुश्रुम** ( आम्हीं—ऐकिलीं—आहेत. )—सारांश, प्रकृतीच्या उपासनेचें फल व दृश्य विश्वाच्या उपासनेचें फळ हीं दोन्हीं भिन्न आहेत असें श्रुतिवेत्ते सांगतात.—

भा०—अन्यदेवेति । अन्यदेव पृथगेवाऽऽहुः फलं संभवात्संभूतेः कार्यब्रह्मोपासनादणिमाद्यैश्वर्य-लक्षणं व्याख्यातवन्त इत्यर्थः । तथा चान्यदाहुरसंभवादसंभूतेरव्याकृतादव्याकृतोपासनाद्यदुक्तमन्धं तमः प्रविशन्तीति प्रकृतिलय इति च पौराणिकैरुच्यत इत्येवं शुश्रुम धीराणां वचनं ये नस्तद्विचचक्षिरे व्याकृताव्याकृतोपासनफलं व्याख्यातवन्त इत्यर्थः ॥ १३ ॥

भाष्यार्थ—ब्रह्माच्याच इच्छेनें मात्र प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या कार्यब्रह्माची उपासना केली असतां, अणिमा, लघिमा, इत्यादि ऐश्वर्य देणाऱ्या ज्या अष्टसिद्धि योगशास्त्रांत सांगितल्या आहेत, त्यांची प्राप्ति म्हणजे ऐश्वर्यप्राप्ति होते, असें फल सांगितलें आहे. त्याचप्रमाणें अव्यक्त अशी जी अज्ञानकारण मूलप्रकृति, तिची उपासना केली असतां अंधकारामध्यें, अज्ञानामध्यें बुडावें लागतें व झोंपेमध्यें जसा सर्व दृश्याचा लय होतो, तसाच येथेंही प्रकृतीमध्यें लय होतो; असें पुराणमुनींनीं, श्रेष्ठमुनींनीं, सांगितलें आहे. हा फलभेद जो आम्हीं ऐकिला आहे, तो व्यक्त आणि अव्यक्त यांची उपासना केली असतां, काय फलप्राप्ति होते हें ज्यांस उत्कृष्ट तऱ्हेनें समजलें आहे, त्या त्या बुद्धिमान् पुरुषांकडून ऐकिला आहे. अव्यक्ताची उपासना केली असतां, अज्ञान आणि व्यक्ताची, दृश्याची, उपासना केली असतां, अज्ञान आणि सुखदुःख हीं प्राप्त होतात. १३

---

यत एवमतः समुच्चयः संभूत्यसंभूत्युपासनयोर्युक्त एवैकपुरुषार्थत्वाच्चेत्याह—

असें आहे म्हणून आणि हिरण्यगर्भाची व अव्यक्ताची अशा दोन्ही उपासना एका पुरुषानें संपादन करणें इष्ट आहे म्हणून सांगतात.—

**संभूतिं च विनाशं च यस्तद्वेदोभयꣳ सह ॥**
**विनाशेन मृत्युं तीर्त्वा संभूत्याऽमृतमश्नुते ॥ १४ ॥**

**पदान्वयार्थः—यः** ( जो कोणी ) [ अ ] **संभूतिं** ( जन्म नाहीं जिला अशी अव्यक्त मूळ प्रकृति ) **च** ( आणि ) **विनाशं च** ( ज्याचा नाश होतो तें हिरण्यगर्भरूपी सगुण ब्रह्म ) **तदुभयं सह** ( तीं दोन्ही एककालींच ) **वेद** ( जाणता झाला, ज्याला मूळप्रकृतीची व हिरण्यगर्भाची अनुभवसहित ओळख पटली )—तो मनुष्य—**विनाशेन** ( नाहींसें होणें हा ज्याचा धर्म आहे, त्या सगुण ब्रह्माच्या उपासनेनें ) **मृत्युं तीर्त्वा** ( मृत्यूच्या पलीकडे जाऊन ) **असंभूत्या** ( प्रकृतीच्या उपासनेनें ) **अमृतं अश्नुते** (अमरत्वाप्रत, प्रकृतिलयाप्रत जातो) सारांश, मूलप्रकृति आणि हिरण्यगर्भ यांची उपासना केली असतां, मृत्यु चुकतो व पुढें दृश्य प्रकृतीचा नाश होऊन उपासना करणारा भक्त मूलप्रकृतींत जाऊन मिसळतो.—

भा०—संभूतिं च विनाशं च यस्तद्वेदोभयꣳ सह । विनाशेन विनाशो धर्मो यस्य कार्यस्य स तेन धर्मिणाऽभेदेनोच्यते विनाश इति, तदुपासनेनानैश्वर्यमधर्मकामादिदोषजातं च मृत्युं तीर्त्वा हिरण्यगर्भोपासनेन ह्यणिमादिप्राप्तिः फलम् । तेनानैश्वर्यादिमृत्युमतीत्यासंभूत्याऽव्याकृतोपासनाऽमृतं प्रकृतिलयलक्षणमश्नुते । संभूतिं च विनाशं चेत्यत्रावर्णलोपेन निर्देशो द्रष्टव्यः । प्रकृतिलयफलश्रुत्यनुरोधात् ॥ १४ ॥

भाष्यार्थ—ज्या पुरुषाला मूलप्रकृतीचें व हिरण्यगर्भाचें खरें ज्ञान होऊन जो दोहोंचीही एककालींच उपासना करूं लागला त्याला कसें फल मिळतें तें पहा:-ज्याच्या कार्याचा धर्म नाशरूपी आहे त्याला विनाश असें लक्षणेनें म्हटलें. अशा प्रकारच्या विनाशी हिरण्यगर्भाच्या आराधनेचें फल मिळतें तें हें कीं, अधर्माच्या योगानें व कामक्रोधादिक पापांच्या योगानें उत्पन्न झालेला, चित्ताचें ऐकाग्र्य नाहींसे करणारा व सत्ताशून्य करणारा, जो मृत्यु तो ह्या उपासनेनें तरतां येतो, आणि अणिमा वगैरे ज्या अष्टसिद्धि आहेत त्यांची प्राप्तीही होते. सारांश, या उपासनेनें शक्तिशून्य करणाऱ्या मृत्युसागरांतून प्राणी तरून जातो;

पुढें अनादि व अव्यक्त अशा मूलप्रकृतीची उपासना केली असतां, प्रकृतीमध्येंच त्या पुरुषाचा लय होतो.—सारांश, महाकल्पापर्यंत त्याला जन्ममरण येत नाहीं तथापि पुनः सृष्टीचा उदय झाल्यावर तो जन्ममरणाच्या चक्रांत सांपडतो !—पहिल्या ओळींत ' अ ' चा लोप आहे असें समजावें. कारण प्रकृतीमध्यें लय होऊन जातो असें प्रकृतीच्या उपासनेचें फल दुसऱ्या ओळींत सांगितलें आहे. ॥ १४ ॥

---

**मानुषदैववित्तसाध्यं फलं शास्त्रलक्षणं प्रकृतिलयान्तम् । एतावती संसारगतिः । अतः परं पूर्वोक्तमात्मैवाभूद्विजानत इति सर्वात्मभाव एव सर्वैषणासंन्यासज्ञाननिष्ठाफलम् । एवं द्विप्रकारः प्रवृत्तिनिवृत्तिलक्षणो वेदार्थोऽत्र प्रकाशितः । तत्र प्रवृत्तिलक्षणस्य वेदार्थस्य विधिप्रतिषेधलक्षणस्य कृत्स्नस्य प्रकाशने प्रवर्ग्यान्तं ब्राह्मणमुपयुक्तम् । निवृत्तिलक्षणस्य वेदार्थस्य प्रकाशनेऽत ऊर्ध्वं बृहदारण्यकमुपयुक्तं तत्र निषेकादिश्मशानान्तं कर्म कुर्वञ्जिजीविषेद्यो विद्यया सहापरब्रह्मविषयया । तदुक्तं विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयꣳ सह । अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुत इति, तत्र केन मार्गेणामृतत्वमश्नुत इत्युच्यते—**

मानवी वित्ताच्या ( धन, वगैरेच्या ) व दैवी वित्ताच्या ( यज्ञयागादिक वगैरेच्या ) योगानें साध्य होणाऱ्या व शास्त्रानें सांगितलेल्या फलाची परमावधि म्हणजे प्रकृतीमध्यें लीन होऊन जाणें हें होय. ह्या हिरण्यगर्भाच्या व मूलप्रकृतीच्या उपासनांनीं फार फार झालें तर महाकल्पापर्यंत जन्ममरण येत नाहीं. पण सृष्टीचा व्यापार पुनः सुरू झाला म्हणजे पुनः जन्ममरणाची पाळी येते, असें हें फल आहे. याप्रमाणें ही संसाराची किंवा जन्ममरणाची गति आहे. असो; यानंतर पूर्वी सांगितलेलें म्हणजे ' ज्या विद्वान् पुरुषाचा सर्वत्र आत्मभाव झाला, सर्वच ब्रह्म आहे असें ज्यास कळलें, त्याला,–पुत्र, मित्र, वित्त, कलत्र इत्यादिकांचा त्याग करून केवळ आत्मज्ञानच संपादन करणाऱ्या पुरुषाला,–आत्मस्वरूप प्राप्त होतें व जन्ममरणाचा त्रास सदैव चुकतो,' असें पूर्वी सांगितलेलें फल ध्यानांत आणावें. सारांश, ह्या उपनिषदांमध्यें प्रवृत्तिधर्म म्हणजे कर्म आणि उपासना यांनीं सांगितलेला धर्म पाळला असतां जन्ममरण चुकत नाहीं आणि निवृत्तिधर्म म्हणजे सर्व कर्मांचा संन्यास करून आत्मज्ञान संपादन केलें असतां जन्ममरण चुकतें व आत्मस्वरूपीं एकतानता होते, असा दोन प्रकारचा धर्म सांगितला आहे. त्यांतही ' अमुक करावें, अमुक करूं नये ' असें सांगणाऱ्या प्रवृत्तिधर्माचें पूर्णत्वानें उद्घाटन करण्याला प्रवर्ग्यापर्यंतच्या ब्राह्मणाचा उपयोग आहे; म्हणजे प्रवृत्तिधर्माचें स्पष्टीकरण ब्राह्मण करितें. नंतर त्याच्या-

पुढें जें ' बृहदारण्यक ' वाक्य आहे, तें निवृत्तीचा अगर ज्ञानमार्गाचा उपदेश करण्यास अत्यंत उपयोगी आहे.—येथेंसुद्धां ' प्राणादि विषयांची ' उपासना सांगितली आहे ती वेगळी काढिली पाहिजे.—आतां, गर्भाधानसंस्कारापासून तों स्मशानांतील अन्त्यविधीपावेतों कर्म करून, जो मनुष्य सगुण ब्रह्माच्या उपासनेनें जिवंत राहण्याची इच्छा धारण करितो; त्याला,—म्हणजे कर्मरूपी अविद्या आणि उपासनारूपी विद्या अशीं दोन्ही एकाच पुरुषानें करावीं असें ज्याला समजलें आहे त्याला,—कर्मविद्येनें मृत्युसागर तरतां येऊन, उपासनेच्या योगानें दैवीगति प्राप्त होते, असें सांगितलें आहे, तर आतां ही दैवीगति किंवा त्याच्या पुढची स्थिति कशी प्राप्त होते. याविषयीं पुढील मंत्रांत सांगतात.—

**भा०—तद्यत्तत्सत्यमसौ स आदित्यो य एष एतस्मिन्मण्डले पुरुषो यश्चायं दक्षिणेऽक्षन्पुरुष एतदुभयं सत्यं ब्रह्मोपासीनो यथोक्तकर्मकृच्च यः सोऽन्तकाले प्राप्ते सत्यात्मानमात्मनः प्राप्तिद्वारं याचते हिरण्मयेन पात्रेण ।**

' तेंच सत्य आहे, हाच तो सूर्य आहे कीं जो या मंडलामध्यें व दक्षिणनेत्रामध्यें पुरुषरूपानें वास करीत आहे; हीं दोन्हीही सत्यच आहेत ' अशी सगुण ब्रह्माची उपासना करणारा व शास्त्रानें सांगितलेलें कर्म करणारा पुरुष अंतकाल प्राप्त झाला असतां सत्यरूपी आत्मप्राप्ति व्हावी म्हणून प्रार्थना करितो—

**हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ॥**
**तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥ १५ ॥**

**पदान्वयार्थः—हिरण्मयेन** ( सुवर्णाच्या ) **पात्रेण** ( पात्रानें ) **सत्यस्य** ( आत्मस्वरूपाचें, ब्रह्माचें ) **मुखं** ( तोंड ) **अपिहितं** ( झांकलें आहे ) **तत्** ( तें ) **पूषन्** ( हे सूर्या ! ) **सत्यधर्माय** ( सत्य हाच आहे धर्म ज्या माझा त्याला ) **दृष्टये** ( दिसावें म्हणून ) **अपावृणु** ( उघड. )—' सूर्याच्या प्रकाशापलीकडे असणारें जें आत्मस्वरूप तें मला पाहूं दे ' अशी सूर्याची प्रार्थना हा मुमुक्षु करीत आहे.—

**भा०—हिरण्मयमिव हिरण्मयं ज्योतिर्मयमित्येतत् । तेन पात्रेणेवापिधानभूतेन सत्यस्यैवाऽऽदित्यमण्डलस्थस्य ब्रह्मणोऽपिहितमाच्छादितं मुखं द्वारं तत्त्वं हे पूषन्नपावृण्वपसारय सत्यधर्माय तव सत्यस्योपासनात्सत्यं धर्मो यस्य मम सोऽहं सत्यधर्मा तस्मै मह्यम् । अथवा यथाभूतस्य धर्मस्यानुष्ठात्रे दृष्टये तव सत्यात्मनः उपलब्धये ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ**—हे सूर्या! सुवर्णाप्रमाणें प्रकाशवंत अशा आच्छादनरूपी पात्रानें, आपल्या चकचकित बिंबानें, त्वां सूर्यमंडलामध्यें राहणाऱ्या सत्यस्वरूपी ब्रह्माचें द्वार ( ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान ) झांकून टाकिलें आहेस, तें द्वार त्वां माझ्यासाठीं उघडावें. मी सत्यधर्मा आहें म्हणजे सत्स्वरूपाची उपासना करित असल्यामुळें माझ्या धर्मासह मी सत्यस्वरूपी झालों आहें. म्हणून हे पूषन् ( पूर्णस्वरूपी सूर्या! ) मला आपण द्वार उघडून ब्रह्मस्वरूप दिसेल असें करावें. किंवा सत्यस्वरूपी जे आपण त्या आपली प्राप्ति धर्माप्रमाणें आचरण करणाऱ्या मला व्हावी, एतदर्थ आपण हें द्वार खुलें करावें. [पहा तैत्तिरीय २।८।१] ॥ १५ ॥

---

**पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजा-**
**पत्य व्यूह रश्मीन्समूह ॥**
**तेजो यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते**
**पश्यामि योऽसावसौ पुरुषः सोऽहमस्मि ॥ १६ ॥**

**पदान्वयार्थ**—**पूषन्** (हे जगाचें पोषण करणाऱ्या!) **एकर्षे** (एकट्यानें प्रवास करणाऱ्या!) **यम** ( सर्वांचें नियमन करणाऱ्या! ) **प्राजापत्य** ( ब्रह्मदेवाचे अपत्या! ) **सूर्य** ( सूर्या! ) **रश्मीन्** ( आपले किरण ) **व्यूह** ( विसकटून टाक )—आणि—**तेजः** ( तुझा प्रकाश ) **समूह** ( एकवट कर ) **यत्** ( जें ) **ते** ( तुझें ) **कल्याणतमं** ( अत्यंत कल्याण करणारें, अति सुंदर ) **रूपं** ( स्वरूप ) **तत्** ( तें स्वरूप ) **पश्यामि** ( पाहतों—पाहीन ) **योऽसौ पुरुषः** ( जो तो पुरुष ) **असौ सोऽहमस्मि** (तोच मी आहें).—सारांश हे सूर्या! आपले किरण विसकटून टाक आणि आपलें तेज एकत्र कर; म्हणजे हिरण्यगर्भनामक पुरुषरूपी जो मी, तो मी तुझें मंगलदायक स्वरूप पाहीन.

भा०—पूषन्निति । हे पूषन्, जगतः पोषणात्पूषा रविः । तथैक एव ऋषति गच्छतीत्येकर्षिः, हे एकर्षे । तथा सर्वस्य संयमनाद्यमः, हे यम । तथा रश्मीनां प्राणानां रसानां च स्वीकरणात्सूर्यः, हे सूर्य । प्रजापतेरपत्यं प्राजापत्यः, हे प्राजापत्य । व्यूह विगमय रश्मीन्स्वान् । समूह एकीकुरु उपसंहर ते तेजस्तापकं ज्योतिः । यत्ते तव रूपं कल्याणतममत्यन्तशोभनं तत्ते तवाऽऽत्मनः प्रसादात्पश्यामि । किंचाहं न तु त्वां भृत्यवद्याचे योऽसावादित्यमण्डलस्थो व्याहृत्यवयवः पुरुषः पुरुषाकारत्वात्पूर्ण

**वाऽनेन प्राणबुद्ध्यात्मना जगत्समस्तमिति पुरुषः पुरि शयनाद्वा पुरुषः सोऽहमस्मि भवामि ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ**—सर्व जगाचें पोषण करणाऱ्या, जगाची वृद्धि करणाऱ्या, सूर्या ! त्याचप्रमाणें सर्व जगास प्रकाश देण्यासाठीं एकट्यानेंच हिंडणाऱ्या—ऋषे ! ज्ञानमया !—व सर्वांचें नियमन करणाऱ्या यमस्वरूपी सूर्या ! आणि सर्वांच्या प्राणांचें व सर्व रसांचें आकर्षण करणाऱ्या देवा ! तसेंच प्रथम प्रजापति जो ब्रह्मा त्याचे चिरंजीवा ! सूर्या ! ( येथें सूर्यास अनेक नांवें दिलीं आहेत, त्यांतच सर्व रसांचें आकर्षण करणारा असें एक नांव आहे. अलीकडील शोधान्वयें वाफेच्या रूपानें पाणी सूर्यमंडलांत जातें असें ठरलें आहे, हें बहुश्रुत लोकांस तरी सांगावयास नको. )—हे सूर्या ! आपले तेजोरूपी किरण पसरून टाकून ताप देणाऱ्या तेजाचा उपसंहार कर म्हणजे मला तुझ्या हृदयस्वरूपापलीकडे असणाऱ्या ब्रह्मस्वरूपाचें आकलन करितां येईल, अथवा सद्वस्तूच्या अनुग्रहानें तुझ्या सत्य, सुंदर आणि मंगल स्वरूपाचें दर्शन होईल. देवा ! येथें मी तुझी चाकरासारखी याचना करीत नाहीं बरें ! तुझें स्वरूप पाहण्याचा मला अधिकारच आहे. कारण सूर्यमंडलामध्यें राहणारा—व 'भूमि ज्याचें शिर आहे, अंतराल ज्याचा हस्त आहे, स्वर्ग ज्याचे पाय आहेत,' असा 'भुर्भुवस्वः' रूपानें पूर्ण असणारा,—असा ॐ पुरुष मी आहें. किंवा प्राण, बुद्धि यांच्या योगानें सर्व जगत् नटून राहिलेला पुरुषही मीच आहें. अथवा देहामध्यें पूर्णत्वानें राहणारा पुरुष तोही मीच आहें. सारांश, तुझ्या मंगलस्वरूपाचें अगर ब्रह्माचें दर्शन घेण्यास मी सर्वथा योग्य आहें, म्हणून मला दर्शन दे. ॥ १६ ॥

---

**वायुरनिलममृतमथेदं भस्मान्तँ शरीरम् ॥**
**ॐ क्रतो स्मर कृतँ स्मर क्रतो स्मर कृतँ स्मर ॥ १७ ॥**

**पदान्वयार्थ**—अथ ( आतां )—माझा—वायुः ( प्राण )—हा अनिलं ( सर्व ठायीं असणारा असा ) अमृतं ( अमृतरूपी सूत्रात्मा )—होवो—तसेंच—इदं ( हें—माझें ) शरीरं ( पंचभूतात्मक शरीर ) भस्मान्तं ( भस्म आहे अंत ज्याचा असें )—होवो ! क्रतो (हे संकल्प करणाऱ्या देवा !) ॐ (अग्निस्वरूपी जें स्मर्तव्य ब्रह्म त्याचें) स्मर (स्मरण करीव) कृतं ( आजपर्यंत जें काय केलें आहे त्या कर्माचें ) स्मर ( स्मरण कर. ) क्रतो स्मर । कृतं स्मर ( ब्रह्माचें स्मरण व स्वकृत्याचें मला स्मरण होवो ! )—सारांश, मुमूर्षु म्हणतो:—माझ्या शरीराचें भस्म होवो, माझे प्राण सूत्रात्म्यामध्यें,

हिरण्यगर्भामध्यें, जाऊन मिळोत, मला सर्व कर्मांचें स्मरण होऊं दे, व मला ब्रह्मस्वरूपाचें चिंतन करूं दे.

**भा०—वायुरिति । अथेदानीं मम मरिष्यतो वायुः प्राणोऽध्यात्मपरिच्छेदं हित्वाऽधिदैवतात्मानं सर्वात्मकमनिलममृतं सूत्रात्मानं प्रतिपद्यतामिति वाक्यशेषः । लिङ्गं चेदं ज्ञानकर्मसंस्कृतमुत्क्रामत्विति द्रष्टव्यम् । मार्गयाचनसामर्थ्यात् । अथेदं शरीरमग्नौ हुतं भस्मान्तं भूयात् । ओमिति यथोपासनमोंप्रतीकात्मकत्वात्सत्यात्मकमग्न्याख्यं ब्रह्माभेदेनोच्यते । हे क्रतो संकल्पात्मक स्मर यन्मम स्मर्तव्यं तस्य कालोऽयं प्रत्युपस्थितोऽतः स्मर । एतावन्तं कालं भावितं कृतमग्ने स्मर यन्मया बाल्यप्रभृत्यनुष्ठितं कर्म तच्च स्मर । क्रतो स्मर कृतं स्मरेति पुनर्वचनमादरार्थम् ॥ १७ ॥**

भाष्यार्थ—आतां, या वेळीं म्हणजे माझे मरणकाळीं, माझ्या शारीरिक प्राणानें हें (माझ्या) शरीराचें आवरण, आच्छादन, टाकून देऊन सर्व अदृष्टामध्यें, देव, स्वर्गलोक इत्यादिकांमध्यें, प्रवेश करावा अथवा सर्वत्र संचार करणारा सूत्रात्मा नामक जो विश्वप्राण आहे, त्या हिरण्यगर्भाचें स्वरूप धारण करावें, त्यांत जाऊन मिळावें. तें स्वरूप त्यास मिळेल; हिरण्यगर्भनामक जो सर्व विश्वाचा सूत्रात्मा ( Universal soul ) त्याचें स्वरूप माझ्या प्राणास मिळूं दे.

शिष्य—प्रार्थना करणाराचा प्राण हिरण्यगर्भांत कां जाईल ?

गु०—कारण, यथार्थ ज्ञान आणि वेदविहित कर्म यांच्या योगानें उत्तम संस्कार झालेला असा हा प्रकृत प्राण आहे असें 'ह्या' शब्दावरून समजावें; संस्कृत झाला आहे हें कशावरून ? तर पुढें 'मला चांगल्या मार्गानें जाऊं दे' असें म्हटलें आहे त्यावरून सिद्ध होतें. असो; हें माझें शरीर अग्नीमध्यें शेवटची आहुति म्हणून भस्म होऊन जाऊं दे. त्याचें असण्याचें कारण संपलें. आतां, हा मरणारा मनुष्य ॐ या स्वरूपाची उपासना करितो, कारण 'ॐ' हें परब्रह्माचें प्रतीक (स्मरण देणारें, स्मारक,) आहे. असो; सत्यस्वरूपी जें 'अग्नि' नांवाचें ब्रह्म तें हेंच होय. म्हणून 'ॐ' स्वरूपानें मुमूर्षु उपासना करितो:—'हे संकल्प धारण करणाऱ्या मना ! मला ज्याचें स्मरण करावयाचें आहे त्याची वेळ आतां प्राप्त झाली आहे म्हणून 'ॐ' याचें स्मरण करीव. त्याचप्रमाणें आजपर्यंत जें काय मनांत आणिलें, बालपणापासून आतांपर्यंत जें काय केलें त्याचेंही स्मरण हे अग्ने ! तुला असूं दे; याचें स्मरण तूंही कर.' आदरासाठीं अगत्य वाटावें म्हणून ही प्रार्थना दोनदां केली आहे ॥ १७ ॥

पुनरन्येन मन्त्रेण याचते—

पुनः दुसरा मंत्र म्हणून प्रार्थना करितो—

**अग्ने नय सुपथा राये अस्मान्वि-**
**श्वानि देव वयुनानि विद्वान् ॥**
**युयोध्यस्मज्जुहुराणमेनो**
**भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम ॥ १८ ॥**

**इत्युपनिषत् ॥ इति वाजसनेयसंहितोपनिषत्संपूर्णा ॥**

**ॐ पूर्णमदः ० शिष्यते ॥**

**॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥**

**पदान्वयार्थ—अग्ने** ( हे अग्निदेवते ! ) **देव** ( हे देदीप्यमान देवा ! ) **अस्मान्** ( आम्हांला ) **राये** ( धनासाठीं, केल्या कर्मांचा उपभोग मिळ-ण्यासाठीं ) **सुपथा** ( चांगल्या मार्गानें देव—मार्गानें ) **नय** ( ने ) —तूं— **विश्वानि** ( सर्व, यच्चयावत् ) **वयुनानि** ( कर्में, आमचीं कर्में ) **विद्वान्** ( जाणणारा आहेस. ) **अस्मान्** ( आमचें ) **जुहुराणं** ( चंद्रासारखें वक्र असें ) **एनः** ( पाप ) **युयोधि** ( नाहींसें करून टाक ), **ते** ( तुला ) **भूयिष्ठां** (पुष्कळ) **नमउक्तिं** ( नमस्काराची उक्ति ) **विधेम** ( करितों ). सारांश, हे अग्ने ! आम्हांला चांगल्या लोकीं ने. तुला आमचीं सर्व कर्में ठाऊक आहेत. आमचें सर्व पाप नाहींसें करून टाक. आतां फार सांगत नाहीं. केवळ पुष्कळ नमस्कार मात्र आम्ही तुला करितों. आम्हांला सद्गति दे.

याप्रमाणें वाजसनेयसंहितेंतील ईशावास्य उपनिषदाचें मूळ संपलें.

**भा०—अग्ने नयेति । हे अग्ने नय गमय सुपथा शोभनेन मार्गेण । सुपथेति विशेषणं दक्षिणमार्गनिवृत्त्यर्थम् । निर्विण्णोऽहं दक्षिणेन मार्गेण गतागतलक्षणेनातो याचे त्वां पुनः पुनर्गमनागमनवर्जितेन शोभनेन पथा नय । राये धनाय कर्मफलभोगायेत्यर्थः । अस्मान्यथोक्तधर्मफलविशिष्टान्विश्वानि सर्वाणि हे देव वयुनानि कर्माणि प्रज्ञानानि वा विद्वाञ्जानन् । किं च युयोधि वियोजय विनाशयास्मदस्मत्तो जुहुराणं कुटिलं वंचनात्मकमेनः पापम् ।**

ततो वयं विशुद्धाः सन्त इष्टं प्राप्स्याम इत्यभिप्रायः । किंतु वयमिदानीं ते न शक्नुमः परिचर्यां कर्तुं भूयिष्ठां बहुतराम् । ते तुभ्यं नमउक्तिं नमस्कारवचनं विधेम नमस्कारेण परिचरेमेत्यर्थः । अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते । विनाशेन मृत्युं तीर्त्वा संभूत्यामृतमश्नुत इति श्रुत्वा केचित्संशयं कुर्वन्ति । अतस्तन्निराकरणार्थं संक्षेपतो विचारणां करिष्यामः । तत्र तावत्किंनिमित्तः संशय इत्युच्यते । विद्याशब्देन मुख्या परमात्मविद्यैव कस्मान्न गृह्यतेऽमृतत्वं च । ननूक्तायाः परमात्मविद्यायाः कर्मणश्च विरोधात्समुच्चयानुपपत्तिः । सत्यम् । विरोधस्तु नावगम्यते विरोधाऽविरोधयोः शास्त्रप्रमाणकत्वात् । यथा विद्यानुष्ठानं विद्योपासनं च शास्त्रप्रमाणकं तथा तद्विरोधाविरोधावपि । यथा च 'न हिंस्यात्सर्वाणि भूतानीति' शास्त्रादवगतं पुनः शास्त्रेणैव बाध्यते 'ध्वरे पशुं हिंस्यादिति'। एवं विद्याऽविद्ययोरपि स्यात् । विद्याकर्मणोश्च समुच्चयो न 'दूरमेते विपरीते विषूची अविद्या या च विद्ये' ति श्रुतेः । 'विद्यांचाऽविद्यां चेति' वचनादविरोध इति चेन्न । हेतुस्वरूपफलविरोधात् । विद्याऽविद्याविरोधाविरोधयोर्विकल्पासंभवात्समुच्चयविधानादविरोध एवेति चेन्न । सहसंभवानुपपत्तेः । क्रमेणैकाश्रये स्यातां विद्याविद्ये इति चेन्न । विद्योत्पत्तावविद्याया ह्यस्तत्वात्तदाश्रयेऽविद्यानुपपत्तेः । न ह्यग्निरुष्णः प्रकाशश्चेति विज्ञानोत्पत्तौ यस्मिन्नाश्रये तदुत्पन्नं तस्मिन्नेवाऽऽश्रये शीतोऽग्निरप्रकाशो वेत्यविद्याया उत्पत्तिर्नाऽपि संशयोऽज्ञानं वा । 'यस्मिन् सर्वाणि भूतान्यात्मैवाऽभूद्विजानतः । तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यत' इति शोकमोहाद्यसंभवश्रुतेः । अविद्यासंभवात्तदुपादानस्य कर्मणोऽप्यनुपपत्तिमवोचाम । अमृतमश्नुत इत्यापेक्षिकममृतम् । विद्याशब्देन परमात्मविद्याग्रहणे हिरण्मयेनेत्यादिना द्वारमार्गादियाचनमनुपपन्नं स्यात्तस्मात्तदुपासनया समुच्चयो न परमात्मविज्ञानेनेति यथाऽस्माभिर्व्याख्यात एव मंत्राणामर्थ इत्युपरम्यते ॥ १८ ॥

भाष्यार्थ—हे अग्ने ! आम्हांला चांगल्या मार्गानें घेऊन जा, दक्षिणमार्गानें, वाईट व यातनामय मार्गानें, घेऊन जाऊं नको, पुनः पुनः जाण्यायेण्यास लावणारा जो जन्म—मरणदायक दक्षिणमार्ग त्या मार्गानें आम्हांला नेऊं नको. त्याचा, जन्ममरणाचा, आतां कंटाळा आला आहे, म्हणून आम्हांस चांगल्या मार्गानें ने. आम्हीं जीं काय आजपर्यंत कर्मे केलीं आहेत, व उपासना ज्ञान जोडिलें आहे तें सर्व तुला विदितच आहे. म्हणून कर्मांचें फल भोगण्यासाठीं आम्हांस चांगल्या

मार्गानें घेऊन जा. तसेंच आजपर्यंत आम्ही जीं कपटाचीं पापाचरणें केलीं आहेत, तीं सर्व नाहींशीं करून टाक. याप्रमाणें आम्ही निष्पाप झालों म्हणजे आम्हांला जें प्रिय आहे त्याचीच प्राप्ति होईल. आतां या पुढें हे देवा ! तुझी उपासना पुष्कळशी करण्याचें अशक्ततेमुळें शरीर–सामर्थ्य नाहीं. केवळ 'तुला नमस्कार असो !' येवढी मात्र प्रार्थना पुनः पुनः करितों. सारांश, या प्रार्थनेला तुष्ट होऊन आम्हांला चांगल्या मार्गानें घेऊन जा.

सिद्धान्ती—अकराव्या व चौदाव्या मंत्रांमध्यें 'अमृत' हा शब्द आहे म्हणून कित्येकांस संशय उत्पन्न होतो, त्याच्या निराकरणासाठीं व अर्थाचा निर्णय करण्यासाठीं आम्हांस थोडासा विचार केला पाहिजे.—

शि०—कोणत्या कारणास्तव संशय उत्पन्न झाला आहे ?

पू०—'विद्या' शब्दानें परमात्मविद्या, ब्रह्मविद्या, असा बोध कां करून घेऊं नये ? घ्यावा. कारण 'अमृतत्त्व' प्राप्त होतें असें फल सांगितलें आहे. कर्म व विद्या, यांचा समुच्चय श्रुतीस इष्ट आहे.

शिष्य—अहो ! ब्रह्मविद्येचा आणि कर्मांचा अत्यंत विरोध आहे. यांचा समुच्चय कसा होणार ? प्रकाश आणि अंधकार हे दोन एकस्थलीं व एक काळीं असतात, असें कोणी म्हटलेंच तर तें म्हणणें कोणासही पटावयाचें नाहीं.

पू०—हें ठीक आहे; पण विरोध आहे कुठें ? विरोध आणि अविरोध यांना शास्त्राचें प्रमाण हवें असतें व तें आहेही.

शिष्य—म्हणजे ?

पू०—जसें अविद्येचें अनुष्ठान व अविद्येची उपासना हीं म्हणजे कर्म आणि उपासना व यांचा समुच्चय हीं शास्त्रप्रमाण आहेत, तसेंच विरोध आणि अविरोध यांनाही शास्त्र प्रमाण आहे.

शि०—तें कसें ? व कोणतें तें प्रमाण ?

पू०—'कोणत्याही भूताचा संहार करूं नये' हा शास्त्रानें सांगितलेला एक सामान्य नियम दुसऱ्या शास्त्र–नियमानें बाधित होतो; 'यज्ञामध्यें पशु–हिंसा करावी' असा दुसरा 'शास्त्र–नियम आहे. तेव्हां पशुहिंसेचा विधि आणि पशु-हिंसेचा प्रतिषेध या उभयतांसही शास्त्र प्रमाण आहे. एकच शास्त्र या दोन्ही गोष्टी सांगतें व समुच्चयानें त्या गोष्टी होतात; तसेंच, "विद्या आणि कर्म यांचा समुच्चय होऊं शकत नाहीं. कारण 'अविद्या व विद्या हीं परस्परांपासून अति–दूर, अति–विलक्षण व अति–भिन्न–मार्गानें जाणारीं आहेत' असें श्रुति सांगते" हा विरोध होय. पण या श्रुतीचा बाध याच उपनिषदांतील अकरावा मंत्र करितो व समुच्चय करावा, असें तो मंत्र विहित करतो. सारांश, विरोध आणि अविरोध हे शास्त्रानें प्रमाणच आहेत.

शि०—असें नाहीं, कर्म-विद्या व ब्रह्मविद्या यांचे हेतु निराळे आहेत, स्वरूपें निराळीं आहेत. आणि फलेंहि निराळीं आहेत. कर्माचे हेतु, तत्स्वरूप आणि तत्फल हीं सर्व विद्येचे हेतु, तत्स्वरूप आणि तत्फल यांच्याशीं अत्यंत विरोध करितात.

पू०—पण विद्या आणि अविद्या यां मधील विरोधाविरोधांचा विकल्प संभवत नाहीं. आणि त्यांचें समुच्चयानें अकराव्या मंत्रांत विधान केलें आहे, म्हणून अविरोधच आहे. सारांश, उभयतांमध्यें विरोध नाहीं.

सि०—कर्म आणि विद्या एका ठिकाणीं असणें शक्यच नाहीं. कर्माचा उदय अज्ञानांत आहे. ब्रह्मविद्येचा उदय ज्ञानांत आहे. एकीकडे माया आहे, दुसरीकडे नाहीं.

पू०—हीं दोन्हीं एकावेळीं एका जीवाचे ठिकाणीं असूं शकणार नाहींत. पण एक संपल्यावर तरी दुसऱ्याचा अधिगम होईल ?

सिद्धान्ती०—नाहीं. ज्ञान झालें म्हणजे अविद्येचा नाशच होतो. ब्रह्मज्ञान झाल्यावर अविद्येचा आश्रयच नाहींसा होतो. 'अग्नि हा उष्ण आणि तेजस्वी आहे,' असें ज्ञान झाल्यानंतर त्याच्या आश्रयानें हें ज्ञान उत्पन्न झालें त्याच आश्रयामध्यें 'अग्नि थंड आहे किंवा निस्तेज आहे' असें ज्ञान होणें शक्यच नाहीं. म्हणून अविद्येची उत्पत्ति किंवा संशय किंवा अज्ञान, यांचा संभव ब्रह्मसाक्षात्कार झाल्यावर शक्यच नाहीं. सातवा मंत्र काय सांगतो तें पुनः पहाः ज्ञान झालेल्या पुरुषास शोक-मोहादि होणें शक्य नाहीं. असेंच हा मंत्र सांगतो ना ? असोः अविद्येचाच जेथें असंभव आहे, तेथें अविद्याजन्य जें कर्म, त्याची उत्पत्ति कोठून होणार ? सारांश, तुमचें म्हणणें सर्वथा अयोग्य आहे. येथें जो 'अमृत' शब्द आहे, तो मृत्यूच्या दृष्टीनें योजिलेला आहे. तो सापेक्ष शब्द आहे. स्वर्ग-सुख हा त्याचा अर्थ आहे; मोक्ष नव्हे. 'विद्या' शब्दानें जर ब्रह्मविद्येचें ग्रहण केलें, तर पंधराव्या मंत्रापासून 'दार उघडण्याची व मार्ग दाखविण्याची' अशी जी शेवटपर्यंत प्रार्थना केली आहे, ती अयोग्य ठरेल. कारण ब्रह्मज्ञ पुरुष दार उघडावयास सांगत नाहीं. किंवा मार्गदर्शकाचीही याचना करीत नाहीं. ब्रह्मज्ञ पुरुष ब्रह्मच होतो. त्याला येथेंच मोक्ष मिळतो. हें श्रुतिप्रमाण आहे. म्हणून येथें जो समुच्चय इष्ट आहे, तो कर्माचा आणि उपासनेचा आहे. कर्म आणि ब्रह्मविद्या यांचा नाहीं. आणि हाच अर्थ आम्हीं या उपनिषदांत प्रकट केला आहे. याहून जास्त काय सांगावें ?

**इति श्रीगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यस्य परमहंसपरिव्राजकाचार्यस्य श्रीशंकरभगवतः कृतौ वाजसनेयसंहितोपनिषद्भाष्यं संपूर्णम् ॥ ॐ तत्सत् ॥**

---

# श्रीरामानुजमतानुयायी नारायणकृत प्रकाशिका.

सर्वेशानः सर्वभूतान्तरात्मा दोषानर्हः सर्वविद्यैकवेद्यः ।
कर्माराध्यः साध्यभक्त्यैकलभ्यः श्रीमान्व्यक्तो वाजिनां संहितान्ते ॥

रजस्तमःप्रचुरकरणकलेवरसृष्टिविशिष्टत्वादीश्वरोऽहमहं भोगीत्यादिभगवदुक्तप्रक्रियया स्वतन्त्रोऽहं देवतान्तरपरतन्त्रोऽहमिति च भ्राम्यतस्तत्त्वबुभुत्सयोपसन्नस्य शिष्यस्य स्वतन्त्रतात्मभ्रमादिनिवृत्त्यर्थं चिदचिदात्मकस्य प्रपञ्चस्य परमपुरुषायत्तस्वरूपस्थितिप्रवृत्तित्वमुपादिशति—

## श्रीरामानुजाचार्य शिष्याच्या नारायणाची प्रकाशिका.

गुरु०—आतां यानंतर वाजसनेय संहितेंतील शेवटच्या अध्यायाचें नांदीपूर्वक विस्तृत व्याख्यान करितों. या अध्यायाला ईशोपनिषद् म्हणतात. असो; सर्वांवर सत्ता चालविणारा, सर्व भूतांच्या अंतर्यामी राहून त्यांचें नियमन करणारा, स्वरूपामध्यें कोणत्याही दोषाचा गंध नसणारा, सर्व वेदवेदान्तादि विद्यांच्या अध्ययनानें मात्र समजून येणारा, सत्कर्म करून मात्र ज्याची आराधना करितां येते, साधन होण्यास योग्य अशा एकनिष्ठ भक्तीनें मात्र ज्याची प्राप्ति होते, जो षड्गुणैश्वर्यसंपन्न आहे, त्या सच्चिदानंद परमेश्वराचें स्वरूप वाजसनेय संहितेच्या शेवटीं प्रकट झालें आहे.

वत्सा ! रजोगुण आणि तमोगुण यांचें विशेष प्राबल्य झाल्यामुळें कित्येक जीवांचें शरीर व अंतःकरण कांहीं विशेष प्रकारचें झालेलें असतें. "मीच ईश्वर आहें, भोगण्याचा अधिकार मलाच आहे," इत्यादि श्रीकृष्णांनीं भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें वृत्ति होऊनही "मी स्वतंत्र आहें, तरी परमेश्वरव्यतिरिक्त अन्य कांहीं देवतांच्याच तंत्रानें चालणारा आहें !" अशा प्रकारचा या पुरुषास जो भ्रम होतो, तो जीवांचा भ्रम नाहींसा करावा व आपल्याला तत्त्वज्ञान व्हावें या इच्छेनें शरण आलेल्या शिष्यांचा स्वतंत्रतात्मक भ्रम नाहींसा करावा, एतदर्थ हा उपदेश आहे. तसेंच स्थावर-जंगमांनीं व चराचरांनीं ( येथें जड पदार्थ आणि ज्ञानी जीव या दोघांचाही समावेश होतो ) घटित झालेला जो हा प्रपंच ( सृष्टिव्यवहार ) तो परमेश्वराच्या ( पुरुषोत्तमाच्या ) मात्र तंत्रानें चालत असून त्या संसाराचें स्वरूप, त्याची स्थिति व व्यवहार हीं सर्व परमेश्वराधीनच आहेत असा उपदेश करावा, असा या मंत्रांचा अभिप्राय आहे.

## *मंत्र पहिला.

इदं ब्रह्मादिस्तम्बपर्यन्तं सर्वमीश्वरव्यतिरिक्तं भोक्तृभोग्यरूपम् । ईशा सर्वनियन्त्रा पुरुषेणेति यावत् । 'योऽसावसौपुरुषः' [ बृ० ५।१५।१ ] । इत्यनुवदिष्यमाणत्वात् । स हि सर्वस्येष्टे । तथा च श्रुत्यन्तरम्—'पतिं विश्वस्याऽऽत्मेश्वरम्' [ म० ना० ११।३ ] । इति । तेन वास्यं वसनीयं व्याप्यमिति भावः । 'यच्च किंचिज्जगत्सर्वं दृश्यते श्रूयतेऽपि वा । अन्तर्बहिश्च तत्सर्वं व्याप्य नारायणः स्थितः' ॥ ( महानारदीय० ११।६ ) इति श्रुतेः ॥

सिद्धान्ती—हें सर्व विश्व भोक्तृभोग्य स्वरूपाचें आहे, म्हणजे ब्रह्मदेवापासून अणूपर्यंत असणाऱ्या या सर्व चराचर संसारांत भोगण्याचे विषय आणि भोगणारे प्राणी यांचा समावेश होतो. परमेश्वराशिवाय बाकी यच्चयावत् वस्तूंचा प्रपंचामध्यें अंतर्भाव होतो. हा सर्व प्रपंच ईश्वरात्मक आहे व त्याचे अंश जीव व जड हे असून या सर्वांचा स्वामी, सर्वनियंता, परमेश्वर ( उत्तम पुरुष ) आहे. "जो हा तोच हा पुरुष आहे" ( बृहदा० ५।१५।१ ) अशी श्रुति पुढें अनुवाद-रूपानें येणार आहे. कारण तो सर्वांचा स्वामी आहे. याचप्रमाणें दुसरी श्रुति म्हणते:—"विश्वाचा आत्मा व त्याचें पालन करणारा एक परमेश्वर मात्र आहे." ( महानारदीय ११।३ ) या परमेश्वरानें हें विश्व व्यापिलेलें आहे.

'या जगामध्यें जे यच्चयावत् पदार्थ दिसतात किंवा ऐकावयास येतात ते सर्व (अंतर्विश्वांतील व बाह्यविश्वांतील) पदार्थ व्यापून सर्वेश्वर नारायण राहिला आहे.' ( म० ना० ११।६ ) अशी श्रुति प्रमाण आहे.

यद्वा सर्वाधारे स्वस्मिन्नेव सर्वं वास्यं प्रतिष्ठापनीयम् । स्मर्यते हि—

सर्वत्रासौ समस्तं च वसत्यत्रेति वै यतः ।
ततः स वासुदेवेति विद्वद्भिः परिपठ्यते ॥ इति ।

शिष्य०—भगवन् ! किंवा सर्वांचा आधार जो परमेश्वर आहे त्याच्या आश्रयानें व त्याच्या स्वरूपामध्यें ह्या सर्व विश्वाची स्थापना झाली आहे. असाही अर्थ होईल. स्मृतीमध्यें म्हटलें आहे कीं परमेश्वराला विद्वान् लोक वासुदेव असें म्हणतात. याचें कारण तो सर्वव्यापी आहे आणि प्रत्येक वस्तूच्या अंतर्यामीं व बाहेर सर्वत्र तो वास्तव्य करितो म्हणजे राहतो. म्हणजे सर्व विश्व त्याच्या आश्रयानें व त्याच्या स्वरूपामध्यें राहतें.

---

* मंत्रांचे अन्वयार्थ मागें दिलेच आहेत. केवळ भाष्य व त्याचा अर्थ इतका मात्र विषय येथें घेतला आहे.

जगत्यां मह्याम् । इदं लोकान्तरोपलक्षणम् । जगदन्यथात्वं मच्छत् । तत्र चिदंशस्य भोग्यत्वाय स्वरूपविकाररूपमन्यथात्वम् । चिदंशस्य तु भोक्तृत्वाय ज्ञानसंकोचविकासादिस्वभावविकारेणान्यथात्वमिति भेदोऽनुसंधेयः । ईशेनावास्यं किंचिदपि नास्तीति द्रढयितुं यत्किंचेति जगद्विशेष्यते । जगत्यादिषु लोकेषु यत्किंचिद्भोक्तृभोग्यरूपं जगदस्ति तदिदं सर्वमीशा वासुदेवेन वास्यं धार्यं चेति वाक्यार्थः ।

गुरु०—ठीक ! पुढें चल. जगत्याम् म्हणजे ह्या पृथ्वीमध्यें. या शब्दानें इतर लोकांचाही म्हणजे विश्वांतील सर्व भुवनांचा उल्लेख होतो. पृथ्वी हें उपलक्षण आहे; यानें सर्व जगतांचा बोध होतो. जगत् या शब्दानें जडपदार्थांचा ( उपभोग घेण्यास उपयोगी आणि स्वस्वरूपामध्यें विकार पावून अन्य स्वरूप घेणाऱ्या विषयांचा ) उल्लेख होतो. तसेंच उपभोग घेणारे व ज्ञानाचा संकोच, विकास, इत्यादि विकारांनीं अन्य स्वरूप पावणाऱ्या जीवांचा उल्लेख होतो. सारांश, भोगाचे विषय असून स्वरूपीं विकार पावणारे जड पदार्थ व ज्ञानाच्या कमी-जास्तपणामुळें विकार पावणारे जीव ( विषय भोक्ते ) या दोघांचाही अन्तर्भाव ह्या जगत् शब्दामध्यें होतो ' जगत् ' म्हणजेच ' अन्यस्वरूप प्राप्त करून घेणारें ' असा अर्थ आहे. या जगांत ईश्वरानें व्याप्त नाहीं असा कोणताही पदार्थ नाहीं. हें दृढ करण्यासाठीं " यत्किंच (सर्व कांहीं) " हे शब्द घातले आहेत. असो; या सर्व भुवनांमध्यें जीव व जड या भिन्न स्वरूपानें जें जें कांहीं आहे तें तें या सर्व नियामक वासुदेवानें धारण केलें आहे, सर्वांस वासुदेवाचा आश्रय आहे. प्रथमार्धाचा सारांश, सर्व कांहीं वासुदेवानें व्यापलेलें आहे, असा आहे.

इन्द्रियाणि मनो बुद्धिः सत्त्वं तेजो बलं धृतिः ।
वासुदेवात्मकान्याहुः क्षेत्रं क्षेत्रज्ञ एव च ॥ [ गी० ३।४० ]

इत्याद्युपबृंहणानि बोध्यानि ' पृथगात्मानं प्रेरितारं च मत्वा [ श्वे० १।६ ] । ' ज्ञाज्ञौ द्वावजावीशनीशौ ' [श्वे० १।९] । ' नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान् [ श्वे० ६।१३ ] इत्यादिषु श्रुतिषु प्रसिद्धो जीवेश्वरयोरीशेशितव्यादिलक्षणोऽत्यन्तभेदोऽप्यत्र सिद्धः । ननु रूढिर्योगमपहरतीति न्यायात् ईशोऽत्र रुद्रः स्यात् ।

नैवम् ।

' एको ह वै नारायण आसीन्न ब्रह्मा नेशानो नेमे द्यावापृथिवी न नक्षत्राणि न यमो नाग्निर्न सोमो न सूर्यः स एकाकी नर एव' [ म० १ ] । इत्यादिषु श्रुतिषु भगवत्कार्यत्वेन कर्मवश्यत्वेन च

संप्रतिपन्ने रुद्रे सर्वव्यापित्वसर्वाधारत्वादेरन्वयासंभवेन विरुद्धार्थविषयतयैव रूढेर्भग्नत्वात्। एवं च जगत्कारणवादिवाक्यावगताकाशप्राणादिशब्दन्यायेनाजः सर्वेश्वरः सिद्ध इत्यनवच्छिन्नैश्वर्यतया प्रसिद्धेः सर्वेश्वरेऽयौगिक एवायमीशशब्दः प्रत्येतव्य इति सिद्धम्। एवं मुमुक्षोरीश्वरपारतन्त्र्यबोधमुत्पाद्य वैराग्यभूषितां वृत्तिमुपदिशति-तेन त्यक्तेन भुञ्जीथाः। तेन जगता भोग्यताभ्रमविषयेणेति भावः। त्यक्तेनाल्पत्वास्थिरत्वदुःखमूलत्वदुःखमिश्रत्वदुःखोदर्कत्वदेहाभिमानमूलत्वादिस्वाभाविकब्रह्मानन्दानुभवविरुद्धरूपविषयदोषनिरूपणपूर्वकपरित्यक्तेनोपलाक्षितः सन्भुञ्जीथाः। भगवदुपासोपयुक्तदेहस्य धारणमात्रौपयिकमन्नपानादिकं यागदानहोमार्चनाद्युपयोगिपरिजनपरिच्छदादिकं च वर्गं भुञ्जीथा इत्यर्थः। यद्वा दोषसप्तकनिरूपणात्त्यक्तेन भोग्याभासेनोपलक्षितः सन्भुञ्जीथाः। सर्वावासत्वेन प्रकरणप्राप्तं प्रकृतमुक्तदोषप्रतिभटं निरतिशयभोग्यं वक्ष्यमाणोपायमूढेन भुञ्जीथा इति योज्यम्। तत्र 'भोक्ता भोग्यं प्रेरितारं च मत्वा' [ श्वे० १।१२ ]

'द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति ॥

[ मुण्ड० ३।१ ]

'समाने वृक्षे पुरुषो निमग्नोऽनीशया शोचति मुह्यमानः।
जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्य महिमानमिति वीतशोकः ॥'

[ मु० ३।२ ] इत्यादिभिः प्रपञ्चितस्तत्त्वत्रयविवेकोऽप्यत्रेति भावः। अनीशया भोग्यभूतया मायया प्रकृत्येत्यर्थः। जुष्टं प्रीयमाणम्। स्वस्मादन्यमीशमस्येशस्य महिमानमिति महिमानं चेत्यर्थः। तदेतिप्रतिनिर्देशोऽध्याहार्यः। यदाऽन्यमीशमस्य महिमानं च पश्यति तदा वीतशोको भवतीत्यर्थः। मा गृधः कस्यस्विद्धनम्। कस्यचिद्धनं कस्याऽपि बन्धोरबन्धोर्वा धनं मा गृधः, माऽभिकाङ्क्षीः। गृधु अभिकाङ्क्षायामिति धातुः।

आह च यमः किंकरं प्रति—

परमसुहृदि बान्धवे कलत्रे सुतवनितापितृमातृभृत्यवर्गे।
शठमतिरुपयाति योऽर्थ-तृष्णां पुरुषपशुर्नहि वासुदेवभक्तः ॥

इति स्मृतेः। इदं च धनाशाप्रहाणं परमात्मव्यतिरिक्तकृत्स्नविषयवैराग्योपलक्षणम्।

परमात्मनि यो रक्तो विरक्तोऽपरमात्मनि। इति स्मृतेः ॥ १ ॥

शिष्य०—गुरुजी! सर्व ज्ञान–कर्मेंद्रियें मन, बुद्धि, सत्त्व, तेज, बळ, धृति, (धैर्य) सारांश, हें सर्व क्षेत्र (सर्व जडपदार्थ) आणि सर्व क्षेत्रज्ञ (सर्व जीव) हे वासुदेवात्मक आहेत. (गीता* ३।४०) अशी ही एक स्मृति आहेच!

गुरु०—होय. हें व इतर वाक्यें हीं ध्यानांत ठेवणें इष्ट आहे. कारण येथें जीव व शिव हे परस्पराभिन्न आहेत, हें स्पष्ट करावयाचें आहे. पहा:— "आपण निराळा आणि आपला प्रेरक निराळा असें मानून" (श्वेताश्वतर १।६) "ज्ञाता आणि अज्ञानी असे हे ईश्वर आणि तत्तंत्रानें चालणारा जीव हे दोघे अनादि आहेत" (श्वे० १।९) "नित्यांचा (जीवांचा) नित्य (ईश्वर) आणि चेतनांचा चेतक हा परमेश्वर असून तो पुष्कळांच्या इच्छा पूर्ण करितो" (श्वे० ६।१३) इत्यादि श्रुतींमध्यें जीव आणि ईश्वर यांचा संबंध सेव्य–सेवकाचा आहे. व या उभयतांमध्यें अत्यंत भेद आहे, असें सांगितलें आहे. तोच अर्थ या मंत्राच्या पहिल्या अर्धांत स्पष्ट करून श्रुतीला जीवशिवांमध्यें अत्यंत भेद आहे, असें सांगावयाचें आहे.

शि०—भगवन्! शब्दसिद्ध अर्थापेक्षां (यौगिक अर्थापेक्षां) रूढ झालेला (प्रचारांत आलेला) अर्थ जास्त बलवान् असतो असा न्याय आहे; म्हणून वरील मत्रांत ईश याचा अर्थ रुद्र असा कां घेऊं नये? ईश म्हणजे रुद्र' असें म्हणण्याची रूढीही आहे.

गुरुजी—नाहीं, असा अर्थ होणार नाहीं. कारण "एक नारायणच पूर्वी (आदिकालीं) होता. ब्रह्मा किंवा रुद्र, किंवा द्यावापृथ्वी, नक्षत्रें, यम, अग्नि, सोम, सूर्य, हे कोणीही नव्हते. तो नारायणच एकटा एक नर होता." (म० १] इत्यादि श्रुतींवरून रुद्र हा नारायणानें उत्पन्न केला आहे व तो कर्माला वश आहे, (तो कर्माच्या स्वाधीन असतो, कर्म–तंत्रानें चालतो.) म्हणून कर्म–तंत्र व नारायणतंत्र रुद्राला सर्व–व्यापकत्व, सर्वाश्रयत्व (सर्वांस आश्रय देणें हा धर्म) इत्यादि लक्षणें असंभवनीय होतात, लागत नाहींत. तसेंच, प्रस्तुत रूढीही विरुद्ध अर्थाचें प्रतिपादन करिते म्हणून या मंत्रांत ईश या शब्दाचा रुद्र असा अर्थ घेतां येत नाहीं. याचप्रमाणें, जगत्–कारण सांगणारीं जीं वाक्यें आहेत, तेथें अवगत झालेल्या आकाश, प्राण इत्यादि शब्दांची जशी व्यवस्था लागते, त्याच न्यायानें व हा परमेश्वर जन्मरहित, सर्वस्वामी, स्वयंभू इत्यादि निरुपाधिक ऐश्वर्यांनें मंडित आहे म्हणून, येथील 'ईश' शब्द हा सर्वेश्वर जो नारायण त्यालाच लावला पाहिजे, हें सिद्ध झालें. याप्रमाणें वरील मंत्रार्धाचा अर्थ असा आहे कीं, जीव हा सर्वथा ईश्वरतंत्र म्हणजे परतंत्र आहे, हें ज्ञान मुमुक्षूला समजावें. नंतर, त्यानें वैराग्यवृत्ति कशी धारण करावी तें दुसऱ्या अर्धांत

* ही गीता कोणती हें या नारायणपंडितांनीं सांगितलें नाहीं.

सांगितलें आहे. पहिल्या अर्थात जीव हा सर्वथा परमेश्वरतंत्र आहे, असें निश्चयपूर्वक सांगण्याचा मात्र अभिप्राय आहे. असो.

त्या 'भोग्यता' नामक भ्रम उत्पन्न करणाऱ्या जगताचा ( सर्व विषयांचा ) त्याग करावा. कारण ते सर्व विषय अल्प आनंद देणारे, चंचल, ( अनित्य ) दुःखमूलक, दुःखमिश्रित, दुःखमय, देहाभिमान उत्पन्न करणारे, इत्यादि लक्षणांचे असतात. अर्थातच स्वभावतः उत्पन्न होणारा जो ब्रह्मानंद आणि त्याचा अनुभव यांच्या विरुद्ध हे विषयदोष असतात. हें पूर्णपणें लक्षांत ठेवून म्हणजे हे विषय तुच्छ आहेत असें समजून त्यांचा उपभोग घ्यावा. सारांश, भगवंताच्या उपासनेला उपयोगी पडेल इतक्याच बेतानें आपला देह धारण करावा व देह धारण होईल इतकेंच मात्र आपण अन्नपानादिकांचें सेवन करावें. तसेंच याग, ( यज्ञ ) दान, होम, अर्चन, ( पूजा ) इत्यादिकांच्या उपयोगी पडतील असा परिवार व अशीं उपकरणें मात्र स्वकृत करावीं. जीव धारण होईल, इतकें अन्नपानादिकांचें सेवन आणि यज्ञ याग दान, धर्म, इत्यादि विहित कर्में करितां येतील, इतका मात्र परिग्रह ठेवावा व एवढ्याचा मात्र उपयोग घ्यावा. सारांश, ईश्वर उपासनेसाठीं उपभोग घ्यावा. भोगासाठीं ईश्वर-उपासना करूं नये. असा तात्पर्यार्थ आहे.

शिष्य०—महाराज ! याचा दुसराही असा अर्थ होईल कीं वर जे सात दोष सांगितले आहेत ते ध्यानांत ठेवून ( म्हणजे विषयसुखपोषक नाहींतच, जें सुखसें वाटतें तो भास आहे, असें समजून ) या विषयांचा उपभोग घ्यावा. सारांश, विषयसुखाचा त्याग करावा व मग कार्यापुरतें विषयसेवन करावें.

गुरु०—अथवा, सर्वत्र ईश्वर भरला आहे म्हणून हे सर्व विषयही आपापले स्वरूप-दोष टाकून देऊन ईश्वर-स्वरूपानें निरतिशयसुख देणारे झाले आहेत, असा निश्चय करून मुमुक्षूनें उपभोग घ्यावा. 'विषयभोगदृष्टीनें सुख देतील' हा जो मायाजनित भ्रम असतो तो टाकून देऊन ज्ञानदृष्टीनें मात्र त्यांचा उपभोग घ्यावा. निदान प्रकृतीमध्यें जे दोष आहेत, ते दोष परमेश्वरामध्यें नसल्यामुळें व त्याचे गुण प्रकृतिगुणांचे विरोधी असल्यामुळें, भोगाचें निरतिशय सुख देणाऱ्या परमेश्वराचा उपभोग पुढें सांगितलेल्या साधनांचे संबंधानें उपायमूढ होऊन उपभोग घ्यावा, असा हा उपदेश आहे.

शिष्य०—गुरुजी !—" भोक्ता निराळा आणि प्रेरक निराळा असें जाणून " ( श्वे० १।१२ ) " नित्य एकत्र राहणारे दोन पक्षी ( जीव आणि शिव ) अत्यंत स्नेही असून एकाच्च वृक्षाचा ( प्रपंचाचा, देहाचा ) आश्रय करून बसलेले असतात. त्यांतील एकजण ( जीव ) त्या वृक्षाचीं गोडगोड फळें खातो. आणि दुसरा ( ईश्वर ) कांहीं एक न खातां साक्षी मात्र असतो " ( मुंडक ३।१ ) " एकाच वृक्षावर जीव हा आपल्या पारतंत्र्यानें संसारांत बुडून गेलेला

असतो आणि म्हणून मूढ होऊन शोक करित असतो. पण आपल्यापेक्षां निराळा व आपला स्वामी (ईश्वर) आनंदरूपी आहे असें जाणून त्याचा महिमाही मोठा आहे असें जेव्हां त्याला समजतें, तेव्हां त्याचा शोक नाहींसा होऊन तो जीव शोकशून्य (आनंदी) होतो" (मुं० ३।२) इत्यादि श्रुतींमध्यें तीन तत्त्वांचा, भोक्ता (जीव), भोग्य (विषय) आणि त्यांचा स्वामी (परमेश्वर) यांचा, विस्तार केला आहे. तींच तीन तत्त्वें याही मंत्रांत सांगितलीं आहेत. असें मला वाटतें. असाच भावार्थ आहे. नाहीं ?

गुरु०—होय. वरील मुंडक श्रुतींत भोग्य असणारी जी माया किंवा प्रकृति तिचा (अनीशया शब्दानें) उल्लेख आहे. अनीश म्हणजे परतंत्र होय. त्याचप्रमाणें जीवाहून आनंदरूपानें निराळा (अन्य) परमेश्वर व त्याचा महिमा यांचाही उल्लेख आहे. जेव्हां परमेश्वर आणि त्याचा महिमा या उभयतांचें ज्ञान जीवाला होतें, तेव्हां जीवाचा शोक नाहींसा होतो असें स्पष्ट सांगितलें आहे. यावरून परतंत्र प्रकृति, दुःखी जीव व स्वतंत्र आणि आनंदी परमेश्वर या तीन तत्त्वांचा उल्लेख करून त्यांत अत्यंत भेद आहे, असें दाखविलें आहे.

शिष्य०—गुरुजी! 'कोणाचेंही धन घेऊं नको' या मंत्रगत शब्दाचा अर्थ असाचना कीं 'शत्रु किंवा मित्र कोणीही असो; त्याचे धनाचा अपहार करण्याची इच्छा करूं नको?' गृध्=अभिलाष करणें असा धात्वर्थ आहे.

गुरु०—होय. एकदां यम आपल्या दूतांस म्हणाला, "दूत हो! आपले परम स्नेही, बंधु-बांधव, कलत्र, पुत्र, माता-पिता, सेवक, इत्यादिकांचे ठिकाणीं जो दुष्ट पुरुष लबाडीनें, अर्थ-तृष्णा ठेवून मात्र त्यांची संगति करितो, तो पुरुष-पशूच होय. तो वासुदेवभक्त नव्हे." असो; परमात्म्याशिवाय बाकी सर्व विषयांसंबंधी वैराग्य उत्पन्न करून घ्यावें, हें 'धनाचा लोभ सोडून दे,' या वाक्यानें सांगितलें आहे. सारांश, सर्व विषयांचा परित्याग करून ईश्वरतंत्र आपण आहोंत असा उपदेश मुमुक्षूस व्हावा व ईश्वरसेवेस उपयोगी पडेल इतकाच विषयभोग घ्यावा, हा या पहिल्या मंत्राचा अर्थ आहे. म्हटलें आहे; परमेश्वरावर ज्याची भक्ति असते तो इतर पदार्थांच्या संबंधानें विरक्तच असतो ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**एवं विरक्तस्य विदुषः फलसङ्गकर्तृत्वादिरहितो ब्रह्मविद्याङ्गभूतः कर्मयोगो यावज्जीवमनुष्ठेय इत्याह—**

सिद्धान्ती—याप्रमाणें ज्या पंडिताला वैराग्य प्राप्त झालें आहे, त्यानें फलाची आशा न धरितां व कर्तृत्वाचा अभिमान सोडून देऊन यावज्जीव श्रुतिविहित कर्मयोगाचें अनुष्ठान करावें. हा असला कर्मयोग ब्रह्मविद्येचें एक अंगच आहे. असा अभिप्राय मनांत आणून म्हणतात—

**शतं समाः, शतं संवत्सरान्। कर्माणि नित्यनैमित्तिकानि। कुर्वन्नेवेह लोके जिजीविषेज्जीवितुमिच्छेत्। ब्रह्मविदोऽपि यावद्विद्यापूर्ति जीवितुमिच्छा भवतीति प्राप्तत्वात्। शतायुर्वै पुरुष इति श्रुतेः। यावज्जीवं नित्यनैमित्तिककर्माणि कुर्वीतेति विधिः संक्रामयितव्यः। यावज्ज्ञानयोगाधिकारं कर्मयोगः कर्तव्य इति भावः। न कदाचिदपि विद्याङ्गं कर्म परित्यजेदित्येवकाराभिप्रायः। त्वयि। ईश्वरपरतंत्ररूपज्ञानतया तदाज्ञानपरिपालनरूपकर्मानुष्ठानेऽधिकारपूर्तिमतीति भावः। एवमेवानुष्ठानामित्यर्थः। उक्तमर्थं व्यतिरेकेण दृढीकरोति-नान्यथे तोऽस्तीति। इतः कर्मानुष्ठानादन्यथा प्रकारान्तरं नास्तीत्यर्थः। नान्यः पन्थास्तत्तोषकारणमिति स्मृतेः।**

शंभर वर्षेपर्यंत नित्यनैमित्तिक कर्में करून मात्र या कर्मभूमीवर जिवंत राहण्याची इच्छा प्रत्येक पुरुषानें करावी.' या मंत्रांतील आज्ञेचा अर्थ असा होतो कीं, ब्रह्मवेत्त्याला सुद्धां विद्या पूर्ण हस्तगत होईपर्यंत जीवंत राहण्याची इच्छा असते. म्हणून त्यानेंही नित्यकर्म केलेंच पाहिजे. 'मनुष्याला शंभरवर्षें आयुष्य असतें' असें श्रुति म्हणते. असो; सर्व ब्रह्मवेत्ते व तदितर पुरुष यांनीं नित्य–नैमित्तिक कर्माचें अनुष्ठान करावें, असा विधि विहित आहे. सारांश, ज्ञानयोगाचा अधिकार असतांनाही कर्मयोग करावा असा भाव आहे. मंत्रामध्यें जो "एव (ही)" असा शब्द आहे. त्याचा अभिप्राय असा आहे कीं, विद्येचें मुख्य अंग असणाऱ्या कर्माचा केव्हांही त्याग करूं नये. मंत्रांत "तुझ्यामध्यें" असा जो शब्द आहे त्याचा अर्थ असा कीं, जीव हा ईश्वर–तन्त्र आहे, तो ईश्वराच्या सर्वथा स्वाधीन आहे, असें ज्ञान झालें असतें, म्हणून याची आज्ञा परिपालन करण्याचें जें कर्मानुष्ठान त्याचा अधिकार पूर्णत्वानें संपादन केला आहे; अशा मुमुक्षूनें यावज्जीव कर्मानुष्ठान करावें. या म्हणण्याचें तात्पर्य असें आहे कीं, 'मी ईश्वर–परतंत्र आहें.' असें ज्ञान झालेल्या मुमुक्षूनें ईश्वराची आज्ञा एकनिष्ठेनें पाळावयाची आहे आणि मोक्षाचा अधिकार संपादन करावयाचा आहे.

हेंच अनुष्ठान होय. हाच अर्थ दृढ करण्याकरितां स्मृतिही असें म्हणते कीं, कर्मानुष्ठानाखेरीज परमेश्वराला संतुष्ट करण्याचें दुसरें साधनच नाहीं.

**नन्वीश्वरवेदिनोऽपि कर्मानुष्ठानादवश्यंभावी बन्धः स्यादित्याशङ्क्याऽऽह न कर्म लिप्यते नर इति । ब्रह्मविद्याविरुद्धेषु कर्मफलेषु न रमत इति नरः । प्रस्तुतब्रह्मविदि नरे विद्याङ्गतया क्रियमाणं कर्म न लिप्यते न स्वर्गादिहेतुर्भवति प्रत्युत शुद्धप्रत्यगात्मसाक्षात्कारमेवोत्पादयतीति भावः। यत्तु कुर्वन्नेवेह कर्माणीत्ययं विधिरविद्वद्विषय एव नतु ब्रह्मविद्विषयस्तस्य विधिनिषेधशास्त्रवश्यत्वाभावादिति व्याख्यानम् तत्प्रकरणविरुद्धम् । 'विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभय ँ्सह' [ ई० वा० । ११ ] इत्याद्युपरितनविध्यन्तरविरुद्धं चेति न वेदविदो बहु मन्वते ॥ २ ॥**

पूर्वपक्षी—अहो कर्माचें अनुष्ठान केलें असतां जीव आवश्यकतः बद्धच होतो; मग त्याला ईश्वराचें ज्ञान असो वा नसो. भगवद्भक्ताचें कर्मही स्वतःला प्रतिबद्धकच होणार.

सिद्धान्ती—नाहीं. ब्रह्मविद्येला जीं विरुद्ध कर्में व कर्मफलें आहेत त्यांमध्यें जो लिप्त होत नाहीं त्याला 'नर' म्हणावें अशी या शब्दाची व्युत्पत्ति आहे. म्हणून प्रस्तुत प्रकरणांत सांगितलेलें ब्रह्म जाणणाऱ्या नराला हें कर्म, विद्येची पुष्टि करणारें कर्म, केव्हांही बद्धक होत नाहीं. ह्या विहित कर्मानें स्वर्गनरकांची प्राप्ति होत नाहीं, इतकेंच नव्हे ( म्हणजे हें कर्म बद्धक होत नाहीं इतकेंच नव्हे ), तर शुद्ध व निर्विकार असा जो प्रत्यगात्मा आहे ( जो शुद्ध, निर्विकार सर्वज्ञ, सर्व दयाळु असा परमेश्वर आहे ) त्याचा साक्षात्कारही उत्पन्न करितें. सारांश, वर सांगितलेलीं नित्य नैमित्तिक कर्में निष्काम बुद्धीनें व निरहंकार–वृत्तीनें केलीं तर परमेश्वराची प्राप्ति होते. कारण या असल्या कर्मांनीं परमेश्वरी–ज्ञान होण्याला साधकास सर्व प्रकारचें परमेश्वरी साहाय्य मिळतें.

पूर्वपक्षी—अहो ! हा मंत्र ज्याला ब्रह्मज्ञान झालें नाहीं, त्यानें मात्र नित्य-नैमित्तिक कर्में करावीं, अशी आज्ञा विहित करितो. ब्रह्मवेत्त्याला कर्म करण्याची आवश्यकताच नाहीं. येथें ब्रह्मवेत्त्याचा विषयच नाहीं. व त्याचा संबंधही नाहीं. कारण ते विधि–निषेध शास्त्रांच्या सत्तेपलीकडे गेलेले असतात.

सिद्धान्ती—हा तुमचा अर्थ प्रस्तुत प्रकरणाला विरोधी आहे. चाललेल्या प्रकरणावरूनच असें दिसतें कीं ब्रह्मवेत्त्यानेंही विद्या–पोषक कर्में केलींच पाहिजेत. असा विधि या मंत्रांत स्पष्ट सांगितला आहे. याच उपनिषदांतील अकरावा मंत्र पाहिला म्हणजे तुमचें बोलणें अप्रासंगिक आहे, असें स्पष्ट दिसेल. तेथें विद्या व

अविद्या या उभयतांचा, ज्ञानकर्मांचा, समुच्चय केला आहे व दोहोंच्या ज्ञानांची आवश्यकता आहे, असें सांगितलें आहे. यावरून अर्थातच वेदवेत्ते आणि वेदावर श्रद्धा ठेवणारे लोक तुमच्या या म्हणण्याला मुळींच किंमत देणार नाहींत ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**एवं मंत्रद्वयेन तत्त्वत्रयं विद्याङ्कर्मानुष्ठानं चोपदिष्टम् । ईशनीया आसुरप्रकृतयः शास्त्रविधिमुत्सृज्य यज्ञादि कर्म कुर्वन्ति निषिद्धकर्म चाऽऽचरन्ति आत्मघातिनो निरयपातिन इत्युपदिशत्याचार्यः—**

याप्रमाणें वरील दोन मंत्रांत तीन तत्त्वांचा ( ईश्वर, जीव, आणि जगत् हीं तीन तत्वें ) आणि ब्रह्मविद्येस उपयोगी पडणारें कर्मांचें अनुष्ठान, यांचा उपदेश केला. आतां, यापुढील तिसऱ्या मंत्रांत ईश्वराच्याच स्वाधीन असणारे परंतु आसुर प्रकृतीनें वागणारे, लोक शास्त्रविधि सोडून देऊन यज्ञादि कर्मे करितात, सारांश, अविधिपूर्वक कर्मे करितात. व कांहीं लोक निषिद्ध कर्मांचें आचरण करितात; ते सर्व लोक आत्मघाती आहेत व त्यांना नरकवास मिळेल, हें सांगितलें आहे.

**असुराणां स्वभूता असुर्या अतिदारुणा इत्यर्थः । नामेति प्रसिद्धौ । असुरस्वभावानुभाव्या निरयसंज्ञिता लोकाः सन्तीति शास्त्रप्रसिद्धमिति भावः । तान्विशिनष्टि—अन्धेन तमसाऽऽवृता इति अन्धेनातिगाढेन तमसाऽन्धकारेणाऽऽवृता व्याप्ताः । आलोकप्रसङ्गरहिता इति भावः । ये केचन देवा मनुष्या ब्राह्मणक्षत्रियादयो वाऽऽत्महनः । ' असन्नेव स भवत्यसद्ब्रह्मेति वेद चेत् ' । [ तै० २।६।१ । ] इत्याम्नाता ब्रह्मज्ञानविहीनाः । काम्यनिषिद्धकर्मादिनिष्ठा इत्यर्थः । जना जनिमन्तः संसरन्त इत्यर्थः । ते प्रेत्य देहादुत्क्रम्य तानभितो गच्छन्ति । तान्पृथिव्यन्तरिक्षस्वर्गरौरवादिसंज्ञितान्निरयान्निरन्तरं गच्छन्तीति भावः ॥ ३ ॥**

सिद्धान्ती०—अति दारुण म्हणजे अति भयंकर अशी ज्यांची प्रकृति असते त्यांना आसुर प्रकृतीचे लाक म्हणतात. यांना आपल्या आसुरी स्वभावास अनुकूल असणाऱ्या प्रकृतीच्या अनुरोधानें ' निरय ' नामक लोकांत वास्तव्य करावें लागतें हें शास्त्र प्रसिद्धच आहे. या लोकांसाठींच नरकादि भुवनें उत्पन्न केलीं आहेत. हीं भुवनें अतिगाढ अंधकारानें भरलेलीं आहेत. येथें कोणी कोणास दिसत नाहीं व कोणी कोणास पाहूं शकतही नाहीं.—असो; जे कोणी देव किंवा मनुष्य ( ब्राह्मण क्षत्रियादि कोणीही ) आत्मघाती लोक आहेत.—

शिष्य॰—भगवन्! आत्मघाती म्हणजे काय?

सिद्धान्ती॰—"ब्रह्म हें असत् (शून्य) आहे, ब्रह्म नाहीं' असें जे लोक समजतात, ते असत् होतात" असें तैत्तिरीय श्रुति म्हणते. सारांश, ज्यांना ब्रह्मज्ञान नाहीं ते आत्मघाती लोक होत. हे आसुरी लोक नेहमीं काम्य आणि निषिद्ध कर्में करण्यामध्यें दंग झालेले असतात. अर्थातच हे लोक जन्ममरणाच्या चक्रांत सांपडतात, संसारी होतात. या लोकांचा देहपात होतांक्षणीं ते पृथ्वी, अंतरिक्ष, स्वर्ग, रौरव, नरक इत्यादि भुवनांमध्यें स्वस्वकर्मानुसार प्रवेश करितात. देहपात झाल्याबरोबर हा लोक सोडून ते स्वकर्माप्रमाणें इतर लोकीं जातात व तेथें सुखदुःखांचा अनुभव घेतात ॥ ३ ॥

---

## मन्त्र चवथा.

एवं विद्यायां शीघ्रं प्रतिपत्तिसिद्ध्यर्थमविदुषामनर्थ उक्तः। अथ सर्वावासत्वेन प्रस्तुतस्येश्वरस्यानन्तविचित्रशक्तियोगं व्यञ्जयन्नुपदिशति—

सिद्धान्ती—याप्रमाणें ब्रह्मविद्येकडे जीवांचें लवकर लक्ष लागावें आणि या विद्येविषयीं दृढ रुचि उत्पन्न व्हावी म्हणून अविद्वान् लोकांच्या दैवीं कोणते अनर्थ वाढून ठेविलेले असतात, हें तिसऱ्या मंत्रांत सांगितलें. आतां, या मंत्रांत सर्व चराचर विश्वास व्यापून राहणारा व सर्वांचें नियमन करणारा जो स्तुतियोग्य परमेश्वर त्याच्या अनंत आणि विचित्र शक्ति कशा आहेत त्यांचें दिग्दर्शन करितात.

अनेजन्नकम्पमानम्। एजृ कम्पने। एकं प्रधानतमम्। प्रधानं शास्त्रविदुषामिति रुद्रस्मृतेः। स्वाधिकसमानद्वितीयरहितमिति वा। 'न तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते' [श्वे० ६।८] इति श्रुतेः। परमसाम्यमापन्ना अपि मुक्ता ईशाधीना एवेति भावः। मनसो जवीयः, वेगवतो मनसो जवीयो वेगवत्तरम्। निष्कम्पं वेगवत्तरं चेति विरोधः प्रतीयते। परिहारस्तु विभुत्वाद्वस्तुतो नैजति तत एव मनसो गोचरदेशे वर्तत इति मनसो जवीय इत्युपचर्यत इति। किंच देवा ब्रह्मरुद्रादयः पूर्वमर्षत्। प्रागेव सर्षान्देवान्प्राप्नुवन्नित्यर्थः। एतत्प्रस्तुतं सर्वावासं ब्रह्म नाऽऽप्नुवन्नेतावन्तं कालं न लेभिर इति भावः। पूर्वमेव प्राप्तं न प्राप्नुवन्निति च विरोधः। विभुतया प्राप्तमपि कर्मसंकुचितज्ञानाः क्षेत्रज्ञा आचार्योपदेशमन्तरेण स्वबुद्ध्या नाप्नुऽवन्तीति परिहारः। तथोक्तं छान्दोग्ये 'तद्य-

थाऽपि हिरण्यनिधिं निहितमक्षेत्रज्ञा उपर्युपरि संचरन्तो न विन्देयुरेवमेवेमाः सर्वाः प्रजा अहरहर्गच्छन्त्य एतं ब्रह्मलोकं न विन्दन्त्यनृतेन हि प्रत्यूढाः [८।३।२] इति। 'अपि तद्धावतोऽन्यानत्येति यः पृथिव्यां तिष्ठन्' [बृ० ३।७।३] 'य आत्मनि तिष्ठन्'। 'यः सर्वभूतेषु तिष्ठन्' इत्यादिश्रुतेः। सर्वत्र तिष्ठदेव तद्ब्रह्म धावतोऽन्यान्देवादीनत्येति। तिष्ठतः पुरुषस्य धावदतिक्रमणं न घटत इति विरोधः। जविनो यावद्यावद्धावन्ति तावतस्तावतः परस्तादपि वर्तत इति तात्पर्यादविरोधः। तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति। तस्मिन्सर्वावासेऽवस्थितो मातरिश्वा वायुः। अप इत्युपलक्षणं पयोधरग्रहनक्षत्रतारकादिकं बिभर्तीत्यर्थः। सर्वाधारभूतेन सर्वेश्वरेण विधृतो वायुस्तत्सत्तयैव विभर्तीत्यभिप्रायः। 'एष सेतुर्विधरण एषां लोकानामसंभेदाय [बृ० ४।४।२२]।

द्यौः सचन्द्रार्कनक्षत्रा खं दिशो भूर्महोदधिः।
वासुदेवस्य वीर्येण विधृतानि महात्मनः॥

इत्यादिषु प्रसिद्धमेतत्॥ ४॥

सर्व वस्तूंमध्यें श्रेष्ठ व सर्व शास्त्रवेत्त्यांमध्यें मुकुटमणी जो परमेश्वर तो 'एक' या शब्दानें उल्लेखिला आहे. रुद्रस्मृतिही असेंच म्हणते. एक याचा अर्थ असाही होईल कीं ज्याच्याहून कोणी अधिक नाहीं किंवा ज्याच्या बरोबरीचाही कोणी नाहीं. 'त्याच्या बरोबरीचा कोणी नाहीं आणि त्याच्याहून श्रेष्ठतर असाही कोणी नाहीं.' अशी (श्वेताश्वतर ६।८) श्रुति प्रमाण आहे. तात्पर्य, असें कीं, सारूप्य (सरूपता) नामक मुक्ति पावलेले जीव सुद्धा या ईश्वराच्या अधीन असतात! एवंच, हा सर्वस्वामी आहे. हा सदैव स्थिर असतो. म्हणजे कूटस्थ आहे. हा कोणत्याही प्रकारची हालचाल करीत नाहीं, तरी याचा वेग (याची चालण्याची गति) मनापेक्षांही शीघ्रतर, जास्त जोराचा आहे.

शिष्य—परमेश्वर स्थिर आहे आणि अत्यंत वेगववान् आहे हें म्हणणें विरोधाचें दिसतें. मुळींच न चालणारा अति वेगानें कसा चालेल?

सिद्धान्ती—या विरोधाचा परिहार असा आहे कीं हा परमेश्वर सर्वव्यापी आहे. म्हणून हालचाल करण्याचें याला कारणच नाहीं. तथापि जेथें जेथें मनाची धांव जाते, तेथें तेथें हा अगोदरच गोचर होतो. तेथें तो मनाला दिसतो म्हणजे मनाच्या आधींच तो तेथें जातो. म्हणून तो मनापेक्षां जास्त वेगवान् आहे; असें रूपक करून म्हटलें. तात्पर्य, तो सर्वव्यापी आहे हें सांगावयाचें आहे. आणखी; ब्रह्मदेव, शंकर, इत्यादि देवांस परमेश्वराची पूर्वींच प्राप्ति झाली;

परंतु हें जें सर्वप्राप्त व विश्वंभर ब्रह्म आहे, त्याची मात्र जाणीव या देवांसही हा काल पर्यंत झाली नाहीं.

शिष्य—पूर्वींच सर्वप्राप्त असतें आणि अजूनपर्यंतही प्राप्त झालें, अशी जाणीव नाहीं, हें काय प्रकरण आहे?

सिद्धान्ती—परमेश्वर सर्वव्यापी आहे म्हणून तो सर्वांचा अत्यंत निकटवर्ती आहे. म्हणजे तो सर्वांसच जन्मतःच प्राप्त झालेला आहे. तथापि कर्मांच्या योगानें ज्याचें ज्ञान दूषित झालें आहे, अशा क्षेत्रज्ञांना (सर्व देहधारी जीवांना) गुरूच्या उपदेशाशिवाय परमेश्वराची प्राप्ति स्वतःच्या बुद्धीनें होत नाहीं. एका उपनिषदांमध्यें (छान्दोग्य नामक ८।३।२) म्हटलें आहे कीं 'भूमीमध्यें ठेवलेला सोन्याचा ठेवा जसा माहित नसणाऱ्या लोकांस त्या ठेव्यावरून संचार करीत असतांही सांपडत नाहीं, याप्रमाणेंच अज्ञानानें बद्ध झालेल्या सर्व प्रजांची (सर्व जीवांची) ब्रह्मासंबंधें स्थिति असते. ह्या प्रजा ब्रह्मलोकामध्यें संचार करितात खऱ्या; पण अज्ञानामुळें त्यांस ब्रह्मलोकाचें ज्ञान नसतें.' तसेंच पृथ्वीवर स्थिर राहून तो सर्व धावणाऱ्या देवांच्याही पुढें जातो (बृहदारण्यक ३।७।३) 'जो आत्मस्वरूपीं राहून' 'जो सर्व भूतांच्या ठायीं राहून' इत्यादि श्रुति सांगतात कीं हा परमेश्वर एका जागीं स्थिर राहून धांवणाऱ्या सर्व देवांच्या पुढें जातो. आतां, 'उभा राहिलेला पुरुष धांवणाराच्या पुढें कसा जातो?' अशी शंका घेणें बरोबर नाहीं. कारण वेगवान् (तरस्वी) पुरुष जितके जितके आणि जेथपर्यंत धांवतात तितके तितके व तोंपर्यंत आणि त्याच्या पलीकडेही, हा परमेश्वर स्वरूपानें विद्यमान असतो. या अर्थाला वरील श्रुति प्रमाण आहेत. त्या विश्वंभर परमेश्वरामध्येंच मातरिश्वा म्हणजे वायु राहतो आणि अप् (जल) म्हणजे मेघ, ग्रह, नक्षत्रें, तारका, आदिकरून सर्वांचें धारण करितो. सर्वांचा आधारभूत जो परमेश्वर त्याच्या आश्रयानें व त्याच्या सत्तेनें वायु—देव सर्वांचे धारण करितो, असा अभिप्राय आहे. 'या सर्व लोकांच्या मर्यादा व्यवस्थित ठेवणारा हा (परमेश्वर) सेतु आहे; हाच वर्णाश्रमादि व्यवस्था ठेवणारा आहे, या विश्वांची जी स्थिति आहे, तिचें कारण व विश्वें भग्न होण्याचें कारणही हाच आहे.' (बृ० ४।४।२२) श्रुति प्रमाण आहे.

"हें आकाश, सूर्य—चंद्रांसह सर्व नक्षत्रें, अंतरिक्ष, दिशा, पृथ्वी, महासागर, हीं सर्व महात्मा जो वासुदेव याच्या सत्तेनें व सामर्थ्यानें आपापल्या नेमलेल्या ठिकाणीं राहून आपापलीं नियमित कर्में मर्यादेनें करितात." इत्यादि प्रसिद्ध वचनांवरून आम्ही म्हणतों, हेंच खरें आहे, असें ठरतें. तात्पर्य, ब्रह्म हें सर्वाधार आहे, सर्वाश्रय आहे, सर्वगामी व सर्वगोचर आहे. याचें सामर्थ्य व याची

स्वतंत्र सत्ता, हें सर्व विलक्षण आहे. अशा परमेश्वराची उपासना केली तरच आपला तरणोपाय आहे. ॥ ४ ॥

## मंत्र पांचवा.

**एवमुपदिष्टविचित्रशक्तित्वमादरेण मुखान्तरेण पुनरनुशास्ति—**

याप्रमाणें वरील मंत्रांत परमेश्वराच्या विचित्र शक्तीचें जें वर्णन केलें आहे त्या अलौकिक शक्तीचा अनुवाद आणखी एका निराळ्या तऱ्हेनें हा मंत्र करितो.

**भूयोभूयः प्रवचनं श्रवणं च कर्तव्यमिति पुनरनुशासनाभिप्रायः। तथा च श्रूयते—**

शिष्य—गुरुजी ! एकच सिद्धान्त अनेक वेळां सांगण्याचें किंवा ऐकण्याचें काय प्रयोजन आहे ? हें पिष्ट-पेषण उगीच कशाला ?

सिद्धान्ती—वरचेवर प्रवचन आणि श्रवण केलें म्हणजे फल फार मोठें मिळत असतें. ज्ञान दृढ होऊन बुद्धि निश्चित होते. व ज्ञानशक्ति व कर्मशक्ति वाढून मोक्षाचें साधन सुलभ होतें. हें केवढें फल आहे बरें ! आणखी श्रुतिवचन ऐक.

**येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्त्वतो ब्रह्मविद्याम् [ मुं० १।२।१३ ] इति। तत्त्वतः अज्ञानसंशयविपर्ययनिरासो यथा भवति तथा प्रोवाच प्रकर्षेण ब्रूयात्पुनः पुनरुपदिशेदित्यर्थः। तदेजति तत्सर्वव्याप्तं ब्रह्मैजति कम्पत इव जवीय इवेति यावत्। तदु तदेव नैजति वस्तुतो न कम्पते। तद्दूरे च तदेवान्तिके च वर्तते आसुरदैवप्रकृतिकपुरुषभेदापेक्षया विभोरेव दूरान्तिकवर्तित्वव्यपदेशः। तथाऽऽह भगवाञ्शौनकः—**

**पराङ्मुखा ये गोविन्दे विषयासक्तचेतसः।**
**तेषां तत्परमं ब्रह्म दूराद्दूरतरे स्थितम्॥**
**तन्मयत्वेन गोविन्दे ये नरा न्यस्तचेतसः।**
**विषयत्यागिनस्तेषां विज्ञेयं च तदन्तिके॥ इति।**

**अपरमप्येकं वैचित्र्यमित्याह तत्सर्वव्याप्तं परं ब्रह्मास्य सर्वस्य प्रमाणावगतस्य वस्तुनोऽप्यन्तर्भवति तदेव पुनस्तदानीमेव सर्वस्य बहिरपि भवतीत्यर्थः। तदितरेषां गृहान्तर्वर्तिनां तदानीं बहिष्ट्वं न संभवति बहिर्वसतां च नान्तर्वर्तित्वमिति ब्रह्मणि वैचित्र्यमिति भावः। यद्यप्यणुषु नान्तर्वर्तिता संभवति तथा प्रतिघातादविभक्तदेशतया वर्तित्वमात्रेणान्तर्वर्तित्वोक्तिः। एवं बहि-**

व्याप्तिरप्यविभुद्रव्यापेक्षयैव । न तु विभुद्रव्यापेक्षयाऽपीति द्रष्टव्यम् । तदिदं वैचित्र्यं तैत्तिरीयेऽप्युक्तम्—अन्तर्बहिश्च तत्सर्वं व्याप्य नारायणः स्थित इति ॥ ५ ॥

" ज्याच्या योगानें अक्षर आणि सत्यरूपी परमेश्वर समजतो त्या ब्रह्मविद्येचें तात्त्विक प्रवचन अनेक वेळ करावें. ( मुण्डक १।२।१३ ) ही श्रुति आम्ही म्हणतों याला प्रमाण आहे. अज्ञान, संशय आणि विपर्यय ( अन्यथा निश्चय ) यांचें निरसन होई तोंपर्यंत ब्रह्मविद्येचें प्रवचन पुनः पुनः करावें, असा या श्रुतीचा अभिप्राय आहे. असो; आतां मूळ मंत्राचा अर्थ सांगतों:— हें सर्वव्यापी ब्रह्म वस्तुतः चलन-वलनादि क्रिया करीत नसूनही अतिशय वेगवान् पदार्थाप्रमाणें धांवत असल्यासारखें दिसतें. तसेंच तें सर्वव्यापी आहे, म्हणून तें अत्यंत निकट आहे, प्रत्येकाच्या अत्यंत समीप आहे, आणि प्रत्येकापासून अतिशय लांबही आहे ! दैवी प्रकृतीच्या पुरुषांस हें ब्रह्म अतिशय जवळ सांपडतें. व आसुरी प्रकृतीच्या पुरुषाजवळ असूनही तें ब्रह्म आपल्यापासून अतिशय लांब आहे असें त्यास वाटतें. तात्पर्य, असें आहे कीं, ब्रह्म हें प्रत्येक वस्तूच्या अंतर्यामीं असतें; पण प्रत्येक जीवाच्या ज्ञानाधिकाराप्रमाणें तें जवळ किंवा लांब भासत असतें. सारांश, ब्रह्म स्थिरच आहे; पण ब्रह्मज्ञात्याच्या दृष्टीनें तें जवळ आहे व आसुरी दृष्टीनें तें लांब आहे, असें म्हटलें. ब्रह्म लांब जवळ नाहीं. भिन्न दृष्टीच्या पुरुषांस तें लांबजवळ वाटतें इतकाच प्रकार आहे, व ह्या भिन्न दृष्टीच्या लोकांस अनुलक्षूनच ब्रह्माला दूर-निकट हे शब्द उपयोजिले आहेत. भगवान् शौनक म्हणतात:—" गोविंदाचे ठिकाणीं जे विषय-लोलुप लोक पराङ्मुख होतात, जे गोविंदाला विन्मुख होतात आणि विषयांना जवळ करितात, त्या लोकांपासून हें परब्रह्म दूर, अतिदूर, दूराहून दूर असतें; पण गोविंदाची एकनिष्ठ भक्ति करून ज्यांनीं आपलें अंतःकरण गोविंदमय केलें आहे आणि विषयांचा त्याग केला आहे, त्या भक्तांच्याजवळ अतिशय जवळ हें परब्रह्म असतें."

आणखी एक भगवत्-सामर्थ्याचें वैलक्षण्य सांगतातः तें सर्वव्यापी परब्रह्म सर्व प्रमाणशुद्ध वस्तूंच्या अंतर्यामीं असून पुनः त्याचवेळीं तें सर्वांच्या बाहेर ओतप्रोत भरलेलें असतें. ब्रह्माहून निराळे जे जीव असतात त्यांस एकदम म्हणजे एका वेळींच घराच्या आंत व घराच्या बाहेर असणें, संभवत नाहीं. बाहेर असतात ते त्याच वेळीं घरांत नसतात, व घरांत असलेले बाहेर नसतात. असा आपला तर नित्याचा अनुभव आहे. पण ध्यानांत ठेव कीं, ही सामान्य वस्तूंची गोष्ट झाली, ब्रह्माची स्थिति वेगळीच आहे. तें ब्रह्म एककालीं आंत बाहेर राहून सर्वांचें नियमन करितें म्हणून ब्रह्माची स्थिति विलक्षण आहे.

शिष्य—भगवन्! अणूंमध्यें पोकळी असणें तर संभवतच नाहीं किंवा विभु, [सर्वव्यापि] म्हणून जीं द्रव्यें (आकाश, काल, दिक्, ) मानलेलीं आहेत त्यांच्या बाहेरही कांहीं असणें संभवत नाहीं. पण आपण तर 'सर्व वस्तूंच्या आंत व सर्व वस्तूंच्या बाहेर ब्रह्म आहे' असें म्हणतां. हें कसें?

सिद्धान्ती—अणु फोडला तरी फुटत नाहीं, तो तसाच स्वरूपानें असतो हें जें त्याचें असणें हेंच परमेश्वराचें अंतर्वर्तित्व (आंत राहणें) होय. याच-प्रमाणें विभु द्रव्यांचीही गोष्ट आहे, म्हणजे विभु द्रव्यच ब्रह्म असतें व त्याला व्यापून आपण राहतें, म्हणजे असें:—विभु (सर्वव्यापी) म्हणून ज्या वस्तु आहेत, तदितर सर्व वस्तूंचा बाह्य प्रदेश सर्वतः ब्रह्मानें व्याप्त असतो, आणि विभु—द्रव्याचें नियामक स्वतः ब्रह्मच असतें. हें वैचित्र्य तैत्तिरीय उपनिषदांतही सांगितलें आहे. 'या सर्व चराचर विश्वाला अंतर्बाह्य व्यापून हा नारायण राहिला आहे.' ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**एवं सर्वस्य ब्रह्मात्मकत्वमुक्तम् । अथ सर्वं जगद्ब्रह्मात्मकमि-त्यनुसंदधानस्यैहिकं प्रयोजनमाह—**

याप्रमाणें सर्व पदार्थ ब्रह्मात्मक आहेत हें सांगितलें. आतां, सर्व जगत् ब्रह्मात्मकच आहे असें अनुसंधान ज्याचें लागलें, त्याचे कोणते ऐहिक पुरुषार्थ सिद्ध होतात हें या सहाव्या मंत्रांत सांगतात:—

**यः परमात्मज्ञानाधिकृतः सर्वाणि भूतानि ब्रह्मादिस्तम्बपर्यन्ता-न्यात्मन्येव परमात्मन्येवानुस्यूतानि पश्यति ध्यायतीत्यर्थः । पृथि-व्यादिध्रियमाणमपि तन्मुखेन परमात्मन्येव स्थितमित्येवकारा-भिप्रायः । तुशब्देनास्याधिकारिणो माहात्म्यविशेषो द्योत्यते । किंच सर्वभूतेषु चाऽऽत्मानं परमात्मानं यः पश्यतीति । इदं व्याप्तिमात्र-परम् । परमपुरुषस्यानन्याधारत्वादिति भावः । यच्छब्दस्य स इति प्रतिनिर्देशोऽध्याहार्यः । स उक्तविधज्ञानी । ततस्तेषु सप्तम्यर्थे तसिः । ब्रह्मात्मकतया दृष्टेषु सर्वेषु भूतेष्वित्यर्थः । न विजुगुप्सते कुतश्चिदपि न बीभत्सते । स्वात्मविभूतिन्यायेन क्वचिदपि निन्दां न करोतीति भावः ॥ ६ ॥**

जो पुरुष परमात्मज्ञानाच्या योगानें अधिकृत होतो, ब्रह्मापासून ते स्तंबापर्यं-तचीं यच्चयावत् सर्व भूतें (पदार्थ) परमात्म्यामध्येंच अनुस्यूत झालीं आहेत. (म्हणजे परमात्म्याच्या आश्रयानें व परमात्म्यानें व्याप्त अशीं राहतात, हें ज्याला ज्ञान झालें म्हणजे पृथ्वी जरी सर्व भूतांस आधार देते, सर्व भूतांचें धारण करिते, तथापि तिच्या द्वारानेंच सर्व भूतें परमात्म्याच्या मात्र आश्रयानें

परमात्म्यामध्यें व्यवस्थित रीतीनें राहतात. असा अभिप्राय आहे.) तसेंच, सर्व भूतांमध्यें ज्याला परमात्मा दिसतो; कारण याची व्याप्ति सर्वत्र आहे आणि या दृष्टीनें मात्र सर्व भूतांमध्यें ज्याला परमेश्वर दिसतो;-तो ज्ञानी पुरुष त्या सर्वाधार-ब्रह्मदृष्टीनें पूज्य स्वरूप झालेल्या सर्व पदार्थांची कोणत्याही प्रकारें निंदा करीत नाहीं.

शिष्य०—पण भगवन्! या परमपुरुषाला कोणाचा आधार असतो? हा कोणाच्या आश्रयानें राहतो?

सिद्धान्ती—वेड्या! परमपुरुषाला रे कोण आधार देणार? तो स्वयंसिद्ध व स्वाधार आहे, त्याला दुसऱ्याचा आश्रय हवा आहे, तरी कशाला? असो; हा सर्वाधार आहे व सर्वव्यापी आहे, म्हणून सर्व पदार्थ पूज्यस्वरूपाचे होतात. असें मानणारा पुरुष खरा ब्रह्मज्ञ होय. असो; सर्व वस्तु ब्रह्मव्याप्त आहेत, पण त्या स्वतः ब्रह्म नाहींत, हें त्याचें ज्ञान असतें. समजलें?

या मंत्रांत पहिल्याप्रथमच 'तु' हा शब्द आहे, तो ज्ञानीपुरुषाचें माहात्म्य सांगण्याकरितां उपयोजिला आहे. सारांश, सर्व भूतांमध्यें अंतर्यामी ब्रह्म आणि ब्रह्मामध्यें शरीररूपानें सर्व भूतें ज्याला दिसूं लागलीं, त्याला कोठेंही कोणत्याही प्रकारची निंदा करण्याचें किंवा खोडी काढण्याचें कारण राहत नाहीं. त्याला सर्व विश्व आत्मविभूतिरूपानें आनंदरूप होतें. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**एवं वैयधिकरण्येनोक्तं सर्वस्य ब्रह्मात्मकत्वं सामानाधिकरण्येनापि द्रढयंस्तदनुध्यानस्य सद्यः शोकनिवर्तकत्वमाह—**

याप्रमाणें वैयधिकरण्यानें (म्हणजे परमात्म स्वरूप व तदितर भूतें यांमध्यें कोणता भेद आहे, हें सांगणें हें वैयधिकरण्य होय.) सर्व ब्रह्मात्मक आहे असें सांगून या मंत्रांत आतां *सामानाधिकरण्यानेंहि 'सर्व भूतांची ब्रह्मात्मकता दृढ करूं' हें अनुसंधान ठेवणाऱ्या ज्ञानी पुरुषाचे शोक मोह कसे नाहींसे होतात हें सांगावयाचें आहे.

**यस्मिन्प्रणिधानसमये विजानत ईशा वास्यमित्यारभ्य ततो न विजुगुप्सत इत्यन्तेनोपदिष्टं स्वतन्त्रं परतन्त्रं वस्तुभेदं यथोपदेशं विविच्य जानत इत्यर्थः। नन्वेवमत्यन्तभेदाभ्युपगमे सर्वाणि भूतान्यात्मैवाभूदिति सामानाधिकरण्यं भज्येतेत्याशङ्कावारणाय यस्य**

---

* (सर्व भूतांस ब्रह्मात्मकता असते, हें सांगणें म्हणजे सामानाधिकरण्य होय.) एका वाक्यांत भिन्नार्थी शब्द एकाच पदाथाचा बोध करित असतात, तेव्हां सामानाधिकरण्य होतें.

पृथिवी शरीरम् । [ बृ० ३ । २ । १३ ] यस्य शरीरम् [ बृ०३।७।३ ] इत्यादिघटकश्रुतिसिद्धसंबन्धविशेषमाह—एकत्वमनुपश्यत इति । आकृतिव्यक्त्योरिव गुणगुणिनोरिव चात्यन्तभिन्नयोरेव जगद्-ब्रह्मणोरेकत्वं विभागानर्हसंबन्धविशेषं पश्यतो विशदमनुध्यायत इत्यर्थः ।

रामसुग्रीवयोरैक्यं देव्यर्थं समजायत । इत्यादाविवेहाप्येकशब्द-स्य संबन्धविशेष एवार्थो विवक्षितुं युक्त इति भावः । एवं च सर्वाणि भूतान्यात्मैवाभूदिति सर्वभूतशरीरकः प्रतीतोऽभूदि-त्यर्थः । तत्राऽऽदौ प्रणिधानसमये को मोहः । स्वतन्त्रादिभ्रमादि-लक्षणो मोहो न संभवति । कः शोकः परमात्मविभूततयाऽवगते सर्वस्मिन्निर्ममत्वसिद्धौ पुत्रादिमरणराज्यादिहरणादावपि न कश्चि-च्छोकः स्यादित्यर्थः । यथाऽऽह—

यस्य मे चास्ति सर्वत्र यस्य मे नास्ति किंचन ।
मिथिलायां प्रदीप्तायां न मे किंचन दह्यते ॥ इति ।

अत्र केचित्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूदिति बाधायां सामानाधि-करण्यम् । तथा च सर्वाणि भूतान्यात्मव्यतिरिक्तानि न सन्तीत्यर्थः । यथा चोरः स्थाणुरिति । स्थाणुरेवायं न चोर इत्यर्थः । तथेहापी-त्याहुः । अन्ये तु नरपतिरेव सर्वे लोका इतिवदौपचारिकमिदं सामानाधिकरण्यम् । नरपत्यधीनाः सर्वे जना इति हि तन्निर्वा-हस्तद्वदिहापि परमात्माधीनानि सर्वाणि भूतानीति भाव इति वर्णयन्ति । अपरे तु घटशरावादयः सर्वे मृत्पिण्डा एवेतिवज्जगद्ब्र-णोरेकद्रव्यत्वं परिकल्प्यैवेदं सामानाधिकरण्यं निर्वाह्यमित्याचक्षते । सिद्धान्तस्तु देवोऽहं मनुष्योऽहमित्यादिवच्छरीरात्मभावसंबन्धे-नैव जगद्ब्रह्मणोः सामानाधिकरण्यनिर्वाहे संभवति सति बाधोप-चारस्वरूपैक्यपक्षा वैदिकैर्बहिष्कार्याः ॥ ७ ॥

ध्यान करित असतां ज्या ज्ञानी पुरुषाला या उपनिषदांत पहिल्या मंत्रापासून सहाव्या मंत्रापर्यंतच्या सहा मंत्रांत सांगितलेलें स्वतंत्र ब्रह्म, परतंत्र जीव आणि जगत् व वस्तुभेद यांचें रहस्य उपदेशानुसार समजलें—

पूर्वपक्षी—अहो! या उपनिषदांच्या द्वारा अत्यंत भेद सांगणें हा श्रुतीचा अभिप्राय नाहीं; कारण "सर्व भूतें आत्मरूप झालीं." असें या मंत्रांतील सामानाधिकरण्य ठरवितें. पण तुमच्या अर्थानें हें सामाधिकरण्य बाधित होतें म्हणून तुमचा अर्थ चुकला असें मला वाटतें. अत्यंत भेद श्रुतीला मुळींच इष्ट नाहीं. सारांश, सर्व भूतें

आणि आत्मा यांचें सामानाधिकरण्य करून श्रुतीला अभेद मात्र सांगावयाचा आहे, असें स्पष्ट दिसतें.

सिद्धान्ती—नाहीं. 'ज्याचें शरीर पृथ्वी आहे' (बृ०३।२।१३) 'ज्याचें शरीर' (बृ० ३।७।३) इत्यादि घटना करणाऱ्या श्रुतींच्या साहाय्यानें सिद्ध झालेला व वस्तुतः असणारा विशेष संबंध येथील शब्दच सांगतातः—आकृति (जाति) आणि व्यक्ति, गुण आणि गुणी, यांच्यामध्यें जसा वास्तविक भेद असूनही यांची एकत्र स्थिति असते, जाति-व्यक्ति एकत्र असतात व गुण आणि गुणीपदार्थ एक ठिकाणींच वास्तव्य करितात, त्याचप्रमाणें जगत् व ब्रह्म वस्तुतः निरनिराळे पदार्थ असून एकच, ( एकत्र राहणारे ) आहेत. त्यांच्यामध्यें विभाग होणें शक्य नाहीं ( स्थलांतर होणें शक्य नाहीं ) असें ज्या ज्ञानी पुरुषांना स्पष्ट ज्ञान होतें आणि असेंच त्यांचें स्पष्ट ध्यान-चिंतन असतें, त्या लोकांस शोक-मोह, बाधा करीत नाहींत. या अनुध्यानामध्यें जगत् व ब्रह्म हीं नित्य व सर्वत्र एकत्र असतात, अशी ज्ञानी पुरुषाची जाणीव असते.

सीता देवीची पुनः प्राप्ति करून घेण्यासाठीं राम आणि सुग्रीव यांचें ऐक्य झालें, त्याप्रमाणेंच येथेंही एक शब्दाचा संबंध-विशेषीं मात्र अर्थ सांगण्याचा श्रुतीचा अभिप्राय असला पाहिजे. राम-सुग्रीवांचें ऐक्य झालें, म्हणजे ते शरीरानें सुद्धां एक झाले असा अर्थ नव्हे. त्याप्रमाणेंच विश्वामध्यें 'एक ब्रह्म' पहाणारा म्हणजे सर्व ठिकाणीं व सर्व काळीं या पंडिताला एकच वस्तु एकच स्वरूपानें दिसते, असा अर्थ नव्हे, असो; 'याप्रमाणें आत्मा सर्वभूतात्मक झाला,' याचा अर्थ असा आहे कीं, सर्व भूतांचीं शरीरें त्याच्याच प्रकृतीपासून परिणत झालीं आहेत. व सर्व भूतें परमात्म्याचें शरीर होतात. हा अर्थ ज्ञानी पुरुषाला समजला म्हणजे ध्यानाच्या वेळीं त्याला 'मी स्वतंत्र आहें;' किंवा हें सर्व विश्व भ्रमात्मक आहे,' असा मोह होत नाहीं. तसेंच, 'मी परमेश्वराची एक विभूति आहें व सर्व भूतें परमेश्वरात्मक आहेत.' असें समजून सर्वत्र निर्ममत्वाची वृत्ति सिद्ध झाली, 'माझें असें स्वतंत्रत्वानें कांहीं नाहीं' असें समजलें, म्हणजे पुत्रादिकांचें मरण किंवा राज्यादिकांचें हरण या असल्या महत्संकटामध्यें सुद्धां त्याला शोकप्राप्ति होत नाहीं. म्हटलें आहे—

'ज्या माझें सर्व कांहीं आहे व ज्या माझें कांहीं नाहीं. त्या मला ( जनकाला ) सर्व मिथिलेला आग लागली म्हणून कांहीं एक वाईट वाटणार नाहीं.'

पूर्वपक्षी—कायहो ? 'सर्व भूतें आत्मरूप झालीं आणि आत्मा सर्व भूतरूप झाला' या वाक्यांत बाध सामानाधिकरण्य घेतलें तर चालावयाचें नाहीं काय ? म्हणजे आत्मरूपाशिवाय एकही वस्तु येथें नाहीं आत्मरूपच आहे, बाकी कांहीं नाहीं. असा अर्थ होईल. हा चोर स्थाणु आहे ( हा चोर इतका स्तब्ध आहे कीं, तो खांबासारखा निश्चल दिसतो. म्हणजे प्रत्यक्ष तो खांबच आहे ) याचा अर्थ 'हा

स्थाणुच आहे चोर नव्हे' असा जसा होतो तसाच, हें सर्व आत्मरूपच आहे. निर-राळे पदार्थ नाहींत असा अर्थ करावा. भूतांचा बाध करून ( तीं नाहींतच असें समजून ) जें सामानाधिकरण्य करावयाचें, त्याला बाधसामानाधिकरण्य असें म्हणतात. हें असलें सामानाधिकरण्य येथें घ्यावें म्हणजे झालें.

दुसरा पूर्वपक्षी०—आमच्या मत राजा म्हणजेच सर्व प्रजाजन होत. ( राजा जें करील तें प्रजांचें कृत्य असतें म्हणून राजा हीच प्रजा ) हें जसें आलंकारिक वाक्य आहे तसेंच वरील वादविषयक सामानाधिकरण्याचें वाक्य आहे. 'राजाच्या स्वाधीन असणारी सर्व प्रजा' असा जसा आम्ही घेतलेल्या उदाहरणाचा अर्थ करून निर्वाह करितां येतो, त्याप्रमाणेंच हीं सर्व भूतें परमात्म्याच्या अधीन आहेत असा अर्थ करून निर्वाह करावा.

तिसरा पूर्वपक्षी०—येथें या सामानाधिकरण्याचा असा अर्थ करावा कीं, घट, शराव इत्यादि मातीची भांडीं जशीं मातीचींच केलेलीं असतात आणि सर्वांचें घटक द्रव्य एकच म्हणजे माती हें असतें त्याप्रमाणें जगत् आणि ब्रह्म हीं एकाच द्रव्यापासून झालीं आहेत, या अर्थानें वादविषयक वाक्यांत सामानाधिकरण्य झालें आहे. असा निर्वाह करून घ्यावा.

सिद्धान्ती—" मी देव आहें, मी मनुष्य आहें " इत्यादि वाक्यांत जसा देवादि शरीरांचा व तन्निष्ठ जीवांचा संबंध असतो, त्याप्रमाणेंच जगत् आणि ब्रह्म यांचा शरीर-शरीरी संबंध आहे ( जगत् व भूतें शरीर आणि परमात्मा शरीरी आहे ) असा स्पष्ट, योग्य आणि न्यायशुद्ध अर्थ होत असतां व याप्रमाणें वरील सामानाधिकरण्याचा निर्वाह होत असतां कांहीं एक आधार नसलेलें बाधप्रतिपादक, उपचारप्रतिपादक [ आलंकारिक ] आणि ऐक्य-स्वरूपप्रतिपादक पक्ष यांचा व यांच्या म्हणण्याचा वेदनिष्ठ लोकांनीं विचारच न केला पाहिजे. हीं मतें अवैदिक आहेत. डोळ्यांस प्रत्यक्ष दिसणारी वस्तु 'नाहीं' म्हणणें हें लोकबाह्य वेदबाह्य कर्म आहे ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**पुनरप्येनमीशेशितव्यवेदिनं वेदितव्येश्वरस्य हेयशोधनेन विशिष्टज्ञानयोगादिकमप्युपदिशति—**

सिद्धान्ती—'ईश्वर माझा स्वामी आहे' आणि 'मी त्याचा सेवक आहें.' अशी ज्याची दृढ भावना ज्ञानपूर्वक झाली त्याला विशिष्ट ज्ञान योगादिकांचा उपदेश करण्यासाठीं जाणून घेण्यास योग्य जो परमेश्वर त्याच्या स्वरूपामध्यें आपल्यास न दिसणाऱ्या कोणत्या व्यावहारिक गोष्टींचा त्याग करून स्वरूपशुद्धता करावयास हवी, हें या श्रुतीनें प्रथम सांगून नंतर ज्ञान-योगादिकांचा उपदेश केला आहे.

यः सर्वभूतान्तरात्मब्रह्मदर्शी स पर्यगात्प्राप्नुयादित्यर्थः। 'ब्रह्मविदाप्नोति परम्'। [ तै० २।१।१ ] इति न्यायात्। यद्वा समाधिलब्धेनानुभवेन प्राप्नुयादिति सिद्धानुवादः। 'अत्र ब्रह्म समश्नुते' [ बृ० ४।४।७ ] इतिवत्। शुक्रमवदातं स्वप्रकाशमित्यर्थः अकायम्। सर्वशरीरकमपि कर्मकृतहेयशरीररहितमित्यर्थः।

'न तस्य प्राकृता मूर्तिर्मांसमेदोऽस्थिसंभवा।'

इति हेयशरीरस्यैवान्यत्र प्रतिषेधदर्शनात्। न तु दिव्यमङ्गलविग्रहरहितमित्यर्थः।

'यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि।' [ ई० वा० १६ ]

'य एषोऽन्तराऽऽदित्ये हिरण्मयः पुरुषो दृश्यते॥' [ मै० ६।१]

आदित्यवर्णं तमसः परस्तात् [ श्वे० ३।८ ] इत्याद्युपनिषत्प्रसिद्धस्याप्राकृतविग्रहस्य निषेधायोगादिति भावः। अव्रणम्। कर्मजन्य-शरीराभावादेवाक्षतम्। अस्नाविरं च। स्नावाः शिरा यस्मिन्विद्यन्ते तत्स्नाविरम् स्नाविरं न भवतीत्यस्नाविरं। शुद्धं। अनाघ्राताज्ञानादिदोषगंधं। अशनपानादिषडूर्मिरहितं च। अपापविद्धम् अज्ञानादेः कार्यकारणभूतैः पुण्यपापरूपकर्मभिरलीढमित्यर्थः। 'न शोको न सुकृतं न दुष्कृतम्'। [ छा० ८।४।१ ] इत्यारभ्य 'सर्वे पाप्मानोऽतो निवर्तन्ते' इति पापशब्देनोपसंहारदर्शनात्। स्वर्गादिहेतुभूतविशेषस्यापीह पापशब्देन संग्रहणमिति भावः। एवमहेयहेयप्रत्यनीकं परमात्मानं स विद्वान्पर्यगादिति पूर्वेण संबन्धः। एवंरूपः परमात्मा प्राप्यः प्रापक उपास्यश्च यस्य, तं ब्रह्मविदं विशिनष्टि कविः। व्यासादिवद्ब्रह्मस्वरूपरूपदिव्यगुणादिप्रकाशकप्रबन्धविशेषाणां निर्मातेत्यर्थः। अथवा क्रान्तदर्शी। कर्मयोगस्तु कुर्वन्नेवेह कर्माणीति मन्त्रेण पुरस्तादेवोक्तः। अथ ज्ञानयोगसाध्यप्रत्यगात्मसाक्षात्कारहेतुभूतं जीवात्मयोगमाह-मनीषी मनस ईशित्री बुद्धिर्मनीषा, तद्वान् मनीषी भगवत्स्वरूपगुणस्मृत्यभ्यासेन तदितरविषयवैराग्येण च प्रतिष्ठितप्रज्ञ इत्यर्थः। परिभूः कामक्रोधादीन्परिभवतीति परिभूः। अनेन विरोधिनिवृत्तिरूपयोगाङ्गसेवनमुक्तम्। योगाभ्यासफलमाह—स्वयंभूः। अन्यनिरपेक्षसत्ताकः सुखरूपतया स्वात्मदर्शीति यावत्। याथातथ्यतः। यथावद्विविच्य। अर्थान्प्रग्रह्यार्थान्। तस्य वाचकः प्रणवस्तज्जपस्तदर्थभावनमिति सूत्रोक्तान्व्यदधाद्धृदयेन धृतवानित्यर्थः। सर्वान्तरायप्रशमनार्थमिति

भावः। यद्वा शुक्रमित्यादि द्वितीयान्तपदजातं परिशुद्धजीवपरम्। तमपि स परमात्मा पर्यगात्परितो व्याप्य स्थित इति प्रथमान्तपदजातं परमात्मपरं योजनीयम्। तथाहि कविः सर्वदर्शी श्रीपञ्चरात्रादिप्रणेतेति वा। मनीषी मनःप्रभृतीनां जीवकरणानां नियन्ता। परितो भवतीति परिभूः सर्वव्यापी स्वयमेव संभवतीति स्वयंभूः। बहुधा विजायत इति श्रुत्युक्तप्रसिद्धावतारशाली। अत्र कविरित्यादिना कल्याणगुणविधानात्। छान्दोग्ये— 'एष आत्माऽपहतपाप्मा विरजो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः। [छा० ८।१।५] इति हेयगुणान्प्रतिषिध्य सत्यकामः सत्यसंकल्प इति कल्याणगुणविधनाच्च निर्गुणं निरञ्जनमित्यादिसामान्यनिषेधस्य हेयगुणविषयत्वं सुगमम्। याथातथ्यत इति। अर्थान्कार्यपदार्थाञ्शाश्वतीभ्यः समाभ्यो यावद्विलयमवस्थातुं याथातथ्यतो यथावद्विविच्योत्पादितवान्न पुनरैन्द्रजालिकत्वेन बलं प्रकाशितवानिति भावः॥ ८॥

सिद्धान्ती—ज्याला सर्व भूतांच्या अंतरात्म्यामध्यें ब्रह्म दिसूं लागलें त्याला ब्रह्म प्राप्त होतें. असा तात्पर्यार्थ आहे. "जो ब्रह्मवेत्ता आहे तो ब्रह्म होतो" (तै० २।१।१) असा न्याय श्रुतीनें सांगितला आहे. किंवा समाधींत मिळालेल्या अनुभवामध्यें ब्रह्मस्थिति प्राप्त होते असा सिद्ध पुरुषांचा स्वानुभवी अभिप्राय आहे. "येथेंच ब्रह्मप्राप्ति होते" (बृ० ४।४।७) अशी श्रुति या स्वानुभवसिद्ध अभिप्रायाला प्रमाण आहे.

शिष्य—या ब्रह्माचें स्वरूप तरी कसलें असतें?

सिद्धान्ती—तें ब्रह्म, शुद्ध, स्वयंप्रकाश कर्मानें उत्पन्न झालेल्या अमंगल शरीरानें वियुक्त म्हणजे मंगल शरीरी—

पूर्वपक्षी—अहो, त्याला मुळीं कोणत्याही प्रकारचें शरीर नसतें.

सिद्धान्ती—असा अर्थ नाहीं. "मांस, मेद, अस्थि, इत्यादिकांनीं घडविलेलें प्राकृत शरीर (हाडा-मांसाचें शरीर) त्याला नसतें."

पूर्वपक्षी—हें कशावरून?

सिद्धान्ती—प्राकृत शरीराचा मात्र निषेध, व मंगल शरीराची सिद्धि येथें व दुसरीकडे श्रुतींमध्यें आढळते, म्हणून परमेश्वराला मंगल शरीरही नाहीं, असें नाहीं. तो मंगलमूर्ति आहे.

पूर्वपक्षी—याला आधार?

सिद्धान्ती—‘जें हें मी तुझें अत्यंत कल्याणमय रूप आहे. तें आतां पाहत आहें’ ( ईशावास्य १६ ) ‘जो हा सूर्याच्या अंतरात्म्यामध्यें सुवर्णमय पुरूष दिसतो’ ( मैत्रेयी ६।१ ) ‘अंधकाराच्याही पलीकडचा ( अंधकारासही प्रकाशित करून त्याचें स्वरूप दाखविणारा व आदित्य वर्णाचा’ ( श्वेताश्वतर ३।८ ) इत्यादि उपनिषदांमध्यें अप्राकृत ( दैवी ) शरीराचा कोठेंही निषेध केला नाहीं. किंतु स्वीकारच केला आहे. यावरून [ परमेश्वरास मंगल शरीर आहे असें सांगणाऱ्या श्रुती आहेत म्हणून ] अप्राकृत शरीराचा निषेध केव्हांही करितां येणार नाहीं. असो; त्याचें शरीर कर्मजन्य नाहीं म्हणून तें अक्षत, अस्नाविर ( शिरा आणि स्नायु जेथें नाहींत असें ) शुद्ध ( अन्नादिकांच्या दोषांचा गंधही ज्याला कधीं शिवला नाहीं ) तसेंच ( तृष्णा, क्षुधा, इत्यादि सहा वृत्तींच्या लाटा जेथें नाहींत असें ) पापशून्य—

शिष्य—भगवन् ! अज्ञान, माया, अविद्या, इत्यादि कारणांपासून उत्पन्न झालेल्या कामक्रोधादि त्रयींचीं जीं पापात्मक कर्में यांनीं ज्याला स्पर्श केला नाहीं असा पापशून्य परमेश्वर आहे, होय ना ?

सिद्धान्ती—ठीक आहे, पण वत्सा ! हें ध्यानांत ठेव कीं, सकाम सत्कर्मापासून उत्पन्न झालेलें पुण्य सुद्धां पापात्मकच असतें ! कारण तें जीवांना जन्ममरणापासून सोडवीत नाहीं; म्हणून मंत्रांतील ‘पाप’ या शब्दानें सर्व सकाम कर्मांचा व तज्जन्य फलांचा उल्लेख होतो. ‘शोक नाहीं, सुकृत (पुण्य) किंवा दुष्कृत ( पाप ) नाहीं’ ( छांदोग्य ८।४।१ ) असा आरंभ करून ‘या साठीं सर्व पापापासून निवृत्त होतो.’ असा पाप शब्दानें पुण्य आणि पाप या उभयतांचा श्रुतीनें अंतर्भाव करून उपसंहार केला आहे. सारांश, स्वर्गादिकांना कारण होणाऱ्या पुण्य कर्माचाही पाप शब्दानें संग्रह केला आहे. जन्ममरणाला कारण होणारें तें पापच होय. याप्रमाणें हेंच ( टाकून देण्यास योग्य ) व उपादेय ( घेण्यास योग्य ) या उभयतांचाही विरोध करणारें परमात्मस्वरूप विद्वान् पुरुषाला मिळतें.

शिष्य—म्हणजे स्वयंप्रकाश, मंगलदेहधारी अज्ञानरहित, आणि पापपुण्यरहित अशा परमात्म्याचें दर्शन त्या विद्वानाला होतें असाच अर्थ ना ?

सिद्धान्ती—होय, अशा रूपाचा परमात्मा मिळावा, हाच पुरुषार्थ आहे. त्या पुरुषार्थाची सिद्धि एक परमेश्वर मात्र करितो आणि म्हणून तोच उपास्य ( उपासना करण्यास योग्य ) आहे, हें ज्याला समजतें तो ब्रह्मवेत्ता होय. या ब्रह्मवेत्याचें विशेष स्वरूप व गुण सांगतात. ब्रह्मस्वरूप, त्याचे दिव्य गुण आणि त्याचें रूप इत्यादि प्रकाशित करणारे अनेक प्रासादिक प्रबंध ( ग्रंथ ) (१) निर्माण करणारे श्रीमद् व्यासादिकांप्रमाणें हा विद्वान् असतो; तसेंच याला असामान्य दृष्टि ( अलौकिक ज्ञान ) असते. (२) याचें ( पंडिताचें ) कर्म

याच उपनिषदांतील पहिल्या मंत्रांत सांगितलेल्या कर्म-योगास अनुसरून असतें, तसेंच, ( ३ ) याची बुद्धि मनावर स्वामित्व ठेवणारी असते; म्हणून याला मनीषी म्हणतात किंवा मन या शब्दाचा प्रतिष्ठितप्रज्ञ ( स्थितप्रज्ञ ) असाही अर्थ होईल.

शिष्य—स्थितप्रज्ञ म्हणजे काय ?

सिद्धान्ती—भगवंताचे स्वरूप आणि त्याचे गुण यांचे अहर्निश एकनिष्ठ चिंतन करणें, परमेश्वरव्यतिरिक्त सर्व विषयांचा विरक्तवृत्तीनें त्याग करणें आणि आपली बुद्धि स्थिर करणें ही स्थितप्रज्ञता आहे. या विशेष चिंतनानें जीव आणि आत्मा यांचा योग होतो. हा योग सिद्ध झाला म्हणजे ज्ञाननिष्ठेनें साध्य होणारा आत्मसाक्षात्कार होतो. आत्मसाक्षात्काराला हा जीवात्म-योग कारण आहे. तसेंच, हा पंडित (४) काम-क्रोधादिकांचा पराभव करितो. हा पराभव म्हणजे साक्षात्काराला विरोध करणाऱ्या वृत्तींचें निवर्तन होय. हेंही एक साक्षात्कार देणाऱ्या योगाचेंच अंग आहे. शम-दमादिकांचा अन्तर्भाव यांतच होतो. असो; वरील योगाभ्यासाचें फल पहा:,—हा विद्वान् ( ५ ) स्वतंत्र ( प्रकृतीच्या तंत्रानें न चालणारा ) आणि सुखरूप असून, नित्य स्वात्मदर्शन घेणारा असतो. ( ६ ) याचा नित्यानित्य विवेक उत्तम व यथार्थ असून, ( म्हणजे तत्त्वांचा व पुरुषार्थांचा विवेक उत्तम असून ) परमेश्वराचा वाचक जो 'ॐकार' शब्द त्याचा जप आणि त्याच्या अर्थाचें ज्ञान, हेच कायते पदार्थ हा विद्वान् चित्तामध्यें धारण करितो. सारांश, हा पंडित पूर्ण विवेकानें ॐकाराचा जप करून, त्याच्या अर्थाचें भक्तीनें चिंतन करित असतो. ह्या योगाचार्यप्रणीत चिंतनानें, त्याच्या मार्गांत येणाऱ्या सर्व अन्तरायांचा ( अडचणींचा ) निरास होतो. याप्रमाणें हा विद्वान् कवि मनीषी वृत्तिशून्य, स्वतंत्र, नित्यानित्यविवेकी आणि ब्रह्मचिंतन करणारा असतो.

शिष्य—महाराज, पहिल्या ओळींत जीं विशेषणें आहेत; तीं सर्व तऱ्हेनें शुद्ध झालेल्या जीवाला लागणार नाहींत काय ? मला वाटतें तीं द्वितीयांत विशेषणें जीव-पर घ्यावीं; आणि असा अर्थ करावा कीं, या शुद्ध जीवाला सर्वबाजूंनीं व्यापणारा परमेश्वर असतो. अर्थातच या सरणीनें दुसऱ्या ओळींतील सर्व पदें परमेश्वराकडे लावावीं, असें ठरेल.

सिद्धान्ती—होय. तसाही अर्थ होईल, मग कवि म्हणजे सर्वज्ञ किंवा पंच-रात्रादिकांचा* कर्ता असा अर्थ घेतला पाहिजे. मनीषी म्हणजे मनः-

---

* पंचरात्र हा एक भक्तिपंथाचा वैदिक ग्रंथ आहे, या पंथाला श्रीरामानुजप्रभृति विशिष्टाद्वैत प्रतिपादन करणाऱ्या आचार्यांनीं प्रौढ दशेस आणिलें आहे. हा वैदिक पंथ आहे, हें सांगावयास नकोच.

प्रभृति इंद्रियांचें नियमन करणारा, परिभू म्हणजे सर्वव्यापी, स्वयंभू म्हणजे स्वतःसिद्ध, (आपल्या स्वतःच्याच प्रवृत्तीनें जगाच्या कल्याणासाठीं अनेक अवतार स्वतंत्रतेनें घेणारा असाही स्वयंभूचा अर्थ होईल. हा अर्थ वेदासही अनुकूल आहे; परमेश्वराचा जन्म स्वेच्छेनें व स्वतंत्रतेनें होतो, जीवांस संचित कर्मानुसार जन्म घ्यावा लागतो.) असो; येथें सर्व मंगलगुणांचें विधान केलें आहे.

पूर्वपक्षी—अहो ! आत्मा हा निर्गुण आहे, निरंजन आहे. "हा आत्मा पापशून्य, मलशून्य, मृत्युशून्य, शोकशून्य, क्षुधाशून्य, तृषाशून्य, आहे." (छां० ९।१।५) अशी श्रुति आहे. यावरून सर्व गुणांचाही श्रुति प्रतिषेध करिते, हें लक्ष्यांत ठेवा. पुनः तो निर्गुण आहे, निरंजन आहे, असें सांगणाऱ्याही श्रुति आहेत. म्हणून श्रुतीला निर्गुण ब्रह्मच अभिप्रेत आहे, तुमचा अर्थ चुकला.

सिद्धान्ती—नाहीं. तसें असतें तर श्रुतीनें 'ब्रह्म सत्यकाम आहे,' 'सत्यसंकल्प आहे,' इत्यादि ब्रह्माच्या मंगलगुणांचें कीर्तन कशाला केलें असतें ? हें संकीर्तन केलें आहे, म्हणून निर्गुण, निरंजन, इत्यादि सामान्य निषेधानें त्याज्य गुणांचा निषेध केला आहे; हें स्पष्ट आहे. श्रुतीला निर्गुण ब्रह्माची स्थिति संमतच नाहीं. ब्रह्म सगुण आहे; पण त्याचे सर्व गुण मंगलकारी आहेत, अमंगल गुणांचा तेथें अभाव आहे, हें श्रुतीचें अभिप्रेत आहे. तसेंच, हें ब्रह्म उत्तम प्रकारचें जगत् उत्पन्न करितें म्हणजे आपापलें कार्य संपादण्यास योग्य असे अनंत पदार्थ निर्माण करितें आणि हेंच ब्रह्म प्रलयकालपर्यंत त्यांचें संरक्षणही करितें; हा श्रुत्यर्थ आहे.

पूर्व०—हें जगत् म्हणजे परमेश्वरानें आपल्या मायेचा आश्रय घेऊन उत्पन्न केलेली एक गंधर्वनगरी आहे. ही तर मिथ्या आहे !

सिद्धान्ती—परमेश्वर कांहीं गारुडी नाहीं किंवा त्याला आपलें बल किंवा चातुर्य प्रकट करून कोणाला चमत्कारही दाखवावयाचे नाहींत. हें जगत् सत्य आहे आणि जीव-कल्याणासाठीं परमेश्वरानें पूर्ण व यथार्थ विचार करून हें जगत् उत्पन्न केलें आहे. हा खरा तात्पर्यार्थ आहे. ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**एवं विचित्रशक्तिकपरमात्मविषयां कर्मयोगाद्यङ्गिकां विद्यामुपदिश्यानन्तरं त्रिभिर्मन्त्रैः केवलकर्मावलम्बिनः केवलविद्यावलम्बिनश्च पुरुषान्विनिन्दन्वर्णाश्रमधर्मानुगृहीतया विद्ययैव निःश्रेयसावाप्तिमाह—**

याप्रमाणें आठव्या मंत्रांत उत्तम प्रकारच्या विद्येचा उपदेश केला आहे. ही विद्या कर्मयोगादिकांचा अंगीकार करिते. तसेंच हा ज्ञानयोग परमेश्वराच्या

विचित्र शक्तींचें स्वरूप स्पष्ट करून सांगतो. यानंतर पुढील तीन मंत्रांत केवळ कर्मनिष्ठ लोकांची व केवळ ज्ञाननिष्ठ लोकांची निंदा करून वर्णाश्रम-धर्माच्या अनुग्रहानें प्राप्त होणारी विद्यामात्र मोक्षाला साधन आहे, असें सांगितलें आहे.

बृहदारण्यके चायं मन्त्रः पठितः । ये भोगैश्वर्यप्रसक्ता अविद्यां विद्यान्यां क्रियां केवलं कर्मेत्यर्थः । विद्याविधुरं कर्मेति यावत् । अविद्या कर्मसंज्ञान्येऽति स्मृतेः । उपासते । अनुतिष्ठन्ति । अन्धं तमोऽतिगाढं तमोऽज्ञानमित्यर्थः । त्रिवर्गाभिसङ्गान्नान्तरीयं नरक-मन्धं तमो वा । "प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म । एतच्छ्रेयो येऽभिनन्दन्ति मूढा जरामृत्युं ते पुनरेवाऽपि यन्ति" इति श्रुतेः । य उ विद्यायां रताः । उकार उत्तरपदेना-न्वेतव्यः । स्वाधिकारोचितकर्मपरित्यागेन विद्यायामेव रताः । ते ततः कर्ममात्रनिष्ठाः प्राप्यादन्धतमसाद् भूय इव तमस्तदधिकम-ज्ञानं प्रविशन्ति । इवशब्दस्तमस इयत्ताया दुर्ग्रहत्वं द्योतयति ॥९॥

सिद्धान्ती—हा मंत्र बृहदारण्यकाच्या चवथ्या अध्यायांतील चवथ्या ब्राह्मणांत सांगितला आहे. असो; जे भोग आणि ऐश्वर्य यांच्यामध्येंच आसक्त झाले आहेत, ते कर्माची मात्र उपासना करितात. या केवल कर्मालाच अविद्या असें नांव आहे, कारण; येथें ज्ञानाचा गंधही नसतो. ज्ञानशून्य कर्म यालाच केवल कर्म किंवा अविद्या असें म्हणावें. "अविद्येचेंच दुसरें नांव कर्म हें आहे, ही विद्येहून निराळी आहे;" अशी स्मृति आहे. याप्रमाणें केवल कर्माची मात्र उपासना करणारे कर्मठ, अत्यंत अज्ञानामध्यें प्रवेश करितात. येथें त्रिवर्गाची (तीन वेदांनीं सांगितलेल्या कर्माची) दृढ संगति आहे, म्हणून येथें अंतः-करणांतील नरक किंवा अज्ञान हा अर्थ घ्यावयाचा नाहीं. "ज्यांच्यामध्यें अठरा प्रकारचें (कनिष्ट प्रकारचें) कर्म सांगितलें आहे, अशा ह्या यज्ञरूपी नौका अदृढ आहेत, म्हणजे बळकट नाहींत; पण यज्ञकर्मानुष्ठान ज्या अज्ञानी लोकांस आनंद देतें; कर्म करणें हाच पुरुषार्थ आहे असें ज्यांस वाटतें, ते लोक पुनःपुनः जन्ममरणाच्या भोंवऱ्यामध्यें सांपडतात." अशी श्रुति आहे; म्हणून नरक अथवा अंधकार असा 'अंधन्तमः' याचा अर्थ करणें अन्याय्य आहे. सारांश; केवल कर्म करणारे जन्ममरणाच्या चक्रांत सांपडतात, हें येथें सांगावयाचें आहे. केवल कर्म जन्ममृत्यू देणारें आहे; तसेंच, जे लोक आपल्या अधिकारास उचित अशा विहित कर्माचा त्याग करून, केवल ज्ञानामध्यें मात्र आपल्या जन्माचा अपव्यय करितात; ते पंडितम्मन्य वेदान्ती केवल कर्मनिष्ठांस मिळणाऱ्या जन्ममरणरूपी चक्रापेक्षांही जास्त भयंकर, जास्त संकटाच्या आणि जास्त अज्ञानरूपी अंधकार गुहेमध्यें ढकलून दिले जातात !

शिष्य—मंत्रांत इव शब्द कशाला आला आहे ?

सिद्धान्ती—या शब्दाचें रहस्य असें आहे कीं, वरील पंडितम्मन्य लोकांना ज्या गाढ अज्ञानांधकारांत शिरावें लागतें, त्याचें स्वस्वरूप समजण्याच्याही कक्षेंत नाहीं; आणि कदाचित् समजलेंच, तर त्याचें ग्रहणही करितां यावयाचें नाहीं ! सारांश, अति गाढ, अति अगाध, अन्धतमामध्यें ( अज्ञानामध्यें ) या केवल ज्ञाननिष्ठ लोकांस कोंडून ठेविलें जातें ! ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा.

**किं तर्हि मोक्षसाधनमित्यत्राह—**

शिष्य—मोक्षसाधन कोणतें तर मग ?

सिद्धान्ती—तेंच या दहाव्या मंत्रांत सांगतात. ऐकः—

**विद्ययेति पञ्चम्यर्थे तृतीया । यथाश्रुतेऽन्यशब्दानन्वयादन्यदेवाऽऽहुः संभवादिति वक्ष्यमाणानुरोधाच्च । तथा च विद्यायाः कर्मरहित-विद्यातोऽन्यन्मोक्षसाधनमित्याहुः । उपनिषद इति शेषः । अविद्यया । अविद्यायाः । ब्रह्मविद्याविधुरकर्मणोऽन्यदेव मोक्षसाधनमित्याहुः । पूर्वपूर्वसंप्रदायसिद्धोऽयमर्थोऽस्माकमित्याह-इति शुश्रुम इति । ये पूर्वाचार्यास्ते प्रणिपातादिभिः सम्यगुपसन्नानामस्माकं तन्मोक्षसाधनं विचचक्षिरे विविच्योपदिदिशुः । तेषां धीराणां धीमतां परमात्मध्यानपराणां वचनमित्यध्याहार्यम् । यद्वा धीराणामिति पञ्चम्यर्थे षष्ठी । तेभ्यो धीरेभ्य इति योज्यम् नटस्य शृणोतीतिवत् । इति शुश्रुमः । एवं प्रकारमश्रौषम् । ननु परोक्ष एवार्थे लिड्विधानाच्छुश्रुमेत्युत्तमपुरुषो न घटत इति चेत्सत्यम् । ब्रह्मविद्यायां दुरवगाहत्वेन निःशेषग्रहणमस्माभिर्नकृतमित्यभिप्रायकत्वादुत्तमपुरुषप्रयोगस्येत्याहुः ॥ १० ॥**

येथें विद्येची तृतीयान्त विभक्ति आहे, तिचा अर्थ पंचमी विभक्तिपर केला पाहिजे. कारण तृतीयापर अर्थ केला तर मंत्रामध्यें जो अन्य शब्द आहे, त्याचा अन्वय दुसऱ्या कोणत्याही शब्दाशीं बरोबर रीतीनें लागत नाहीं. पुढें, तेराव्या मंत्रांत " संभवात् " या पंचमी विभक्तीशीं ' अन्यत् ' याचा संबंध श्रुतीनें केला आहे. म्हणून येथील मंत्राचा अर्थ करितांना पंचमी विभक्तीच घेतली पाहिजे. असो; याप्रमाणें कर्मरहित विद्येहून मोक्षसाधन निराळेंच आहे, असें सांगावयाचें आहे. निवळ शब्दपांडित्यानें मोक्ष मिळत नाहीं, असें उपनि-

षदांचें म्हणणें आहे. याच न्यायानें ज्ञानशून्य कर्माहून ( ब्रह्मविद्येचें ज्ञान नसणाऱ्या पुरुषानें केलेल्या केवल कर्माहून ) मोक्षसाधन निराळें आहे; हा उपनिषदांचा अभिप्राय आहे. म्हणून 'आम्ही केलेला अर्थही सनातन जो संप्रदाय चालत आला आहे त्याचाच अनुवाद धरून आहे.' हें स्पष्ट करण्यासाठीं "आम्ही असें ऐकलें आहे" असे या मंत्रामध्यें शब्द आहेत. 'आम्ही साधनसंपन्न झालों, नम्रभावानें ब्रह्मज्ञ आणि तत्त्वज्ञ आचार्यांच्या आश्रमांत जाऊन त्यांना साष्टांग नमस्कारांनीं प्रसन्न करून घेतलें आणि त्यांना मोक्षाचें साधन विचारलें; तेव्हां सारासार-विवेकपूर्ण असा मोक्षसाधनाचा उपदेश त्यांनीं आम्हांस केला. हे आचार्य परम बुद्धिमान् आणि परमात्म-चिंतन करणारे होते. त्यांचा उपदेश असा आहे कीं, किंवा त्यांच्यापासून आम्ही असें ऐकिलें आहे कीं, निवळ कर्म करणें हें किंवा केवल ज्ञानाच्याच पाठीमागें लागणें हें मोक्षाचें साधन नाहीं. त्याचें साधन निराळेंच आहे. येथें 'वचन' 'उपदेश' इत्यादि शब्द नाहींत, पण ते अध्याहृत आहेत असें सहज समजतें.

शिष्य—भगवन्! येथें "धीराणाम्" ही जी षष्ठी आहे तिचा अर्थ पंचमीप्रमाणें करावयाचा काय ?

सिद्धान्ती—होय.

शिष्य—येथें "शुश्रुम" हें भूतकाळाचें रूप योग्य दिसत नाहीं. कर्ता प्रथम पुरुषी असतां असा भूतकाळ कारित नाहींतना ?

सिद्धान्ती—तूं म्हणतोस हें खरें आहे; परंतु ब्रह्मविद्या ही पूर्णत्वानें समजून घेण्याला प्रायः अशक्य आहे, आम्हीं त्या विद्येचें पूर्ण ग्रहण केलें नाहीं, असें दाखविण्याकरितां व असा अभिप्राय मनांत आणून ह्या परोक्षवाचक पदाचा उपयोग केला आहे; पण हा व्याकरणाचा प्रश्न आहे. असो; अपरोक्षज्ञान झालें नाहीं, हें सांगण्याचा मुख्य हेतु आहे. ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा.

अन्यदिति सामान्येनोक्तं मोक्षसाधनं विवृणोति—

सिद्धान्ती—गेल्या मंत्रांत 'दुसरें साधन आहे' असें जें सामान्यत्वानें म्हटलें आहे त्याचें स्पष्टीकरण या मंत्रांत केलें आहे.

**कुर्वन्नेवेह कर्माणीति मन्त्रे कर्मयोगस्य प्रत्यगात्मदर्शनद्वारा परभक्त्युत्पादकत्वमुक्तम् । इह भक्तियोगेन विदुषा पूर्वोक्तकर्मयोगवेषं परित्यज्याऽहरहरनुष्ठीयमानानां नित्यनैमित्तिककर्मणां कल्मषनिबर्हणद्वारा भक्त्युपचायकत्वमुच्यते । सहशब्दस्वारस्यात् ।**

अतो न पुनरुक्तता। यो यथावस्थितविद्योपदेशवान्। विद्यां ब्रह्मोपासनरूपां तदङ्गभूतकर्मरूपामविद्यां चैतदुभयं सह वेद। अङ्गाङ्गिभावेन सहानुष्ठेयं वेदेत्यर्थः। अविद्यया विद्याङ्गतया चोदितेन कर्मणा मृत्युं विद्योत्पत्तिप्रतिबन्धकीभूतं पुण्यपापरूपं प्राक्तनकर्म तीर्त्वा निर्विशेषमुल्लङ्घ्य। विद्यया परमात्मोपासनरूपया। अमृतमश्नुते मोक्षं प्राप्नोतीत्यर्थः। तीर्त्वेत्यत्रोपायविरोधितरणमुच्यते। अमृतमश्नुत इत्युपेयब्रह्मप्राप्तिविरोधिभूतेभ्यः सर्वपापेभ्यो मोक्षः इति भेदः। एवं च सति—

इयाज सोऽपि सुबहून्यज्ञाञ्ज्ञानव्यपाश्रयः।
ब्रह्मविद्यामधिष्ठाय तर्तुं मृत्युमविद्यया॥ इति।

ज्ञानव्यपाश्रयः शास्त्रश्रवणजन्यब्रह्मज्ञानवान्स जनकोऽपि ब्रह्मविद्यां निदिध्यासनरूपामधिष्ठाय फलत्वेनाऽऽश्रित्येत्यर्थः। भक्तियोगोत्पत्तिं कामयमान इति यावत्। मृत्युं भक्त्युत्पत्तिविरोधि प्राचीनं कर्मजातम्। अविद्यया विद्याङ्गकर्मणा तर्तुं व्यपोहितुं सुबहून्यज्ञाञ्ज्योतिष्टोमादिकानियाजाकरोत्। पाकं पचतीतिवत्॥ ११॥

या उपनिषदाच्या दुसऱ्या मंत्रांत कर्मयोगाचा जो मार्ग सांगितला आहे, त्यानें प्रत्यगात्म्याचें (जीवाचें नियमन करणाऱ्या व्यक्तिगत आत्म्याचें) प्रत्यक्ष दर्शन होऊन त्याच्या संबंधानें पराभक्ति, उत्तमभक्ति, उत्पन्न होते, केवल जन्म घेते, असें प्रतिपादन केलें आहे. ह्या मंत्रांत भक्तियोगाचें माहात्म्य सांगावयाचें आहे. या भक्तियोगानें पूर्वी सांगितलेला कर्मयोगमार्ग पाठीमागें टाकून द्यावयाचा असतो. कारण अहर्निश यथाविधि केलेल्या नित्यनैमित्तिक कर्मांच्या प्रभावानें पूर्वपातकांचें व दोषांचें निरसनच होऊन गेलेलें असतें. अर्थातच मग भक्तियोगाला पुष्टि येते. तो योग वृद्धिंगत होतो. असें हें तत्त्व स्पष्ट दाखवावयाचें आहे. या मंत्रांत ‘ सह ’ ह्या शब्दाचा विशेष उपयोग आहे. पूर्वीच्या मंत्रांत हा शब्द आला नाहीं म्हणून येथें कांहीं विशेष अभिप्राय कळवावयाचा आहे, असें सिद्ध होतें. यास्तव येथें पुनरुक्तीचाही दोष येत नाहीं. असो; ज्या पुरुषाला ब्रह्माची उपासना कशी करावी याचें यथास्थित ज्ञान झालें आहे; व ह्या उपासनेला साहाय्य असणारी कर्मरूप अविद्या इचेंही ज्ञान झालें आहे, सारांश, कर्मविद्या हें अंग आणि ब्रह्मोपासनारूप विद्या ही अंगी, या दोहींचें ज्ञान होऊन दोन्ही विद्यांचें अनुष्ठान बरोबरच केलें पाहिजे, कर्म आणि उपासना यांचें साहचर्यानें अनुष्ठान केलें पाहिजे असें ज्या विद्वान् मुमुक्षु पुरुषाला ज्ञान झालें आहे तो पुरुष खरा विद्वान् होय. हा पुरुष अविद्येच्या म्हणजे कर्मांच्या अनुष्ठानसाहाय्यानें मृत्यूला पाठीमागें टाकितो; आणि विद्येच्या म्हणजे ज्ञानपूर्वक उपासनेच्या द्वारा अमृतरूप प्राप्त करून घेतो. विद्येला उपयोगी पडणाऱ्या आणि विद्येनें

प्रेरित केलेल्या कर्मांच्या म्हणजे अविद्येच्या साहाय्यानें तो मृत्यूच्या पलीकडे जातो याचा अर्थ असा कीं विद्येची ( उपासनेची ) भावना उत्पन्न करण्याला जें पुण्य–पापरूपी प्राक्तनकर्म प्रतिबंध करितें, त्या संचित कर्मांचा नाश विद्या. प्रेरित कर्मयोगानें होतो अथवा पूर्वसंचिताचा नाश निष्काम कर्मांनें होतो. याप्रमाणें वरील विद्वान् पुरुषाचा मृत्यु मरून जातो ! पुढें त्याचें परमेश्वरोपासनेचें ( विद्येचें ) अनुष्ठान चाललेलें असतें म्हणून तो मोक्षालाही प्राप्त करून घेतो. तात्पर्य, कर्मयोगानें त्याचें सर्व संचित संपतें आणि तो ज्ञानयोगाच्या साहाय्यानें ( उपासनेच्या बलानें ) सर्व पापापासून मुक्त होतो. कर्मयोगानें उपासनेच्या आड येणाऱ्या प्रतिबंधाचा नाश होतो आणि विद्येनें ( उपासनेनें ) ब्रह्मप्राप्तीला ( पुरुषार्थ साध्य करण्याच्या कर्माला ) विरोधि असणाऱ्या सर्व पापांचा नाश होतो. कर्मयोग साधनें सोपीं करितो आणि ज्ञानयोग पुरुषार्थाला जवळ आणितो. इतिहासांतही सांगितलें आहे:—

" ज्ञानी ( ज्ञानाचा आश्रय करणाऱ्या ) जनक राजानें पुष्कळ यज्ञ केले. त्याचा हेतु मृत्यूस पाठिमागें टाकावें, हा होता. हा राजा ब्रह्मविद्येचा कट्टा उपासक होता म्हणून त्यानें ब्रह्मविद्येच्या साहाय्यानें पुष्कळ यज्ञ केले."

याचा भावार्थच असा आहे कीं, शास्त्रश्रवणानें ब्रह्मज्ञानी झालेला जनकराजा अखंड ध्यानरूपी उपासनेचा आश्रय करून ( भक्तियोग उत्पन्न होणें हेंच फल आहे असा निश्चय करून ) भक्तीला विरोध करणाऱ्या प्राचीन पापपुण्यरूपी कर्मांचा नाश करण्यासाठीं व भक्तीचा उदय व्हावा यासाठीं विद्येचें साहित्य करणाऱ्या ज्योतिष्टोमादिक यज्ञांचा ( अविद्येचा ) आश्रय करिता झाला. सारांश असा आहे कीं, ब्रह्मज्ञानी जनकानें सुद्धां कर्म आणि उपासना या उभयतांचा आश्रय केला होता.

शिष्य—'पाक पकवितो' याप्रमाणेंच 'यज्ञाचें यजन करितो,' हा प्रयोग आहे ना ?

सिद्धान्ती—होय. हे असले प्रयोग अर्थास चांगली दृढता आणून वाक्यही सालंकृत करितात. ॥ ११ ॥

---

## मंत्र बारावा.

**एवं समाधिनिष्पत्तेर्नित्यनैमित्तिककर्मसाध्यत्वमुक्त्वाऽथ त्रिभिर्मन्त्रैर्निषिद्धनिवृत्तिरूपयोगाङ्गसाध्यत्वमाह–**

**तत्र तावत्प्राग्वदेकैकमात्रं विनिन्दति ॥**

**सिद्धान्ती**—याप्रमाणें निष्काम–वृत्ति धारण करून नित्यनैमित्तिक कर्में केलीं तरच उपासनेची परकाष्ठा होऊन समाधीची स्थिति प्राप्त होईल, असा मागील

मंत्रांतील विषय झाला. आतां, यापुढील तीन मंत्रांत निषिद्ध अशी जी कर्म-निवृत्ति तीही योगाचें एक अंग आहे, हें सिद्ध केलें आहे. बाराव्या मंत्रांत प्रथम ज्ञानयोगाचा मात्र जे आश्रय करितात त्यांची निंदा केली आहे. कशी ती पहा:—

'एतमितः प्रेत्याभिसंभविताऽस्मि [छा० ३।१४।४], 'ब्रह्मलोकमभिसंभवामि [छा० ८।१३।१] इत्यादिषु ब्रह्मप्राप्तिरूपाऽनुभूतिः संभूतिशब्देनोक्ता। इह तु समाधिरूपा संभूतिशब्देनोच्यते। असंभूतिशब्दस्तु समाध्यङ्गभूतां निषिद्धनिवृत्तिमाह। संभूतिं च विनाशं चेत्युत्तरत्र विनाशशब्देनासंभूतेरनुविधानात्। तथा च ये विद्याधिकारिणोऽसंभूतिमेव मानदम्भहिंसास्तेयादीनां योगविरुध्दानां निवृत्तिमेवोपासते निवृत्तिमात्रनिष्ठा इत्यर्थः। तेऽन्धं तमः प्रविशन्तीति पूर्ववदर्थः। ये पुनः समाधिरूपसंभूत्यामेव रतास्ते ततो भूय इव तमः प्रविशन्तीत्यर्थः॥ १२॥

छांदोग्यामधील (३।१४।४ व ८।१३।१) इत्यादि मंत्रांत जो संभूति शब्द आला आहे, त्याचा अर्थ ब्रह्मप्राप्तिरूप अनुभव किंवा तो अनुभव घेणें असा आहे. "हा मृत्युलोक टाकून देऊन मी ब्रह्मप्राप्तीचा अनुभव घेईन" व ब्रह्मलोकाला जाऊन "मी ब्रह्मरूपाचा अनुभव घेईन" असें छांदोग्यांतून उद्धृत केलेल्या मंत्रांचे अर्थ आहेत; पण शिष्यराया! ध्यानांत ठेव कीं येथें 'संभूति' शब्दानें समाधिरूपाचा बोध होतो. 'असंभूति' शब्दाचा अर्थ 'समाधीला साहाय्य करणारी निषिद्ध-निवृत्ति' असा आहे. पुढें चौदाव्या मंत्रांत संभूति आणि विनाश हे दोन परस्परविरोधी शब्द एकत्र वाक्यांत आले आहेत व तेथें असंभूतीच्या स्थानीं विनाश शब्द आहे, त्यावरूनही 'असंभूति' शब्दाचा अर्थ विनाश असाच आहे, हें ठरतें. असो; तात्पर्य हें आहे कीं, जे विद्येनें अधिकृत झाले आहेत, ते जर असंभूतीचा म्हणजे मान, दंभ, हिंसा, चौर्य, इत्यादि योगविरुद्ध कर्मांच्या निवृत्तीचा मात्र आश्रय करितील, सारांश, परापकारी कर्मांचा तेवढा त्याग करतात ते असंभूतीची उपासना करणारे आहेत. असें ठरतें. हे लोक अंधतमामध्यें प्रवेश करितात. अंधन्तम याचा अर्थ नवव्या मंत्रांत सांगितलाच आहे. व जे लोक संभूतीचा म्हणजे समाधिरूपाचा मात्र आश्रय करितात ते अधिकच कष्टमय लोकांप्रत जातात.

सारांश, जे लोक ज्ञानाशिवाय नुसत्या शमदमादि निवृत्तिमूलक कर्मांचा मात्र आश्रय करितात त्यांचें कल्याण होत नाहीं व जे ज्ञानी लोक नुसत्या समाधीचा मात्र आश्रय करितात त्यांचें तर मुळींच कल्याण होत नाहीं॥ १२॥

---

## मंत्र तेरावा.

किं तर्हि मोक्षसाधनमित्यत्राह—

सिद्धान्ती—तर मग मोक्षसाधन तरी काय? असें विचारशील तर सांगतों ऐकः—

**संभवात्संभूतेः। असंभवादसंभूतेरित्यर्थः। केवलात्संभवादसंभवाच्चान्यदेव मोक्षसाधनमित्युपनिषद आहुः। लिङ्व्यत्ययः पूर्ववत्। शिष्टं स्पष्टम् ॥ १३ ॥**

'संभव' याचा अर्थ संभूति म्हणजे समाधि होय. 'असंभव' या शब्दाचा अर्थ असंभूति म्हणजे निषिद्ध कर्मांपासून निवृत्ति असा आहे. केवळ समाधीच्या अनुष्ठानानें किंवा निषिद्धनिवृत्तीच्या मार्गानें मोक्ष मिळत नाहीं. मोक्षाचें साधन या उभयतांहूनही भिन्न आहे असें श्रुति म्हणते. बाकीचा अर्थ व प्रथम पुरुषाची योजना दहाव्या मंत्राप्रमाणेंच आहे. ॥ १३ ॥

---

## मंत्र चवदावा.

अन्यदित्युक्तं विवृणोति—

सिद्धान्ती—या मंत्रांत अन्यत् शब्दाचें व्याख्यान करितातः—

**संभूतिं समाधिरूपब्रह्मानुभूतिं विनाशं च योगविरोधिनां वर्जनं चेत्येतदुभयं यो विद्वानगांगिभावेन सह वेद स विद्वान्विनाशेन निषेव्यमाणेनेति शेषः। विरोधिनिवृत्तिरूपयोगांगसेवनेनेत्यर्थः। मृत्युं समाधिविरोधिपापं तीर्त्वाऽपाकृत्य निष्पन्नया संभूत्याऽमृतमश्नुते ब्रह्मप्राप्तिरूपां संभूतिमश्नुत इति भावः। अत्र संभूतिविनाशशब्दाभ्यां सृष्टिप्रलयविवक्षया कार्यहिरण्यगर्भस्याव्याकृतप्रधानस्योपासनं विधीयत इति शांकरं व्याख्यानमनुपपन्नम्। मृत्युतरणामृतत्वप्राप्तिरूपफलवचनानौचित्यात् ॥ १४ ॥**

समाधिरूप ब्रह्मानुभूति व योगविरोधि कर्मांचा त्याग या उभयांचा अंगांगिभावानें (निषिद्ध कर्मांची निवृत्ति हें अंग आणि समाधिरूप ब्रह्मानुभूति ही अंगी) या उभयतांचेंही ज्याला ज्ञान आहे, व जो यांचें अनुष्ठान करितो त्याला योगविरोधि जें शमदमादि कर्म असतें, त्याच्या एकनिष्ठ सेवनानें समाधीला विरोध करणाऱ्या पापांचा नाश करतां येतो आणि हें पाप नष्ट झाल्यावर त्याला उत्पन्न झालेल्या ब्रह्मप्राप्तिरूप समाधीचा लाभ होतो. पापनिवृत्ति ही योग्यास मृत्यूच्या पलीकडे नेते आणि एकनिष्ठ ध्यानाची समाधि ब्रह्मज्ञाला अमृत पाजिते.

शिष्य—भगवन्! संभूति आणि विनाश या शब्दांचा अर्थ शांकर-मतानें कांहीं निराळाच होतो. त्या मतांत सृष्टीची व प्रलयाची विवक्षा मनांत ठेवून कार्यरूपी हिरण्यगर्भाची उपासना म्हणजे संभूति व अव्याकृत प्रधानाची उपासना म्हणजे विनाश असे अर्थ करून हिरण्यगर्भ व अव्याकृत प्रधान यांच्या उपासना विहित केल्या आहेत, हें व्याख्यान बरोबर आहे काय?

सिद्धान्ती—नाहीं. हें व्याख्यान सर्वथा चुकलेलें आहे. कारण, या मंत्रांत मृत्यूचें तरण आणि अमृतत्त्वाची प्राप्ति हीं फलें स्पष्ट सांगितलीं आहेत. व शंकराचा अर्थ घेतला तर हीं फलप्रतिपादक-वचनें निरर्थक होतील. श्रुतीमध्यें निरर्थक किंवा अनुचित शब्द असणें संभवत नाहीं. ॥ १४ ॥

---

## मंत्र पंधरावा.

एवं साङ्गभगवद्भक्तिमुपदिश्य तन्निष्ठस्यानुसंधेयमन्त्रद्वयमुपदिशति—

सिद्धान्ती—याप्रमाणें मागील १४ मंत्रांत भगवद्भक्तीचा सांगोपांग उपदेश केला आहे. असो; एकनिष्ठ भक्तानें ध्यानांत ठेवण्यासाठीं पुढील दोन मंत्र अवतीर्ण केले आहेत. वरील भक्तानें ह्या पुढील दोन मंत्रांचें एकनिष्ठ अनुसंधान ठेवणें अत्यंत इष्ट आहे.

**हे पूषन्नादित्यान्तर्यामिन्।** य आदित्ये तिष्ठन्नित्यारभ्य 'य आदित्यमन्तरो यमयति' [३।७।९] इति शतपथश्रुतेः। 'शास्त्रदृष्ट्यातूपदेशो वामदेववदि' त्यादिन्यायाच्च। यद्वा पूषन्नाश्रितपोषणस्वभावेत्यर्थः। 'साक्षादप्यविरोधं जैमिनिः [ ब्र. सू. १।२।२८ ] इति सूत्रानुरोधात्। **सत्यस्य।** सत्यशब्देन स्वरूपविकाररहितजीवात्मोच्यते। 'सत्यं चानृतं च' ( छा० १।२।३ ) सत्यमभवदित्यादिषु जीवेऽपि सत्यशब्दप्रयोगात्। **तस्य मुखम्** मुखवत्। अनेकेन्द्रियावष्टम्भकतया मुखसदृशं मन इत्यर्थः। **हिरण्मयेन** हिरण्यसदृशेन भोग्यवर्गेणेति यावत्। **पात्रेण** परमात्मविषयकवृत्तिप्रतिरोधकेनापिहितमाच्छादितम्। हृदि निहिते परमात्मनि निरुद्धवृत्तिकं जातमित्यर्थः। तज्जीवस्य मुखस्थानीयं मनो हृषीकाणामीशस्त्वमपावृणु निरस्य तिरोधानं कुर्वित्यर्थः। तत्कस्य हेतोस्तत्राऽह—**सत्यधर्माय** सत्यस्य जीवस्य धर्मभूताय। **दृष्टिर्दर्शनम्।** त्वद्दर्शनायेति भावः ॥ १५ ॥

शिष्य—कशाकरितां महाराज?

सिद्धान्ती—सत्य धर्माचें दर्शन व्हावें म्हणून.

हे पूषा ! हे आदित्याचें नियमन करणाऱ्या अंतर्यामी देवा !—

शिष्य—असा हा अंतर्यामित्वाचा अर्थ कसा निघतो ?

सिद्धान्ती—" जो आदित्यामध्यें राहून " असा आरंभ करून " जो आदित्याचें अंतरंग नियमित करितो, जो आदित्याचा अंतर्यामी असतो " अशी शतपथश्रुति ( ३।७।९ ) येथें प्रमाण आहे. या श्रुतीवरून आम्ही केलेला अर्थच अभिप्रेत आहे, असें ठरतें. शास्त्र दृष्टीनेंही हाच अर्थ ठरतो. ' वामदेवाला जसा उपदेश झाला आहे त्यांत सर्वत्र परमात्मा आहे व तो सर्वांचा अंतर्यामी आहे, असें ज्ञान झालें.' या श्रीमद्व्यासाचार्यांच्या सूत्रावरून आम्हीं अर्थ केला आहे तोच खरा आहे.

शिष्य—किंवा पूषन् याचा अर्थ शरण आलेल्या लोकांचा ' पोषणकर्ता ' असाही करावा. " परमेश्वराची साक्षात् उपासना केली तरी विरोध येत नाहीं. असें श्रीमद्व्यासाचार्यांनीं ब्रह्मसूत्रामध्यें ( १।२।२८ पहा ) म्हटलें आहे.

सिद्धान्ती—ठीक आहे. हाही अर्थ शास्त्राला संमतच आहे. असो; आतां, या मंत्रांतील सत्य या शब्दानें स्वस्वरूप, विकारशून्य जीवात्मा, असा अर्थ घ्यावयाचा आहे. जीवाला देवाचें ( परमेश्वराचें ) दर्शन व्हावें म्हणून 'मनोनाश कर' हा उपदेश आहे.

" सत्य आणि असत्य या छांदोग्य ( १।२।३ ) श्रुतीमध्यें जीवालाही ' सत्य ' हाच शब्द उपयोजिला आहे. त्याच जीवात्म्याचें मुख म्हणजे अनेक इंद्रियांचें अधिष्ठान असणारें व त्यांचें नियमन करणारें जीवाचें मन असा अर्थ होतो. या जीवाचें मन जणूं कांहीं इंद्रियांचें मुखच आहे, असो; हें मन भोग्य-विषयांनीं म्हणजे परमात्मस्वरूपाकडे जाणारी जी वृत्ति तिचा प्रतिरोध होणाऱ्या सुंदर व तेजस्वी भोग्य पदार्थांनीं झांकून किंवा आच्छादून टाकलें आहे. सारांश, जीवाचें मन परमात्म्याकडून निघून विषयांमध्यें रममाण झालें आहे. हृदयामध्यें राहणाऱ्या परमात्म्याला पराङ्मुख होऊन जीवाचें मन विषयोन्मुख झालें आहे. म्हणून ' हे इंद्रियांचा स्वामी असणाऱ्या देवा ! जीवांचें मुख्य इंद्रिय जें मन तें विषयांनीं आच्छादून टाकलें आहे, तें तिकडून काढ. म्हणजे विषयांपासून त्याला निवृत्त कर, एकीकडे ने किंवा त्या विषयोन्मुख मनाला नाहींसेंच करून टाक."

विषयोन्मुख मनाचा नाश होऊन धर्मरूपी परमेश्वराकडे भक्ताची दृष्टि लागावी एतदर्थ ही प्रार्थना आहे ॥ १५ ॥

---

## मंत्र सोळावा.

**पुनरपि तया दृष्ट्या द्रष्टव्यं विशिंषन्दर्शनं तत्साधनं चाभ्यर्थयते—**

सिद्धान्ती—याच दृष्टीनें पुनःही जें ब्रह्मस्वरूप पहावयाचें आहे, त्याचें विशिष्ट स्वरूप सांगून त्याचें दर्शन व्हावें; व त्याच्या दर्शनाचीं साधनें प्राप्त व्हावीं एतदर्थं या मंत्रांत प्रार्थना केली आहे.—

**पूषन्नाश्रितपोषक। एकश्चासावृषिश्चैकर्षिः। अद्वियातीन्द्रियार्थद्रष्टा। 'नान्योऽतोऽस्ति द्रष्टा' [बृ ३०।७।२३] इति श्रुतेः। यमो यमयति सर्वानिति यमः। सर्वान्तर्यामिन्। 'यः पृथिवीमन्तरो यमयति' [बृ० ३।७।३] 'य आत्मानमन्तरो यमयति' [बृ० ३।७।२] इत्यादि श्रुतेः। सूर्य स्वोपासकधियां सुष्ठु प्रेरक। प्राजापत्य प्रजापतिश्चतुर्मुखस्तस्य सुताः प्राजापत्यास्तेषामन्तर्यामिन्। यद्वा प्रजापतिरेव प्राजापत्यः। प्रजानां पतिरिति व्युत्पत्त्या प्रजापतिर्विष्णुः 'प्रजापतिश्चरति गर्भे अन्तः' [म० ना० १।१] इति श्रुतेः। व्यूह रश्मीन्। भवदीयदिव्यरूपदर्शनानुपयुक्तान्स्वोग्ररश्मीन्व्यूह व्यपोह विगमयेत्यर्थः। यत्ते दर्शनौपयिकं प्रभात्मकं तेजस्तत्समूह समूहीकुरु। तत्किमर्थमित्याशङ्क्य द्रष्टुमिच्छामि ते रूपमित्याह यदिति यत्। 'आदित्यवर्णं तमसः परस्तात्' [श्वे० ३।८] इत्यादिश्रुतिषु प्रसिद्धमित्यर्थः। ते। 'आनन्दो ब्रह्म' [तै० ३।६] इति निरतिशयभोग्यस्य तवापि। कल्याणतमं सौन्दर्यादिगुणातिशयेन कल्याणेभ्योऽतिशयितं कल्याणं शुभाश्रयमिति भावः। ते यद्दिव्यरूपं तत्पश्यामि पश्येयमिति लकारव्यत्ययश्छान्दसः। द्रष्टुमिच्छामीति भावः। ननु 'यत्ते रूपं कल्याणतमम्'। 'य एषोऽन्तरादित्ये हिरण्मयः पुरुषः'। [छा० १।६।६] 'ईशा वास्यमिदꣳ सर्वम्' [ई० १] 'पतिं विश्वस्याऽऽत्मेश्वरम्'। '[म० ना० ११।३] 'सर्वकर्मा सर्वगन्धः। स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च' [श्वे० ६।८]। तस्य ह वा एतस्य ब्रह्मणो नाम सत्यमिति' [छा० ८।३।४] 'तस्योदिति नाम' [छा० १।६।७] इत्यादिभिः शास्त्रैर्गुणविग्रहादयो ब्रह्मणो विधीयन्ते। निर्गुणं निरञ्जनम्। 'सत्यं ज्ञानम्' [तै० २।१।१] 'अकायमव्रणम्।' [ई० ८] 'नेह नानास्ति किंचन' [बृ० ४।४।१९] 'निष्कलं निष्क्रियम्।' [श्वे० ६।१९] 'अगोत्रमवर्णम्।' [मु० १।१।६] एवमादिभिः शास्त्रैर्गुणादयः प्रतिषिध्यन्ते। तथा विधिनिषेधयोः शास्त्रयोर्विरोधादन्यतरबाधोऽवश्यंभावी। तत्र निषेधस्य प्रसक्तिपूर्वकतया पश्चात्प्रवृत्तं प्रतिषे-**

धशास्त्रमपच्छेदाधिकरणन्यायेन प्रबलम् । अतः प्रतिषेधबलेन गुणादिविधयः सर्वे बाधिताः । ततश्च विद्याख्यदोषपरिकल्पित-गुणविग्रहादयो मिथ्याभूता इति । तदिदमनादरणीयम् । पशुच्छा-गनयेनोत्सर्गापवादनयेन च विधिनिषेधयोर्भिन्नविषयत्वोपपादनेन तयोर्विरोधगन्धाभावाद्विधीनां प्रतिषेधबाध्यतानुपपत्तेः । तदुक्तं तत्त्वसारे—

यद्ब्रह्मणो गुणविकारशरीरभेदकर्मादिगोचरविधिप्रतिषेधवाचः ।
अन्योन्यभिन्नविषया न विरोधगन्धमर्हन्ति तन्न विधयः प्रतिषेधबाध्याः ॥

इति । अथान्तर्यामिणमहंग्रहेणानुसंधत्ते—योऽसावसौ पुरुषः सोऽहमस्मीति । असावसाविति वीप्साऽऽदरार्था । यद्वाऽदः शब्दौ विभज्य यत्तच्छब्दाभ्यामन्वेतव्यौ योऽसौ पुरुषः प्रसिद्धः सोऽसावहमस्मीति । यद्यपि—

पुरुषं प्रकृतिं चैव प्रधानपुरुषेश्वरः [ गी० १३।१९ ]

इत्यादिषु पुरुषशब्दो जीववाचितया प्रसिद्धस्तथाऽपि 'तेनेदं पूर्णं पुरुषेण सर्वम् ।' [ श्वे० ३।९ ] इत्यादिश्रुत्या सर्ववेदपठित-पुरुषसूक्तादिषु प्रसिद्धो महापुरुष एवेह पुरुषशब्देन विवक्षितः । नन्वेवं योऽसौ पुरुषः सोऽहमिति कथं सामानाधिकरण्यम् । अहं-पदार्थस्य जीवस्य महापुरुषाद्भिन्नत्वादिति चेन्न । अहंशब्देनाप्य-स्मदर्थान्तर्यामिण एवाभिधानेनाहं स इति निर्देशस्य सुसंग-तत्वात् । ननु चाहंशब्दस्य प्रत्यगर्थान्तर्यामित्वपरत्वे सोऽस्मी-त्युत्तमपुरुषो न घटते । नहि तदन्तर्यामिपुरुषोऽस्मीत्यन्वयो युज्यत इति चेदुच्यते—मदन्तर्यामीत्यादिशब्दान्तरेणोपस्थापिते प्रत्यगर्थान्तर्यामिण्युत्तमपुरुषान्वयासंभवेऽप्यहमित्यस्मत्पदोपस्था-पिते तस्मिन्नुत्तमपुरुषान्वयो युज्यत एव । तथा च सूत्रम्-अस्म-द्युत्तमः । ( पा० सू० १।४।१० ) इति । प्रत्यगर्थबोधकास्मच्छ-ब्दोपपद उत्तमपुरुषो भवतीत्यर्थः । न पुनरस्मच्छब्दस्य प्रत्य-गर्थद्वारा परमात्मपर्यन्ततायामुत्तमनिवृत्तिरिति । अधिकं तु प्रविष्टं न तद्धानिरिति न्यायात् । एवं तत्त्वमसीत्यादिष्वप्यसीति मध्यमपुरुषो निर्वाह्यः । त्वंपदेनाभिमुखचेतनद्वारैव तदन्तर्यामि-णोऽभिधानाभ्युपगमात् । तत्रापि 'युष्मद्युपपदे समानाधिकरणे स्थानिन्यपि मध्यमः ।' ( पा० सू० १।४।१०५ ) इत्येतावदेव हि

स्मर्यते । न तु युष्मच्छब्दस्य स्वाभिमुखचेतनद्वारा तदन्तर्यामिपर्यन्तत्वे मध्यमनिवृत्तिरिति । ये तु तत्त्वमसि सोऽहमस्मीत्यादिष्वहंत्वमादिशब्दैर्युष्मदस्मदर्थपरित्यागेन निर्विशेषचिन्मात्रस्वरूपैक्यमेव वाक्यवेद्यमित्याहुः, तानेव तत्त्वमसीत्यादिवाक्येष्वसिरिव सोऽहमस्मीतिवाक्यस्थास्मिरपि खण्डयति । श्रोतर्यनुसंधातरि च युष्मदस्मत्ते हि तैः परित्यक्ते न तेषामसिना कश्चित्प्रतिबोधनीयोऽस्ति न च कश्चिदस्मिना विशिष्यानुसंधेयः । ननु प्रकृते युष्मदस्मदोरविवक्षायामपि तयोर्व्युत्पन्नयुष्मदस्मच्छब्दोपपदमात्रोपजीवनेनास्मत्पक्षेऽपि त्वमहमिति मध्यमोत्तमयोः संपत्तिरिति चेत् । ततोऽप्यपरित्यक्तप्रवृत्तिनिमित्तकस्यास्माकं निर्वहणस्यैवानुसर्तुमुचितत्वात् । अपर आह योऽसावसौ पुरुषः सोऽहमस्मीत्यत्र पुरुषशब्देन परमपुरुषो न विवक्षणीयः । तथा सत्युत्तमपुरुष इत्याख्यायाः सोऽहमिति सामानाधिकरण्यस्य च क्लेशेन निर्वाह्यत्वात् । अतो वरमत्र पुरुषशब्दस्य परिशुद्धजीवात्मपरत्वमाश्रयितुम् । एवं च सति यः पुरुषो मुक्तिदशयभाव्याकारः परिशुद्धजीवात्मा सोऽहमस्मीत्यन्वयादुत्तमपुरुष इत्याख्यायाः सामानाधिकरण्यस्य चातिस्वरसेन निर्वाह इति । नायं पक्षः साधुः । तथा हि—भवत्वेवमिह निर्वहणं तथाऽपि तत्त्वमसीत्यत्र तत्पदस्य त्वं वा अहमस्मि भगवो देवते, अहं वै त्वमसीत्यादिषु त्वंपदस्य च परदेवतावाचकत्वे त्वदुक्तनिर्वाहस्यात्रासंभवात् । अकामेनापि तत्रास्मदुक्तनिर्वाहस्य समाश्रयणे तत्समानन्यायादत्रापि तस्यैवानुसर्तुमुचितत्वादिति । स्यादेतदेवं त्वं वा अहमस्मि भगवो देवते, अहं वै त्वमसीत्यत्र कथं पुरुषव्यवस्था त्वमहंशब्दयोरुभयोरपि श्रवणात् । उद्देश्यविषयकमेव युष्मदादिपदमुपपदत्वेन पाणिनिसूत्राभिप्रेतम् । यथा चोद्देश्यसमर्पकोपपदवशादेवात्र मध्यमोत्तमयोर्व्यवस्था सिध्यतीति चेत् । अस्त्वेवमिह समाधानं तथाऽपि तत्त्वमसीत्यत्र पुरुषव्यवस्था न घटते । तत्र त्वंपदयोगवत्तत्पदयोगस्यापि सत्त्वात् । तथा चासीतिवदस्तीति प्रथमपुरुषस्यापि प्रसङ्गः । नह्यत्रापि त्वंपदमुद्देश्यसमर्पकम् । येन त्वंपदमेव पुरुषनिमित्तं न तु तत्पदमपीति व्यवस्था स्यात्तथा च तत्त्वमसीतिनिरूपणावसरे भाष्यम्—नात्र किंचिदुद्दिश्य किमपिविधीयत इति । तस्मात्तत्त्वमस्तीति प्रसङ्गो दुर्वार इति । अत्रोच्यते—तत्त्वमसीत्यत्रापि त्वंपदार्थ उद्देश्य एव । तत-

श्चोद्देश्यविषयकयुष्मत्पदवशात्तत्र मध्यम एवेति न प्रथमपुरुष-प्रसङ्गः । नच भाष्यविरोधः । भाष्यस्य विधेयांशमात्रनिषेधप-रतयोद्देश्यांशनिषेधकत्वाभावात् । तथा हि-नह्येवं भाष्याभिप्रायः । नात्र किंचिदुद्दिश्यते । न च किंचिद्विधीयत इति । अपि त्वेवम-भिप्रायः । त्वंपदेन किंचिदुद्दिश्यत एव किंतूद्दिष्टे तत्र न किंचिदपि विधीयत इति कथमवगम्यत इति चेत्प्राप्तस्यैवोपसंहारत्वो-पपादकभाष्येणैव विधेयांश एव निषिध्यत इत्यभिप्रायस्य व्यक्त-त्वात् । अन्य आह त्वं राजाऽस्यहं राजाऽस्मीत्यादिवत्ताद्धी-न्यादुपचारविवक्षया तत्त्वमसि सोऽहमस्मीत्यादिषु मध्यमोत्तम-सामानाधिकरण्यानामसामञ्जस्यमिति । तदप्युपेक्षणीयमेव । लोकवेदयोश्चेतनपर्यन्तं देवमनुष्यादिव्यवहारबलेन जातिगुण-शब्दवन्मुख्यस्यैव संभव उपचारकल्पनस्यान्याय्यत्वात् ॥ १६ ॥

हे आश्रितांचें पोषण करणाऱ्या देवा ! आपल्याला जसें अतींद्रिय पदार्थांचें व तत्त्वांचें ज्ञान आहे. तसें दुसऱ्या कोणासही नाहीं. आपण अद्वितीय आहांत. "याच्याशिवाय दुसरा द्रष्टा नाहीं" ( बृ०।३०।२०।२३ ) अशी श्रुति मी म्हणतों, हेंच समर्थन करिते. म्हणून मी आपल्यास एकर्षि म्हणतों. आपण सर्वांचे नियामक आहां म्हणजे सर्वांतर्यामीं आहां. "जो पृथ्वीच्या अंतर्यामीं राहून व जीवांच्या अंतर्यामीं राहून उभयतांचेंही नियमन करतो" ( बृ० ३।७ म० ३ आणि ९ ) या श्रुतीचाच मी अनुवाद करीत आहें व आपल्यास 'यम' या विशेष नामानें संबोधित आहें. आपण आपल्या उपासकांच्या बुद्धीला उत्तम प्रकारची प्रेरणा करिता, यास्तव आपल्यास 'सूर्य' 'सविता' हीं नांवें उत्तम शोभतात. चतुर्मुख ब्रह्मदेवानें जे कांहीं पदार्थ उत्पन्न केले आहेत त्यांचे प्रेरक व चालक आपणच आहां. त्याच्या पुत्रांचे अंतर्यामीं आपण आहां, एतदर्थ आपल्यास 'प्राजापत्य' ही संज्ञा मी देतों.

शिष्य—भगवन् ! येथें प्रजांचा पति असा प्रजापति शब्दाचा अर्थ करावा. विष्णूचें हें नांव आहे. "सर्वांच्या गर्भामध्यें राहून तेथें स्वव्यापार ( गर्भस्थ जीवांचें पोषण, रक्षण इत्यादि व्यापार ) करितो." असे महानारदीय ( १।१ ) उपनिषदांत म्हटलें आहे.

सिद्धान्ती—ठीक आहे. चांगला अर्थ केलास. परमेश्वराचा उपासक म्हणतो हे पूषा, एकर्षे, यम, सूर्य, प्राजापत्य, आपले किरण, आपले उग्र प्रकाश-किरण आतां आवरून घे. ह्या किरणांचा संहार केला नाहींस तर ( परत घेतले नाहींस तर ) तुझ्या दिव्य स्वरूपाचें मला दर्शन होणार नाहीं. पण तुझ्या दर्शनाला योग्य जें तुझें प्रभारूपी तेज आहे तें मात्र सर्वच्यासर्व प्रकट होऊं दे. कारण

मला तुझें वेदप्रसिद्ध स्वरूप पहावयाचें आहे. हें स्वरूप "आदित्य वर्ण असून अंध :काराचेंही स्वरूप प्रत्यक्ष दाखविणारें आहे." असें श्वेताश्वतर उपनिषदांमध्यें[क] (३।८) प्रसिद्धच आहे. तैत्तिरीय श्रुति (३।६) म्हणते कीं 'आनंद हेंच ब्रह्माचें स्वरूप आहे.' सर्व भोग्य वस्तूपेक्षां अनंतपटीनें अतिशय सुख देणाऱ्या देवा! आपलें अति-मंगल स्वरूप, आपल्या सर्व-श्रेष्ठ सौंदर्यानें स्वकीय भक्तांस उत्तमप्रकारचें कल्याण प्राप्त करून देणारें, ध्यानाला कल्याण-कारक आश्रय देणारें, "शुभाश्रय" असणारें, असें हें आपलें दिव्य स्वरूप मला दिसेल असें कर. कारण तें कल्याणाचें कल्याण करणारें स्वरूप पाहण्याची मला भारी इच्छा आहे.

शिष्य—गुरुजी! येथें "पश्यामि" (मी पाहतों) असा प्रयोग झाला आहे हा ठीक आहे काय?

सिद्धान्ती—हा आर्ष प्रयोग आहे 'पश्येयम्' (मला पाहाणें शक्य असूं दे.) असें क्रियापद असावयास पाहिजे होतें.

पूर्वपक्षी—अहो! हा तुम्ही श्रुतीच्या अर्थाचा कसा अन्यायी अनर्थ करितां? पहा कीं कांहीं श्रुति असें सांगण्यास प्रवर्तल्या आहेत कीं, "जें तुझें अत्यंत कल्याण करणारें स्वरूप आहे. (जें तुझें मंगलतम स्वरूप आहे.)" "जो हा सूर्याच्या अंतरात्म्यांत राहून स्वतः हिरण्मय (सोन्याच्या वर्णाचा) पुरुष आहे" (छा० १।६।६) "हें सर्व परमेश्वरानें ओतप्रोत भरलेलें आहे." (ई० १) "हा जीवांचा स्वामी सर्व जगतांचेंही पालन करणारा परमात्मा" (म० ना० ११।३) "हा सर्वकर्ता आणि सर्वघ्राता, (सुवास घेणारा) याचें ज्ञान, याचें बल व याचें कर्म स्वाभाविक आहे." (श्वे० श्व० ६।८) "त्या ह्या ब्रह्माचें नाम सत्य हें आहे." (छा० ८।३।४) "त्याचे नांव पापविनाशक आहे." (छां० १।६।७) इत्यादि अनेक श्रुतींमध्यें ब्रह्माला गुण आहेत. व ब्रह्माला शरीर आहे. सारांश, ब्रह्माला नामरूप आहे, असें कांहीं श्रुति विधान करितात आणि दुसऱ्या कांहीं श्रुति सर्व गुणांचा ब्रह्मासंबंधानें निषेध करितात. पहा "तें ब्रह्म निर्गुण आणि निर्मळ आहे." "तें सत्यरूप म्हणजे ज्ञानरूप आहे." (तै० २।१।१) "त्याला शरीर नाहीं किंवा कोणत्याही प्रकारचें क्षत पडत नाहीं." (ई०८) "येथें अनेकत्व नाहींच आहे" (बृ० ४।४।१९) "तें निष्कल, विभागशून्य आणि निष्क्रिय आहे." (श्वे० ६।१९) "त्याला गोत्र नाहीं किंवा वर्णही नाहीं." (मुंडक १।१।६) इत्यादि श्रुति ब्रह्मामध्यें गुणादि कांहीं नाहीं असा एक कंठानें गुणादिकांचा निषेध करिताहेत. आतां विधिनिषेधांमध्यें विरोध असेल तर विधिवाक्याचा (अस्तिप्रतिपादक वाक्याचा) अथवा निषेध वाक्याचा (नास्तिप्रतिपादक वाक्याचा) कोणाचा तरी बाध झाला पाहिजे, असा न्याय आहे. येथें तसाच प्रसंग आहे.

सिद्धान्ती—मग त्याचें काय ?

पूर्व०—ऐका. निषेध सांगणारीं वाक्यें आहेत तीं कोणत्या तरी वस्तूचें अस्तित्व पत्करून मागून त्या त्या गृहीत केलेल्या गोष्टींचा निषेध करतात. अर्थातच निषेधक वाक्यें बलवत्तर असतात. हा न्याय आहे. म्हणून ह्या बलवत्तर निषेध वाक्यांच्या सामर्थ्यानें ब्रह्माचे ठिकाणीं गुणादिक स्थापन करणारीं जीं वाक्यें आहेत तीं सर्व बाधितच होतात. आतां बाध्य असणारीं किंवा बाधित होणारीं वाक्यें मिथ्याच असलीं पाहिजेत. कारण ब्रह्मामध्यें गुण अथवा .शरीर यांचें जें स्थापन केलें आहे तें अविद्यानामक दोषानें 'अग्राह्य' म्हणून मिथ्या झालें आहे. ब्रह्माचे ठिकाणीं गुणादिकांची स्थापना होते, ती अविद्येमुळें होते. एवंच गुणविधान करणारीं वाक्यें मिथ्या आहेत असें ठरलें. सारांश, ब्रह्म निर्गुण आहे, अशरीरी आहे, असे सिद्धान्त श्रुतींच्या आणि न्यायाच्या बलावर करून आम्ही या विरोधी वाक्यांची व्यवस्था लावितों. तुम्ही सगुण ब्रह्माचें प्रतिपादन करणारे आहां, तेव्हां हीं परस्पर विरोधी वाक्यें प्राप्त झालीं असतां, एका वस्तूविषयींच गुणविधायक आणि निषेधक वाक्यें प्राप्त झालीं असतां, कसा काय निर्णय करितां, हें आम्हांस पहावयाचें आहे.

सिद्धान्ती—ही तुमची शंका व्यर्थ आहे. व तुम्ही काढलेला निष्कर्षही असत् (खोटा) आहे. पहा कीं विधि-वाक्यें आणि निषेधवाक्यें हीं जर भिन्न भिन्न विषयांचें प्रतिपादन करीत असतील, ज्या विषयाचें विधान केलें असेल त्याहून निराळ्या विषयाचा निषेध जर निषेध-वाक्यें करीत असतील, तर ह्या उभय वाक्यामध्यें कोणत्याही प्रकारचा विरोध किंवा विरोधाचा गंध सुद्धां राहत नाहीं. आणि म्हणून विधिवाक्यांचा बाध निषेध-वाक्यें करूं शकत नाहींत. पशुच्छाग-न्यायानें आम्ही म्हणतों हें न्याय्य आहे. यज्ञास पशु असावा असें कोठें सांगितलें असतें व कोठें छाग म्हणजे बकरा असावा असें सांगितलें असतें. पण या दोहोंत विरोध असत नाहीं. पशू म्हणजे यज्ञास योग्य ( मेध्य ) असा कोणताही चतुष्पाद प्राणी आणि बकरा हा विशेष प्राणी आहे. कित्येक यज्ञां-मध्यें छागाची आवश्यकता सांगितली असते. म्हणून सामान्यत्वानें सांगि-तलेल्या पशुयागाचा निषेध होत नाहीं. उत्सर्गापवादाचा न्यायही असाच असतो. कांहीं सामान्य नियम सांगितला असतां विशेष ठिकाणीं अपवाद सांगितला असेल तर तो अपवाद सामान्य नियमाचा निषेध करीत नाहीं. शिवाय तुम्ही मोठ्या डौलानें 'ब्रह्म हें निर्गुणच आहे' असें म्हणतां तें श्रुतीला, युक्तीला व अनुभवाला प्रमाणही असत नाहीं. म्हणून तुमचा पक्ष स्वीकृत करण्यास योग्य नाहीं.

पूर्व०—याला आधार ?

सिद्धान्ती—ऐका. तत्त्वसार नामक ग्रंथांत म्हटलें आहे. "ब्रह्माचे गुण, विकार, शरीरभेद, कर्म, इत्यादि विषयीं जीं विधानें असतात व निषेध असतात, ते परस्पर–विरोधी होत नाहींत. कारण विधायक वाक्यांचे विषय निराळे असतात आणि निषेधक वाक्यांचे विषयही निराळे असतात; म्हणून विधिवाक्यांचा बाध निषेधवाक्यें करूं शकत नाहींत."

असो; यापुढें परमेश्वराची उपासना करणारा भक्त 'अंतर्यामी परमेश्वर आपणच आहों' असें अनुसंधान ठेवून "हा जो पुरुष आहे. तो मी आहें." असें म्हणतो.

शिष्य—येथें असौ ( हा ) या शब्दाचा दोन वेळ उच्चार झाला आहे तो आदर ( पूज्यभाव ) उत्पन्न करण्यासाठींच झाला आहेना ?

सिद्धान्ती—बरोबर ! किंवा या शब्दांचा विभाग करून असा अर्थ करावा कीं, " जो हा प्रसिद्ध पुरुष आहे तो हा मी आहें. " आतां जरी—

" पुरुष आणि प्रकृति हीं दोन्ही प्रधान–पुरुषेश्वर ( प्रधानाचा व पुरुषाचा स्वामी असणारा ) हाच आहे ( म्हणजे परमेश्वरच पुरुष आणि प्रकृति हीं दोन प्रकारचीं रूपें घेतो ) असें भगवद्गीतेच्या* तेराव्या अध्यायांतील १९ व्या श्लोकांत म्हटलें आहे.

या व इतर ठिकाणीं पुरुष शब्दाचा अर्थ जीव असा यद्यपि प्रसिद्ध आहे तथापि " त्या ह्या पुरुषानें हें सर्व जगत् पूर्ण केलें आहे." ( श्वे० श्व० ३।९) इत्यादि श्रुतींनीं व सर्व वेदांमध्यें विद्यमान असलेल्या पुरुषसूक्तादिकांच्या मंत्रांनीं पुरुष याचा अर्थ ' तो प्रसिद्ध महापुरुषच ' अभिप्रेत आहे. सारांश, पुरुष या शब्दानें या मंत्रांत परब्रह्माचाच उल्लेख झाला आहे.

पूर्वपक्षी—हें परमेश्वराचें आणि अहंपदानें निदर्शित केलेल्या जीवाचें प्रक्रियेनें सामानाधिकरण्य कसें होईल ? महापुरुष जो परमेश्वर तो जीवाहून अत्यंत भिन्न आहे. तेव्हां, सर्वथा परतंत्र असणारा जो जीव तो आपल्याला " मी स्वतंत्र असणारा व सर्व–स्वामी असणारा महापुरुष आहें " असें कसें म्हणेल ? ' जीव हा परमेश्वराच्या शरीराचा एक भाग आहे ' असा तुमचा सिद्धान्त आहे.

---

* या भाष्यकारांजवळ निराळीच भगवद्गीता होती असें दिसतें. यांचा पाठ " पुरुषं, प्रकृतिं चैव प्रधानं पुरुषेश्वरः " असा आहे; पण प्रचलित प्रसिद्ध भगवद्गीतेमध्यें " पुरुषं प्रकृतिं चैव विध्यनादी उभावपि " असा पाठ सर्वसाधारण आहे. असें दुसरें एक पाठान्तर यानीं या उपनिषदाच्या पहिल्या मंत्राचें व्याख्यान करतांना उद्धृत केलें आहे. यावरून अशी बळकट शंका उत्पन्न होते कीं, सर्वपठित व सर्वमान्य गीतेंतही पाठ-पाठान्तरें होतीं किंवा आहेत.

सिद्धान्ती—ही शंका व्यर्थ आहे. कारण येथें "मी" या शब्दानें जीवाच्या अंतर्यामीचा बोध करून घ्यावयाचा आहे; जीवाचा अंतर्यामी हाच परमेश्वर आहे, असें सांगावयाचें आहे. असा अर्थ केला म्हणजे ग्रंथाची संगति चांगली लागते.

पूर्वपक्षी—याप्रमाणें "मी" चा अर्थ अंतर्यामी परमेश्वर केला तर "सोऽस्मि" (तो आहें) असा प्रयोग, असें वाक्य, शुद्ध कसें असेल? 'त्याचा अंतर्यामी पुरुष आहें' असा प्रथम पुरुषीं कर्तरिप्रयोग व्याकरणशास्त्राच्या सर्वथा विरुद्ध आहे.

सिद्धान्ती—"माझ्यामध्यें अंतर्यामी असणाऱ्या" इत्यादि निराळ्या शब्दांनीं स्थापित झालेला जो प्रत्यगात्मा (जीवाच्या अंतर्यामी असणारा परमेश्वर) त्याच्या संबंधानें प्रथम पुरुषी प्रयोग होणें असंभवनीय आहे, हें खरें; पण "माझ्या अंतर्यामामध्यें असणाऱ्या" पदानें स्थापित केलेला जो परमात्मा त्याच्या संबंधानें 'मी' हा शब्द उपयोजून तोच कर्ता केला म्हणजे प्रथम पुरुषी कर्तरिप्रयोग ठीकच जुळतो. महावैयाकरणकार पाणिनि यांनाही हा प्रयोग मान्य आहे. अस्मत्–अर्थाच्या कर्तरि वाक्यांत क्रियापद प्रथम पुरुषींच असावें असा त्यांचा नियम आहे. (पाणिनि सूत्र १।४।१०) सारांश, अंतर्यामी प्रत्यगात्म्याचा बोध जर अस्मत्–शब्दानें होत असेल (मी या शब्दानें होत असेल) तर तेथें प्रथम पुरुषच योग्य आहे.

पूर्वपक्षी—ठीक आहे. हा तुमचा अस्मत् शब्द अंतर्यामी आत्म्याच्या द्वारानें जर परमात्म्यापर्यंत जाऊन पोंहचत असेल, परमात्मा हाच जर त्याचा अर्थ होत असेल तर *प्रथम पुरुषाची "मी" ची, जीवाची निवृत्तिच झाली म्हणावयाची! (म्हणजे जीवाचें अस्तित्वच नाहींसें झालें म्हणावयाचें!) आम्ही अद्वैतवादी या पेक्षां जास्त काय मागतों? 'जीव सर्वथा नाहीं, एक ब्रह्म मात्र काय तें आहे.' हाच आमचा सिद्धान्त आहे; आणि तुम्हीही शेवटीं त्याच सिद्धान्ताचा स्वीकार करीत आहांत. ठीक आहे. उत्तम गोष्ट झाली!

सिद्धान्ती—असा अर्थाचा अनर्थ करूं नका. जीवामध्यें पुरुषोत्तमाचा प्रवेश झाला म्हणून जीवाची हानि झाली असें नाहीं. जीवामध्यें अधिकाचा, परमात्म्याचा प्रवेश झाला, इतकेंच काय तें. जीवाची हानि मुळींच झाली नाहीं. याच न्यायानें "तें तूं आहेस" इत्यादि महावाक्यांत 'असि' (आहेस) या मध्यमपुरुषाचा (द्वितीय पुरुषाचा) निर्वाह करावयाचा आहे. या वाक्यांत "त्वं" (तूं) या शब्दानें अभिमुख (प्रत्यक्ष) होणाऱ्या चैतन्य द्वारानें त्यामध्यें (जीवामध्यें) असणाऱ्या अंतर्यामीचा नामनिर्देश होतो. म्हणजे

* मराठी प्रथम पुरुषाला संस्कृतांत उत्तम पुरुष हें नांव आहे.

'तूं' मध्यें (जीवामध्यें) असणाऱ्या अंतर्यामीचा निर्देश होतो. हें म्हणणें सर्वांसच ग्राह्य असलें पाहिजे. कारण ह्या म्हणण्याला व असल्या प्रकारच्या प्रयोगाला पाणिनिसूत्राचा (१।४।१०५) आधार आहे. येथें तुम्हीं असें नाहीं म्हणणार कीं युष्मत् शब्दानें प्रत्यक्ष होणाऱ्या चैतन्य द्वारानें परमात्म्यापर्यंत जीवाला जातां येऊन तो जीव परमात्मा होतो आणि याप्रमाणें जीव हा पदार्थ नाहींसा होतो.

**पूर्वपक्षी**—"तत्त्वमसि, (तें तूं आहेस)" "सोऽहमस्मि" "(तो मी आहें)" इत्यादि वाक्यांमध्यें 'मीं, तूं' हे शब्द आपापला अर्थ सोडून देतात, म्हणजे जीव मिथ्या पदार्थ आहे असें सांगतात आणि 'भेदशून्य असें ज्ञानैकरूप ब्रह्ममात्र सत्य आहे,' हा या वाक्यांचा अर्थ आहे, असें प्रतिपादितात.

**सिद्धान्ती**—नाहीं. हें खरें नाहीं. पहा "तत्त्वमसि" "सोऽहमस्मि" इत्यादि वाक्यांमधील द्वितीय पुरुषीं व प्रथम पुरुषीं क्रियापदें असें स्पष्ट सांगतात कीं तूं आणि मी (जीवदशा) यांची निवृत्ति केव्हांही होत नाहीं. 'आहेस' व 'आहें' हीं क्रियापदें 'तूं' व 'मी' हे पदार्थ सत्य आहेत असें निर्बाधरीतीनें सिद्ध करितात, आणि याप्रमाणें तुमचें खंडन होतें. कारण 'तें तूं आहेस' या वाक्यांमधील ऐकणारा जो 'तूं' आणि "हा मी आहें" या वाक्याचें तात्त्विक अनुसंधान करणारा जो "मी' हे दोन्हीही काढून घेतले तर "आहेस" या क्रियापदाचा उद्देश्यच तुम्ही नाहींसा केल्यामुळें ज्याला बोध करावयाचा तो नाहींसा होतो व "आहें" या क्रियापदाचा उद्देश्य जो अनुसंधान करणारा विशिष्ट 'मीं' तोही तुमच्या या वाक्यार्थानें नाहींसा होतो. सारांश, तुमच्या वाक्यार्थानें कोणास बोधही होत नाहीं; व चिंतन करणाराही कोणी शिलक उरत नाहीं. म्हणून तुमचीं वाक्यें निरर्थक होतात.

**पूर्वपक्षी**—प्रस्तुतच्या वादविषयक वाक्यांमध्यें तूं आणि मी यांच्या संबंधानें जरी कांहीं एक बोलावयाचें नाहीं, जीवांच्या संबंधानें कांहीं एक बोलावयाचें नाहीं. तथापि या शब्दांचे उपपद-स्वरूपानें मात्र (मी 'तूं' या स्वरूपानें मात्र) वाक्यामध्यें अस्तित्व आहे म्हणून आमच्या पक्षामध्येंही (आम्ही केलेल्या वाक्यार्थामध्येंही) तूं आणि मीं या द्वितीय आणि उत्तम म्हणजे 'प्रथम पुरुषी' शब्दांची संपद्रूपता (यांना कल्पनेनें प्राप्त झालेली ब्रह्मस्थिति) आम्ही स्वीकारून यांस उद्देश्य करितोंच कीं नाहीं? मग हे संपद्रूपी 'मी व तूं' हे उद्देश्य ठरले व 'आहें' 'आहेस' हीं क्रियापदेंही योग्य ठरलीं.

**सिद्धान्ती**—तथापि या दोन्ही शब्दांनीं आपापले अर्थ प्रकट करण्याचें सामर्थ्य टाकून दिल्यामुळें ते निरर्थक होतात. आणि म्हणून आम्हीं केलेला जो अर्थ आहे, त्याचेंच स्वीकरण करणें योग्य होतें. कारण आम्ही या वादविषयक शब्दांचें प्रवृत्तिनिमित्त (अर्थबोध करविण्याचें सामर्थ्य) नाहींसें करित नाहीं.

संपद्रूपापेक्षां वाच्यार्थ नेहमीं श्रेष्ठच असतो. सारांश, तुमच्या पक्षानें केलेला वाक्यार्थ सर्वथा अयोग्य आहे. आणि आमचाच अर्थ स्वीकृत करणें अवश्य आहे.

दुसरा पूर्वपक्षी—वादाकरितां जीं आपण वाक्यें काढलीं आहेत त्यामध्यें जो 'पुरुष' शब्द आहे तो "पुरुषोत्तमाचा" (परमेश्वराचा) बोध करून घेण्याकरितां घातला नाहीं. तसा त्या शब्दाचा उपयोग अभिप्रेत असता तर 'परमेश्वर जो, तो मी आहें' या वाक्यांत उत्तम पुरुषाचा व परमेश्वर आणि मीं यांचें जें सामानाधिकरण्य होतें त्याचा, निर्वाह मुळींच लागत नाहीं. 'उत्तम पुरुष मीं आहें.' असा अर्थ तुम्हांसही इष्ट नाहीं. म्हणून आम्ही असें सुचवितों कीं 'पुरुष' शब्दानें परिशुद्ध जीवात्मता (मुक्त जीवाची स्थिति) हा अर्थ घेतला पाहिजे. असा अर्थ केला म्हणजे मुक्तस्थितीमध्यें दृश्य व प्राप्त होणारा जो भविष्यकालीन आकार म्हणजे सर्व तऱ्हेनें शुद्ध झालेला जीवात्मा, 'तो मी आहें.' असा अन्वय करून घेतला म्हणजे वाक्याचा अन्वय उत्तम किंवा सुसंगत होतो. आणि परिशुद्ध जीवात्मा तो मीं असें योग्य सामानाधिकरण्य व उत्तम पुरुषाचा (मीचा) निर्वाह होऊन सर्व वाक्यांची संगति उत्तम लागते.

सिद्धान्ती—हाही पक्ष ठीक नाहीं, कारण; तुमचा अर्थ "हा पुरुष मी आहें" या वाक्यासंबंधानें जरी ठीक लागतो, तथापि "तें तूं आहेस" या वाक्यांतील "तें" या पदाचा अर्थ करतांना अडचण पडावयाची ती पडतेच. म्हणजे 'तें' या पदाचा अर्थ ठीक करितां येत नाहीं. "हे देवते! तूं मीं आहेस किंवा मी तूं आहें" इत्यादि वाक्यांमध्यें 'तूं' या शब्दानें श्रेष्ठ देवतेचा बोध झाला म्हणजे तुम्ही केलेला अर्थ वाक्याच्या अन्वयाला जुळत नाहीं. ("हे देवते! तो परिशुद्ध जीवात्मा तूं आहेस." असें श्रेष्ठ देवतेच्या संबंधानें कोण विचारी पुरुष विधान करील?) म्हणून आम्ही केलेल्या व्यवस्थेचा आश्रय केला पाहिजे. म्हणजे तुमची इच्छा नसली तरीही आम्ही केलेल्या योग्य अर्थाचा स्वीकार तुम्हास 'तत्त्वमसि' या वाक्यांत करावा लागतो. याच न्यायानें 'तो पुरुष मी आहें' या वाक्यांतील शब्दांची व्यवस्था आम्हीं म्हणतों त्याप्रमाणें कां करित नाहीं? आमचें म्हणणें योग्य व स्वीकार्य आहे.

दुसरा पूर्वपक्षी—"हे देवते! मीं तूं आहें?" किंवा "तूं मीं आहेस" या दोन्ही वाक्यांत तूं आणि मीं हे दोन्ही शब्द प्रत्यक्ष असल्यामुळें, हे वाक्यप्रयोग कोणत्या पुरुषीं आहेत, असें समजावयाचें? पाणीनीच्या सूत्राचा अभिप्राय तर असा आहे कीं, 'तूं' आणि 'मीं' हीं उपपदें उद्देश्याविषयींच म्हणजे ज्याच्याविषयीं कांहीं सांगावयाचें आहे, जो अस्तित्वांत असून क्रियेचा कर्ता आहे, त्याविषयीं मात्र उपयोजावीं.

सिद्धान्ती—ठीक आहे. उद्देश्याला समर्पण करणारीं 'मीं तूं' हीं उपपदें उद्देश्यदृष्टीनें ('मी' किंवा 'तूं' यांपैकीं ज्याच्या संबंधानें कांहीं सांगावयाचें

आहे, त्यास योग्य असा ) उत्तम अथवा मध्यम पुरुषी प्रयोग उत्पन्न करतील. अर्थातच ही आमची व्यवस्था पाणीनीच्या सूत्राप्रमाणेंच होते.

दुसरा पूर्वपक्षी—आतांच्या ह्या वादवाक्यांत तुम्ही केलेला निर्वाह ( समाधान, शंकानिवृत्ति ) आम्ही कबूल करूं; पण 'तें तूं आहेस' या वाक्यांत पुरुष–व्यवस्था कांहींच होत नाहीं; कारण 'तें तूं आहेस' ह्या वाक्यांत 'तें' या शब्दाचाही अवतार आहे, आणि म्हणून 'आहेस' याप्रमाणेंच 'आहे' या क्रियापदयोजनेचा प्रसंग येतो. येथेंसुद्धां तुम्हांस असें म्हणतां येणार नाहीं कीं, वाक्यांत 'तूं' हाच उद्देश्यसमर्पक शब्द आहे. म्हणजे "प्रयोगकारण 'तूं' च आहे, 'तो' नाहीं, असें म्हणतां येत नसल्यामुळें प्रयोगाचा पुरुष येथें ठरत नाहीं. "येथें कोणाला उद्देशून कांहींही सांगावयाचें नाहीं" असें 'तत्त्वमसि' या वाक्यावर भाष्य करितांना म्हटलें आहे. म्हणून 'तो तूं आहे' असा तृतीय पुरुषीं वाक्यप्रयोग करण्याचा प्रसंग अगतिकत्वानें येतो. सारांश, उद्देश्य अनिश्चित असल्यामुळें प्रयोगाचा पुरुष अनिश्चित राहतो व सर्वत्र घोंटाळा उडतो.

सिद्धान्ती—नाहीं. असा घोंटाळा करण्याचें कारण नाहीं. पहा:—'तें तूं आहेस' या वाक्यांतही 'तूं' हाच उद्देश्य आहे, आणि उद्देश्यविषयक 'त्वं (तूं)' हें पद प्रत्यक्ष असल्यामुळें या वाक्याचा प्रयोग द्वितीय पुरुषींच झाला पाहिजे. तृतीय पुरुषाला येथें अवसरच नाहीं. तुम्हीं जो भाष्याचा अवतार केला आहे. तेथेंही तुम्ही दाखविलेला विरोध प्राप्त होत नाहीं. कारण भाष्यामध्यें कसल्याही विधेयांशाचा मात्र सर्वथा निषेध केला आहे. उद्देश्य वस्तूचा निषेध भाष्यामध्यें मुळींच केला नाहीं. शिवाय, तुम्ही केलेला भाष्याचा अर्थही चुकला आहे. भाष्याचें हृद्गतच तुम्हांस कळलें नाहीं. ऐका आम्ही काय म्हणतों तें, 'येथें कोणासही उद्देशून कसलेंही विधान केलें नाहीं' असें सांगण्याचा भाष्यकारांचा उद्देशच नाहीं. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, 'तूं' या शब्दानें कोणास तरी उद्देशून बोलावयाचें आहे. पण उद्दिष्टाच्या संबंधानें कसलेंही विधान करावयाचें नाहीं. इतकाच काय तो त्यांचा अभिप्राय आहे.

पूर्वपक्षी—हें कशावरून ?

सिद्धान्ती—प्रकरणानुरोधानें प्राप्त होणाऱ्या उद्देश्याच्या संबंधानें ( कसलेंही विधान करावयाचें नाहीं ) असा निषेधाचा भाग आहे व हा निषेध उपसंहाराचें प्रतिपादन करणाऱ्या भाष्यानें मात्र केला आहे. येथील अभिप्राय स्वच्छ व स्पष्ट आहे. म्हणून तुमचा पक्ष मुळींच ग्राह्य नाहीं.

तिसरा पूर्वपक्षी—'तूं राजा आहेस' 'मी राजा आहें' इत्यादि वाक्यांत जशी 'राजाच्या स्वाधीन आपण आहों' हा अर्थ प्रकट करणारी लक्षणा सांगण्याच्या उद्देशानें आपण 'मी राजा आहें' इत्यादि वाक्यें बोलत असतों,

त्या प्रमाणेंच ' तें तूं आहेस ' ' तो मी आहें ' इत्यादि वाक्यांत जीं सामानाधिकरण्यें झालीं आहेत. व ज्यांवरून ' त्याच्या ( परमेश्वराच्या ) स्वाधीन ' तूं आहेस ' ' त्याच्याच स्वाधीन मी आहें.' असे अर्थ होतात तीं सामानाधिकरण्येंच असमंजस आहेत. ' परमेश्वराधीन मी आहें ' असें ज्ञान असतां लक्षणेनें ' मीच परमेश्वर आहें ' असें लक्षणामूलक सामानाधिकरण्य करणें हें अप्रयोजक होय.

सिद्धान्ती—हें तुमचें स्पष्टीकरणच असमंजस आहे आणि म्हणून स्वीकारण्याला योग्य नाहीं. वेदामध्यें आणि व्यवहारामध्यें देव मनुष्यादि सजीव वस्तूंचा व्यवहार चेतनयुक्त असल्यामुळें ( सर्व जीवांना ज्ञान आहे असें सर्वानुमतानें व अनुभवानें ठरलें असल्यामुळें ) जाति व गुण हे अर्थ दाखविणाऱ्या शब्दाप्रमाणेंच ' तूं ' ' मीं ' आणि ' तें ' इत्यादि उपपदांचा मुख्यार्थच घेतला पाहिजे. येथें लक्षणापर अर्थ करणें अन्याय्य आहे.* ॥ १६ ॥

---

## मंत्र सतरावा.

**एवं परावरतत्त्वविवेकं निःश्रेयससाधनभूतभक्तियोगं तन्निष्ठस्यानुसंधेयमन्त्रविस्तार इत्यादिशास्त्रैः प्रोक्षणादिभिः समिदादिकमिव परिशुद्धस्वरूपयाथात्म्यज्ञानेन संस्मृत्याऽऽत्महविः समर्पणीयमित्युक्तत्वादिहापि शरीरेन्द्रियादिभ्योऽतिरिक्तं स्वात्मानं प्रथमं विशोध्य तं ब्रह्मणि समर्प्य स्वाधिकारानुगुणमर्थयते—**

सिद्धान्ती—याप्रमाणें श्रेष्ठ आणि कनिष्ठ प्रकारच्या तत्त्वांचा विवेक, मोक्षाला साधन होणारा भक्तियोग, भक्तिनिष्ठ भक्तानें चिंतावयाच्या मंत्रांचा विस्तार, इत्यादि शास्त्रांच्या साहाय्यानें शुद्ध आणि निर्मळ आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान होतें. समंत्रक प्रोक्षण–विधि केला असतां समिदादि यज्ञीय पदार्थ शुद्ध व संस्कृत होतात, त्याप्रमाणें आपला जीवात्मा वरील ज्ञान–भक्ति–आदि शास्त्रीय साधानांनीं शुद्ध होतो. हें शुद्ध आत्म्याचें यथार्थ ज्ञान झाल्यावर, जीवाला असें स्मरण होतें

---

* येथील वादप्रतिवाद व्याकरणात्मक व वाक्यार्थनिर्णयशास्त्रात्मक आहे. या एका गोष्टीवरूनच वाक्याची छाननी पूर्वी कशी होत असे व स्वपक्षमंडनार्थ व परपक्षखंडनार्थ व्याकरणाच्या जोरावर कशी ' भवति न भवति ' होत असे, हें स्पष्ट दिसतें. ' तें तूं आहेस ' हें महावाक्य सर्वसंमत आहे. याचा अर्थ कसा करावयाचा हा प्रश्न आहे. निरनिराळें आचार्य आपल्या सिद्धान्तास अनुकूल होईल असा प्रयत्न करितात. असो; हा वाद ' रुक्ष ' असूनही मनोरंजक आहे, हें काळजीपूर्वक वाचणाऱ्यांस सहज समजेल.

कीं, 'आपल्याही आत्म्याची आहुति समर्पण करावी' असें शास्त्र आहे. हाच अर्थ मनांत आणून इंद्रियादिकांच्या पलीकडे असणाऱ्या जीवात्म्याला प्रथमतः शुद्ध करून ज्ञानयोगी भक्त त्याला ब्रह्मसमर्पण करितो आणि आपल्या अधिकारानुरूप वरील भक्त परमेश्वराची प्रार्थना करतो, अशा अर्थाचा हा मंत्र आहे.

'भोक्ता भोग्यं प्रेरितारं च मत्वा' [ श्वे० १।१२ ] इत्यादिश्रुत्यन्तरप्रसिद्धचिदचिदीश्वरतत्त्वत्रयमिहाऽपि द्रष्टव्यम्। वायुः विद्याकर्मानुगुणभगवत्संकल्पवशेन तत्र तत्र गन्तृत्वाद्वा वायुः । अनेन जीवस्याणुपरिमाणत्वं परमात्माधीनत्वं च सिध्यति । वा गतिगन्धनयोरिति धातुः। निलयरहितत्वात्। क्वचिदपि व्यवस्थितत्वाभावाच्चानिलः । अमृतम् । प्रीयमाणोऽपि देहसंताने स्वयममृतं स्वरूपतो धर्मतश्चाविनाशीत्यर्थः। 'अविनाशी वा अरेऽयमात्माऽनुच्छित्तिधर्मा' [ बृ० ४।५।१४ ] 'न विज्ञातेर्विपरिलोपो विद्यते' [ बृ० ४।३।३० ] न विद्यत उच्छित्तिर्विनाशो यस्य सोऽनुच्छित्तिर्नित्य इत्यर्थः। अनुच्छित्तिर्धर्मो यस्यासावनुच्छित्तिधर्मेति पुनर्बहुव्रीहिः। नित्यज्ञानवानिति भावः। आहुश्च यामुनमुनयः—

तदेवं चित्स्वभावस्य पुंसः स्वाभाविकी चितिः ।
नानापदार्थसंसर्गात्तत्तच्चित्तत्त्वमश्नुते ॥ [ आ०सि०पृष्ठ४८ ]

इति। तदमृतत्वम् 'अपहतपाप्मा विरजो विमृत्युः।' [ छा०८ १।५ ] इति श्रुतेः। अनिलममृतमिति पुल्लिङ्गत्वेन विवरणीयं वायुरिति पुल्लिङ्गत्वेनोपक्रमात्। अत्र विशिष्टवृत्त्या योगतो वा परमात्मविषयत्वं न शङ्कनीयम् । नश्वरदेहस्यानन्तरवचनेन तद्व्यावृत्त्या प्रत्यगात्मपरत्वस्यैव न्याय्यत्वात्। 'क्षरं प्रधानममृताक्षरं हरः क्षरात्मानावीशते देव एकः।' [श्वे०१।१०] इति श्रुतावमृतशब्दस्य जीवे प्रयोगात् । स्वभोग्यतया प्रधानं हरतीति हरो जीव इत्यर्थः । एवं प्रत्यगात्मनोऽमृतत्वमभिधाय तच्छरीरस्य मृतत्वमवश्यमित्याह—अथेदं भस्मान्तं शरीरमिति । प्रकृतादर्थादर्थान्तरविवक्षायामथशब्दः । इदं शरीरमिति विशेष्यमीश्वरशरीरव्यवच्छेदार्थम्। कर्मवश्यशरीरं भस्मान्तमित्यर्थः।

ब्रह्मादिषु प्रलीनेषु नष्टे स्थावरजङ्गमे ।
एकस्तिष्ठति सर्वात्मा स तु नारायणोऽव्ययः ॥

इत्युक्तेः । भस्मशब्दो दाहाख्यसंस्कारपरः सन्खननादेरप्युपलक्षकः। अत्राऽऽत्मशरीरयोरमृतत्वमृतत्वोक्त्या भेदः समर्थ्यते।

रसनादिसेवया शरीरस्य नित्यत्वसंदेहोऽपाक्रियते । स्वदेहवैराग्यं कार्यमिति च सूच्यते शीघ्रं मोक्षोपाये प्रवर्तितव्यमित्यादिकं द्योत्यते । एवं चिदचिद्विवेकमुक्त्वा प्रेरितारं महापुरुषं प्रणवेनोपादत्ते—ॐमिति । उक्तं च योगानुशासने । 'क्लेशकर्मविपाकाशयैः परामृष्टः पुरुषविशेष ईश्वरः । तस्य वाचकः प्रणवः' । आह च सर्वज्ञो महादेवः—

ओमित्येवं सदा विप्राः पठध्वं ध्यात केशवम् ।

इति द्रष्टव्यम् । यद्वा शरीरमात्मानं च विविच्य विविक्तमात्मानमोंकारवाच्ये परमपुरुषे समर्पयत्योमिति । प्रणवस्याऽऽत्मसमर्पणपरत्वमोमित्यात्मानं युञ्जीत । 'प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते । अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत्तन्मयो भवेत् ।' [मु० २।२।४] इत्यादिषु प्रसिद्धम् । अथ क्रतुरूपिणं विष्णुं ज्ञानयज्ञगोचरमभिमुखीकुर्वंस्तदनुग्रहं प्रार्थयते—क्रतो स्मर क्रतो ज्योतिष्टोमादिक्रत्वात्मक । अहं क्रतुरहं यज्ञ इति वचनात् । यज्ञः पञ्चमहायज्ञात्मक इत्यर्थः । स्मर स्मरणानुग्रहया बुद्ध्या विषयीकुरु ।

अहं स्मरामि मद्भक्तं नयामि परमां गतिम् ।

[इति] भगवद्वचनम् । अत्र स्मरामि नयामीति पदद्वयस्य क्रतो स्मराग्ने नयेति प्रार्थनाद्वयापेक्षया प्रतिवचनत्वावगमात् । कृतं स्मर यत्कृतं यत्किंचिदानुकूल्यमनुसंधाय कृतज्ञस्त्वं मां रक्षेति वा । एतावदन्तं त्वत्कृत्यतयाऽऽनुकूल्यं प्रतिसंधाय त्वमेव शेषपूरणं कुर्विति भावः । उक्तार्थ आदरातिशयात्क्रतो स्मर कृतं स्मरेत्यावृत्तिः ॥ १७ ॥

" भोग—भोक्ता जीव, भोक्त्याचे भोग्य विषय हें जगत्, आणि उभयतांच्याही व्यापाराला प्रेरणा करणारा परमेश्वर, हें सर्व परमार्थतः भिन्नच आहे असें मानून " ( श्वेता० १।१२ ) इत्यादि अन्य श्रुतींमध्यें प्रसिद्ध असलेलें चित्, अचित् आणि ईश्वर हें तत्त्वत्रय ( हीं तीन तत्त्वें ) येथेंही सांगितलें आहे. पक्षा कीं, वायु म्हणजे विद्या आणि कर्म त्यांस अनुगुण असणारी ( ज्ञान आणि कर्म या द्वयीवरून ठरणारी ) किंवा भगवत्—संकल्पाला वश होऊन ( भगवंताच्या तंत्रानें चालणारी ), वायुदेवताही जिकडे तिकडे जाते, जसा भगवत्संकल्प असेल, तसतसा व्यापार करिते; म्हणून त्या देवतेला वायु म्हणतात. या एका शब्दाच्या अर्थानेंच जीव हा अणुपरिमाण आहे ( अणु एवढा आहे ) व परमेश्वराधीन आहे असें ठरतें.

शिष्य—तें कसें ?

गुरु०—येथें 'वायु' शब्दानें 'जीवात्मा' हा अर्थ समजावयाचा. वायु सर्व पदार्थांच्या आंत बाहेर असूं शकतो; तसाच जीवात्मा आहे व तो वाटेल तेवढ्या लहान वस्तुरूपी शरीरांत राहतो, म्हणून तो अणुपरिमाण झाला व भगवानाच्या इच्छेनुसार शरीर धारण करितो, म्हणून पराधीन झाला. समजलें ?

शिष्य—'गुरुजी ! वा' याचा अर्थ गतीप्रमाणेंच गंध वाहणारा असा आहे. येथेंही हे दोन अर्थ आपण घेतले आहेतना ?

सिद्धान्ती—होय. वायुप्रमाणें गंधही सर्वगामीच आहे. निलय म्हणजे घर किंवा राहण्याचें स्थान. या घराचा अभाव आहे म्हणून, कायमचें राहण्याचें ठिकाणच नाहीं म्हणून, वायूला अनिल अशी संज्ञा देतात. जीवात्म्याची हीच स्थिति आहे. याला तरी कायमचें बिऱ्हाड कोठें आहे ? भगवत्संकल्पानुसार किंवा संचितानुसार हाही सदैव भ्रमण करीत असतो. वायु स्वरूपतः सुखकर असतो तसाच जीवात्माही स्वरूपानें सुखकर आहे हें आपल्याला देहापासून अथवा पुत्रापासून होणाऱ्या आनंदानें स्पष्ट समजतें. वायूप्रमाणेंच जीवात्मा हा धर्मतः अविनाशी आहे म्हणजे विश्वांत वायु नाहीं व जीव नाहीं अशी स्थितिच नसते, म्हणून वायूला व जीवात्म्याला 'अमृत' असें येथें म्हटलें आहे. "अरे, हा आत्मा अविनाशी आहे. आणि याच्या गुणधर्मांचा उच्छेद केव्हांही होत नाहीं." (बृहदा० ४।५।१४) "विज्ञानाचा लोप केव्हांही होत नाहीं." (बृ० ४।३।३०) ह्या श्रुति आत्मा अविनाशी आहे, हें अधिकारपूर्वक वाणीनें सांगतात. असो; ज्याचा केव्हांही विनाश होत नाहीं, जो नित्य आहे, विनाश हा ज्याचा धर्मच नव्हे, त्याला अविनाशी असें श्रुति म्हणतात. तसेंच त्याचें ज्ञानही नित्य आहे म्हणजे जीवात्मा नित्य ज्ञानी आहे. यामुनाचार्य म्हणतात— "ज्ञान हाच मुख्य धर्म आहे, स्वभावसिद्ध धर्म आहे; पुरुषाची नैसर्गिक स्थिति म्हटली म्हणजे त्याचें ज्ञान होय. अनेक पदार्थांच्या संसर्गानें जीवाच्या चैतन्याला त्या त्या पदार्थांच्या अनुरूप ज्ञानप्राप्ति होते." (आत्मसिद्धि पृष्ठ ४८.) हें वर्णन जीवात्म्याच्या अमृतत्वासंबंधाचें झालें.

"हा आत्मा पापविमुक्त, निर्मळ आणि मृत्यु-शून्य आहे" (छां० ८।१।५) या श्रुतीवरून जीवात्मा स्वरूपतः शुद्ध आहे असें सिद्ध होतें.

शिष्य—भगवन् ! अनिल, अमृत, इत्यादि शब्द नपुंसकलिंगी आहेत ना ? मग येथेंच हे पुल्लिंगी समजावयाचें कीं काय ?

सिद्धान्ती—होय. कारण वायु या पुल्लिंगी शब्दानें वाक्याला आरंभ झाला आहे; आणि अनिल आणि अमृत हे दोन्ही शब्द वायूची विशेषणें आहेत.

पूर्वपक्षी—हें ठीक आहे; पण, वायु हा 'अमर' किंवा 'अविनाशी' आहे असें स्वाभाविक अर्थानें प्रसिद्ध नाहीं म्हणून, 'जीवात्मविषयपर' असा जो

वायु शब्दाचा अर्थ तुम्ही करीत आहांत तो ठीक नाहीं, असें मला वाटतें. कांहीं विशेषवृत्तीनें किंवा शब्दव्युत्पत्तीनें 'वायु' शब्दाचा परमात्मपर अर्थ करितां येईल. तेव्हां येथें 'वायु' शब्द जीवात्मपर न लावितां परमात्मपर लावावा.

सिद्धान्ती—अगदीं अयोग्य! हें होणें शक्यच नाहीं. कारण; 'अमृत' इत्यादि शब्दांच्या पुढें नश्वर देहाचा साक्षात् व लागलाच उल्लेख आहे; अर्थातच या योगानें परमात्म्याची व्यावृत्ति होत आहे. नश्वरदेहाच्या उल्लेखानें परमात्मा वेगळाच काढला गेला आहे. परमात्म्याला नश्वर शरीर नाहीं हें सिद्ध आहे. असो; प्रत्यगात्म्याशिवाय दुसरा अविनाशी पदार्थच नाहीं, म्हणून वायु आदि शब्दांचा जीवात्मपरच अर्थ घेतला पाहिजे. "प्रधान" क्षर आहे (विनाशी आहे) हर (शंकरादिदेव–जीवात्मे) अमर आणि अक्षर आहेत; क्षर आणि अक्षर या दोघांचाही स्वामी एकच देव आहे.' ( श्वे० १।१० ) या श्रुतीमध्यें जीवाला अमृत शब्दात्मक विशेषण उपयोजिलें आहे. 'प्रधान ( प्रकृति ) भोग्य म्हणजे भोगाचा विषय आहे. आणि याचें हरण 'हर' म्हणजे जीव करितो. अर्थातच प्रत्यगात्मा अमर आहे. वरील श्रुतीवरून त्याचें शरीर मर्त्य म्हणजे विनाशी असलें पाहिजे, हें निश्चित होतें. हा अभिप्राय मनांत आणून भस्म होणारें शरीर' असे शब्द या प्रार्थनारूपी मंत्रामध्यें भक्तानें योजिले आहेत.

शिष्य—भगवन्! मंत्रामध्यें जो 'अथ' शब्द आहे तो असें दाखवितो का कीं प्रस्तुत अर्थाचा विषय संपून निराळा दुसरा विषय सांगावयाचा आहे?

सिद्धान्ती—होय. आत्मपर प्रवचन संपून येथून शरीरपर विवेचनाला प्रारंभ झाला असें 'अथ' दाखवितो. 'हें शरीर' असे शब्द आहेत म्हणून विशेष शरीराचा बोध करून तें विनाशी शरीर अक्षर–शरीरी ईश्वराचें नव्हे, असें सांगण्याकरितां 'हें' हा शब्द ठेविला आहे. तात्पर्य, कर्माला वश करणारें शरीर हा अर्थ येथें इष्ट आहे. ही गोष्ट सर्व प्रसिद्धच आहे कीं, आपलें कर्मजन्य शरीर भस्मीभूत होतें. म्हणून जीवांचें शरीर असा अर्थ इष्ट आहे. म्हटलें आहे:—

'ब्रह्मदेवादि सर्व स्थावर–जंगम पदार्थ प्रलयकालीं नष्ट झाले तरी सर्वांचा आत्मा जो अव्यय नारायण तो एकीएक मात्र नित्यत्वानें स्थित असतो.'

येथें भस्म शब्द आहे त्याचा अर्थ नुसता जाळून टाकणारा संस्कार असाच घ्यावयाचा नाहीं, तर पुरून टाकणारा, ( नाहींसें करणारा संस्कार ) अशा अर्थपरही भस्म शब्द आहे. असो; येथें जीवात्मा अमर आहे, पण त्याचें शरीर मर्त्य आहे, हें स्पष्ट सांगितलें आहे; म्हणून उभयतांमध्यें भेद आहे, असें निश्चित होतें. तसेंच, अन्नपानादिकांचें सेवन शरीर–रक्षणासाठीं नित्य करावें लागतें हें लोकप्रसिद्ध आहे. यावरून 'शरीर नित्य आहे कीं काय?' या शंकेचेंही येथें आपोआप निवारण होतें.

शिष्य---तसेंच हें भस्मीभूत होणारें शरीर अनित्य आहे म्हणून आपण त्याच्या संबंधानें विरक्त असावें, असाही विधि सुचविला जातो आणि तें अनित्य आहे म्हणून आपण जीवांनीं मोक्षाविषयीं शीघ्र उपाय तत्परतेनें केले पाहिजेत, इत्यादि अभिप्रायही स्पष्ट होतात.

सिद्धान्ती—वाहवा ! श्रुतींस जो इष्ट अभिप्राय आहे तोच तूं सांगितलास ! असो; याप्रमाणें ज्ञानी व नित्य जीव आणि अज्ञानी व अनित्य शरीर यांच्या-मधील भेद स्पष्ट सांगून या उभयतांचाही प्रेरक व नियंता जो महापुरुष त्याचा अवतार ॐ या प्रणवाक्षरानें केला आहे. योग–शास्त्रामध्यें सांगितलें आहे:—" क्लेश, कर्म, कर्मफल, शरीर, इत्यादि ज्याला मुळींच स्पर्श करूं शकत नाहींत तो पुरुषोत्तम ईश्वर होय. ॐ हा त्याचा वाचक शब्द आहे." सर्वज्ञ महादेवही म्हणतात:—

" विप्रहो ! सदैव ॐकाराचा पाठ करित जा आणि केशवाचें ध्यान करित जा. "

शिष्य—भगवन् ! शरीर आणि आत्मा यांचा विवेक करून शरीर–भिन्न जो आत्मा, तो स्वतः आपणाला ॐकार शब्दानें ओळखितां येणाऱ्या परम पुरुषाचे चरणीं 'ॐम्' असा उच्चार करून समर्पण करितो, असा अर्थ होणार नाहीं काय ?

सिद्धान्ती—उत्तम ! प्रणववाच्य महापुरुषाला जीवात्मसमर्पण करून घेण्याची योग्यताच आहे. असें मनांत ठेवून त्याच्याशीं आपल्या आत्म्याचा 'ॐम्' या मंत्रानें योग करावा. पहा:–" ॐकार हें धनुष्य आहे, आपला जीवात्मा हा एक बाण आहे आणि ब्रह्म हें लक्ष्य ( ज्याच्यावर नेम धरावयाचा तें ) आहे. म्हणून प्रत्येक पुरुषानें सावधपणानें त्या ब्रह्माचा वेध करावा. बाण जसा लक्ष्याप्रत जाऊन तेथें राहतो, तशी आपल्यास (जीवात्म्यास) ब्रह्ममय स्थिति प्राप्त होईल " ( मुं० २।२।४ ) इत्यादि श्रुतीमध्यें हा सिद्धान्त प्रसिद्धच आहे.

असो, आतां यज्ञरूपी जो विष्णु तो ज्ञानयज्ञाला मात्र गोचर आहे, हें ध्यानांत आणून व ह्या विष्णूला अभिमुख होऊन ज्ञानी भक्त त्याच्या अनुग्रहासाठीं प्रार्थना करितो; ' हे यज्ञस्वरूपा, ज्योतिष्टोमादियज्ञात्मका !! '

शिष्य—'मी क्रतु आहें' 'मी यज्ञ आहें' अशीं वचनें भगवद्गीतेंत आहेत; यांवरूनच 'क्रतु' शब्दाचा अर्थ 'विष्णु' असा होतो, हें सिद्ध होतें. 'यज्ञ' या शब्दानें पंचमहायज्ञात्मक विष्णु आहे, असेंही ठरतें. होयना ?

सिद्धान्ती—बरोबर ! या यज्ञात्मक विष्णूनें आपल्यावर स्मरणाचा अनु-ग्रह करून त्या स्मरणाचा विषय आपण असावें, आपलें स्मरण यज्ञात्मक

श्रीविष्णूस व्हावें, अशी या मंत्रामध्यें भक्ताची प्रार्थना आहे. भगवानानेंही म्हटलें आहे:—

" मला माझ्या भक्तांचें स्मरण असतें आणि मी त्यांस परमगतीला नेतों, मोक्ष देतों. "

येथें ' स्मरण करणें ' आणि ' नेणें ' हे दोन क्रियाशब्द आहेत म्हणून ' हे विष्णो ! माझें स्मरण कर, ' ' हे अग्ने ! मला घेऊन जा, ' इत्यादि ज्या दोन प्रार्थना आहेत त्यांना अनुलक्षितात. म्हणजे 'ह्या दोन प्रार्थना लक्षांत ठेवून मी माझ्या भक्तांचें स्मरण करितों आणि त्यांस मोक्षपुरीमध्यें नेतों' असा भगवानानीं आशीर्वाद दिला आहे. तसेंच, येथें दुसराही एक सुंदर अर्थ होतो तो असा:— भक्तानें येथें देवाची प्रार्थना केली आहे कीं "जें काय मीं थोडें बहुत सत्कर्म केलें असेल तें ध्यानांत ठेवून हे कृतज्ञ ( केलेलें जाणणाऱ्या ) देवा! तूं माझें संरक्षण कर. आम्हीं जें काय सत्कर्म करितों तें तुला ठाऊकच आहे. म्हणून ह्या कालपर्यंत तुला अर्पण केलेलीं आमचीं सत्कृत्यें ध्यानांत ठेवून जें काय आणखी हवें असेल तें उणें पुरें करून घे आणि आम्हांस मोक्षस्थानाला देवयान मार्गानें ने.'

शिष्य—या मंत्रांत तीन वेळ ' देवा ! स्मरण कर ' अशी पुनरावृत्ति केली आहे, ती केवळ अतिशय आदर दाखविण्याकरितां केली आहे असेंच ना ?

सिद्धान्ती—होय. आतां अठराव्या मंत्राचा, या उपनिषदांतील शेवटल्या मंत्राचा, अर्थ समजून घे. ॥ १७ ॥

---

## मंत्र अठरावा.

**बृहदारण्यके पञ्चमेऽध्याये यदा वै पुरुषोऽस्माल्लोकात्प्रैति स वायुमागच्छति [ १०।१ ] इत्यादिनाऽर्चिरादिकं पन्थानमुपदिश्य पश्चादध्यायावसाने हिरण्मयेन पात्रेणेत्याद्याश्चत्वारो मन्त्राः क्रमेण पठिताः। अग्नेऽग्निशरीरक 'यस्याग्निः शरीरम्'। इति श्रुतेः। यद्वा साक्षादप्यविरोधं जैमिनिः [ ब्र० सू० १।२।२८ ] अग्रं नयतीत्यग्निः अग्रनयनादिगुणयुक्त नय प्रवर्तयेत्यर्थः। सुपथा शोभनेन मार्गेणार्चिरादिना।**

**अर्चिरहःसितपक्षानुदगयनाब्दौ च मारुतार्केन्दून्।**
**अपि वैद्युतवरुणेन्द्रप्रजापतीनातिवाहिकानाहुः ॥[वरदमिश्रः] ॥**

**इत्यभियुक्तसंगृहीतेन मार्गेणेति भावः। राये धनाय ब्रह्मणः प्राप्यत्वाद्ब्रह्मैव सुस्थिरमनन्तधनं तस्मै हिरण्मयपुरुषाय त्वत्प्रासय**

इति भावः। अस्माननन्यप्रयोजनान्। अनन्यगतींश्चेत्यर्थः। न केवलं मामपि त्वनुबन्धिजनानपीति बहुवचनस्याभिप्रायः। देव मम बुद्धौ द्योतमान। 'तं ह देवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये।' [श्वे० ६।१८] इति श्रुतेः। विश्वानि वयुनानि। चतुर्विधपुरुषार्थोपायान्यथावद्विद्वांस्त्वमस्मान्नेतुमर्हसीति भावः। 'यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै, [श्वे० ६।१८] इति श्रुतेरिति भावः। मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्य इति मन्त्रगतं मुमुक्षुपदं विवृण्वन्नाह—युयोध्यस्मज्जुहुराणमेन इति। हुर्छा कौटिल्ये। जुहुराणं कुटिलं बन्धात्मकमित्यर्थः। एनः। अकृत्यकरणकृत्याकरणादिरूपं त्वदुपासनोत्पत्तिप्रतिबन्धमित्यर्थः। त्वत्प्राप्तिप्रतिबन्धकमिति वा। एन इति जात्यभिप्रायकम्। अस्मदस्मत्तः। युयोधि पृथक्कुरु। एतावदेव याचे त्वां जुहुराणमेनोऽस्मत्तः प्रथमं वियोजयेति तत्पश्चाद्यथामनोरथं विनाशय पुरुषान्तरे संक्रामय वा न तत्रास्माकं निर्बन्ध इति भावः। भूयिष्ठाम्। अनन्यगतित्वेनाऽऽवृत्तितो भूयसीम्। नमउक्तिं। ते। आप्तकामतया निरुपाधिकस्वामितया च नमउक्तिम्। निरपेक्षाय ते विधेम विदध्महे। हेऽग्ने देव विश्वानि वयुनानि विद्वांस्त्वं जुहुराणमेनोऽस्मत्तो युयोधि सुपथाऽस्मान्राये नय वयं ते भूयिष्ठां नमउक्तिं विधेमेत्यन्वयः। नित्याञ्जलिपुटा हृष्टा नम इत्येवंवादिनो भवाम इति भावः॥ १८॥

सिद्धान्ती—बृहदारण्यकाच्या पांचव्या अध्यायामध्यें "ज्या वेळेला जीवात्मा ह्या लोक सोडून जातो, तेव्हां तो वायु लोकांमध्यें येतो." (१०।१) इत्यादि अर्थपूर्ण मंत्रानें अर्चिरादि मार्ग (देवयानाचा मार्ग) सांगितला आहे. नंतर अध्यायाच्या शेवटीं "हिरण्मय पात्रानें" इत्यादि चार मंत्र क्रमानें पठित केले आहेत. या मंत्रांचा क्रम लक्षांत ठेवून, हा मंत्र अवतीर्ण केला आहे. असो; 'ज्याचें शरीर अग्निमय आहे, तो अग्नि होय,' (बृह० ३।७।५) अशी श्रुति आहे. श्रीमद्व्यासांनीं आपल्या ब्रह्मसूत्रांमध्यें (१।२।२८) असें म्हटलें आहे कीं, "अग्नीचा साक्षात् उल्लेख आहे म्हणून विरोध नाहीं असें जैमिनि आचार्य म्हणतात."

शिष्य—या मंत्रांत 'पुढें नेतो तो अग्नि' असाही अर्थ होईल. असो; 'पुढें नेणें इत्यादि कर्म करण्यास योग्य जो तूं अग्नि, तो तूं मला चांगल्या, सुकर आणि मंगलकारक देवयान मार्गानें ने' अशी अग्नीची प्रार्थना या मंत्रांत आहे. होयना?

सिद्धान्ती—होय. "अग्नि-ज्वाला, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायण, वर्ष, वायु, सूर्य, चंद्र, तसेंच विद्युत्, वरुण, इंद्र, प्रजापति, या सर्वांसही अतिवाहक म्हणजे सूक्ष्म शरीराला नेणारे अशी संज्ञा आहे." ( वरदामिश्र )

असो; "ह्या सुखकर व सर्वशिष्टमान्य अशा 'देवयान मार्गानें' मला घेऊन जा. मला उत्तम प्रकारचे चिरंजीव, अनंत इत्यादि सद्गुणयुक्त धन म्हणजे ब्रह्मप्राप्ति करून दे. ( मला हिरण्मय पुरुषाकडे घेऊन जा. ) तसेंच माझ्या बुद्धीमध्यें प्रकाश पाडणाऱ्या ज्या वृत्ति आहेत, त्यांस व माझे इष्टमित्र त्यांसही घेऊन जा. त्यांना ब्रह्माशिवाय दुसरी कोणतीही गोष्ट इष्ट नाहीं. तसेंच तुझ्याशिवाय त्यांना दुसऱ्या कोणाचाही आश्रय नाहीं. परमेश्वरा! तूं माझ्या बुद्धीमध्यें प्रकाश पाडून व तेथें स्वप्रकाशानें आहेस." अशी ही प्रार्थना आहे.

शिष्य—कशावरून देव बुद्धीमध्यें प्रकाशतो ?

सिद्धान्ती—"आत्मबुद्धीमध्यें प्रकाश पावणारा आणि बुद्धीला प्रकाशित करणारा जो परमात्मा आहे. त्याला मी मुमुक्षु शरण जातों." ( श्वे० ६।१८ ) अशी श्रुतिच आहेना? असो; ही प्रार्थना पुढें ऐकः—' हे अग्ने! चारी प्रकारच्या पुरुषार्थाला कोणतीं साधनें आहेत तीं तुला उत्तम प्रकारें ठाऊक आहेत. ' 'कशावरून' म्हणशील तर "जो ज्ञानरूपी अनन्त वेदांस प्रकट करितो, त्या धर्मात्म्याला' ( श्वे० ६।१९ ) अशी श्रुति आहे. आतां श्वेताश्वतर श्रुतीमध्यें 'मुमुक्षु मी तुला शरण जातों.' या मंत्रांतील मुमुक्षु शब्दाचें येथें ही प्रार्थनाश्रुति विवरण करीत आहे. 'हे देवा! आम्ही विहित कर्में केलीं नसतील व निषिद्ध कर्में हीं केलीं असतील, म्हणून पापाचाही पुष्कळच संचय आला असेल. हें पाप तुझी उपासना आम्हांस करूं देणार नाहीं. किंवा तुझ्या प्राप्तीला तरी हें आमचें पाप अडचण उत्पन्न करील; म्हणून हे देवा! आम्ही जीं काय अनंत पापें केलीं असतील, तीं आमच्या मधून काढून टाक. मग पुढें, जसें तुला वाटेल त्याप्रमाणें त्यांचा नाश कर किंवा अन्य पुरुषामध्यें त्यांचा प्रवेश करीव. आम्हांला त्या संबंधानें कांहीं एक वाईट वाटणार नाहीं. किंवा आम्ही तुझ्या आड येणार नाहीं व आग्रहही करणार नाहीं. आमची मनःकामना पूर्ण व्हावी म्हणून आम्ही तुला अनन्य शरण येतों आणि तुला अनेकवार साष्टांग नमस्कार घालितों. तूं आमचा आप्त ( हित करणारा ) आहेस आणि आमच्या सदिच्छा पूर्ण करणारा आहेस. तसेंच, तूं आमचा

पूर्ण स्वामीही आहेस आणि आमच्यापासून कांहीं मिळावें अशी तुला इच्छाही नाहीं.”

शिष्य—महाराज! या मंत्राचा अन्वय कसा? मला तर सर्व घोंटाळा दिसतो.

सिद्धान्ती—ऐक. ‘हे अग्ने! हे देवा! सर्व मोक्षसाधनें तुला ठाऊक आहेत. तूं आमच्या कुटिल पापांस आम्हांपासून वेगळें कर, आम्हांस चांगल्या मार्गानें ब्रह्माकडे घेऊन जा, आम्ही तुला पुष्कळ वेळ नमस्कार करितों, हा अन्वय आहे.

असो, ‘आम्ही हात जोडून आनंदानें तुला नमस्कार करितों, असें म्हणणारे तुझे दास होऊं,’ हें मुख्य तात्पर्य आहे ॥ १८ ॥

---

एवमस्मिन्नध्याय आदितो मन्त्राष्टकस्य तु परतत्त्वं ततो मन्त्राष्टकस्य परमपुरुषविषयकं भक्तियोगरूपं साक्षात्साधनमवशिष्टमन्त्रद्विकस्य सर्वफलसाधनप्रपादनं प्रधानप्रतिपाद्यम्। एवं च भगवद्गीताध्यायषट्कं प्रथमं प्रथमाष्टकस्योपबृंहणं द्वितीयषट्कमुपरितनाष्टकस्य चरमश्लोकस्य पूर्वार्धं वायुरनिलममृतमन्त्रोक्तानुष्ठानविधायकमुत्तरार्धं तु युयोध्यस्मज्जुहुराणमेन इति प्रार्थयमानानां प्रार्थनापूरणसंकल्पपूर्वकं शोकप्रतिक्षेपकं चरमश्लोकोऽप्यस्य मन्त्रद्विकस्योपबृंहणमिति बोध्यम्।

इति रामानुजमतानुयायिनारायणकृतप्रकाशिका-
समेतेशावस्योपनिषत्।

## उपनिषत्तात्पर्य.

सिद्धान्ती—याप्रमाणें या अध्यायांत पहिले आठ मंत्र परमात्मतत्त्वविषयक आहेत. श्रेष्ठ तत्त्वांचा त्यांत उपदेश केला आहे. दुसऱ्या आठ मंत्रांमध्यें पुरुषोत्तमाच्या भक्तियोगाचें साक्षात् साधन सांगितलें आहे. शेवटचे दोन मंत्र सर्व फलें व साधनें सांगणाऱ्या मुख्य विषयांचें प्रधानतः प्रतिपादन करितात. तसेंच जीव, जगत् आणि परमात्मा हीं तीन निरनिराळीं तत्त्वेंही येथें

सांगितलीं आहेत. असो, भगवद्गीतेच्या पहिल्या सहा अध्यायांतील विषय या उपनिषदाच्या पहिल्या आठ श्लोकांचें स्पष्टीकरण करितात. द्वितीय षट्कांतील विषय पुढील मंत्राष्टकाचें विवरण करितात. शेवटच्या ( १८ व्या ) श्लोकाचा पूर्वार्ध उपान्त्य ( १७ व्या ) मंत्रामध्यें सांगितलेल्या अनुष्ठानाचा विधि विहित करितो. आणि याचाच उत्तरार्ध देवाची प्रार्थना करणाऱ्या भक्तांची शोकादि–प्रतिबंधक प्रार्थना सार्थ व्हावी हा ईश्वरी संकल्प आहे, असें दाखवितो. सारांश, शेवटचा श्लोक शेवटच्या मंत्रद्वयाचें स्पष्टीकरण करितो.

रामानुज–मताचे अनुयायी नारायण यांनीं केलेली ईशावास्योपनिषदावरील ‘ प्रकाशिका ’ समाप्त झाली.



# श्रीमन्माध्वभाष्यम् ।

भा०—श्रीमद्धनुमद्भीममध्वान्तर्गतरामकृष्णवेदव्यासात्मक-लक्ष्मीहयग्रीवाय नमः ॥

## जयतीर्थ–विवरणम् ।

**ज० वि०—श्रीमद्धनुमद्भीममध्वान्तर्गतरामकृष्णवेदव्यासात्मक-लक्ष्मीहयग्रीवाय नमः । श्रीमच्छ्रीवदनांभोजगतसौंदर्यसौरभम् । लिहद्भ्यां लोचनालिभ्यां भगवान्पातु नो हरिः ॥**

श्रीमद्हनुमद्भीम—मध्वान्तर्गत—रामकृष्ण—वेदव्यासात्मक—लक्ष्मी—हयग्रीवाला नमस्कार असो.

श्रीमती लक्ष्मीच्या वदनकमलापासून सौंदर्यरूपी सुवासाचा आस्वाद घेणान्या नेत्रभृंगांनीं भगवान् श्रीहरि आमचें संरक्षण करो !

सिद्धान्ती—येथें लक्ष्मी म्हणजे विषय, त्यांचा स्वामी श्री भगवान् हरि व आम्ही म्हणजे जीव ह्या सत्यात्मक त्रयीचा उल्लेख श्रीमज्जयतीर्थांनीं समजूनच केला आहे. असो; पुढें ऐका:—

**ज० वि०—काण्वीं मंत्रोपनिषदं यथावद्व्याकरिष्यन् भगवानाचार्यः चिकीर्षिताविघ्नपरिसमाप्त्यादिप्रयोजने तत्प्रतिपाद्यदेवतास्तुतिनती प्रथमं निबध्नाति—**

कण्व शाखेंतील ईशोपनिषदाचें यथार्थ स्पष्टीकरण करण्याची इच्छा धारण करून भगवान् श्री मध्वाचार्य इष्ट गोष्टींच्या सिद्धीसाठीं व अविघ्नांच्या प्राप्ती-साठीं या उपनिषदांत ज्या देवतेचें प्रतिपादन करावयाचें आहे, तिची स्तुति करून तिला नमस्कार करितात. हेंच मंगलाचरण होय. हें नमन असें:—

शिष्य—मंगलाचरणाचा हेतु निर्विघ्नतेनें ग्रंथसमाप्ति व्हावी हा असतो. ठीक आहे. चालूंद्या आपलें प्रवचन.

भा०—नित्यानित्यजगद्धात्रे नित्याय ज्ञानमूर्तये ।
पूर्णानंदाय हरये सर्वयज्ञभुजे नमः ॥

**ज० वि०—नित्येति । सर्वयज्ञभुज इति । सर्वयज्ञभोक्तृत्वाद्यज्ञनाम्न इत्यर्थः । यथोक्तं सुखरूपस्य भोक्तृत्वादिति । अपूर्णसुखाः सुखार्थं भोगान् भुंजते, किं तथाहरिरपि नेत्याह–पूर्णानंदायेति । भोगस्तु लीलयेति भावः । पूर्णानंदत्वं हरेः कुत इत्यत आह–जग-**

७—४८४—१२-९-११,

द्धात्र इति । तदुक्तं कोह्येवान्यादित्यादि । धातृत्वं चानित्यानामेव न तु नित्यानां अनाधेयातिशयत्वादिति नाशंकनीयमिति भावेनाह-नित्यानित्येति । नित्यं नित्यात्मना यत इत्यादेः । अशरीरस्य न जगद्धातृत्वं शरीरित्वे मरणं स्यादित्यत आह-ज्ञानमूर्तये नित्यायेति । मूर्तिमत्त्वाज्जगद्धातृत्वोपपत्तिः । तस्याश्च मूर्तेर्ज्ञानाद्यात्मकत्वेन नित्यत्वोपपत्तिरिति । वक्ष्यते चैतत्सर्वं 'याथातथ्यतोर्थान् व्यदधात् । वायुरनिलममृतम् । यत्ते रूपम् । कल्याणतमम् । स पर्यगाच्छुक्रम् । तस्मिन्नपो मातरिश्वा दधाती'त्यादि । देवताप्रणामानंतरं गुरुप्रणामः कर्तव्य इति शिष्यान् ग्राहयितुंगुरुत्वेनापि हरिं प्रणमति—

सिद्धान्ती–सर्व यज्ञांचा भोक्ता श्रीहरि आहे म्हणून त्याला यज्ञ असें नांव आहे. हा सुखरूपाचा नित्य भोक्ता आहे.

शिष्य—भगवन्! ज्यांचे सुखाला पूर्णता नसते, ते लोक सुखासाठीं विषयभोगांचा स्वीकार करितात. याप्रमाणेंच हरीचीही व्यवस्था आहे कीं काय?

सिद्धान्ती—नाहीं. कारण तो पूर्णानंद आहे. तो स्वरूपानेंच आनंदपूर्ण आहे. तथापि तो भोगांचा (विषयांचा, यज्ञांचा, उपभोग घेतो. ही त्याची केवळ स्वभावसिद्ध लीला आहे–समजलास?

शिष्य—हरि हा आनंदपूर्ण आहे हें कशावरून?

सिद्धान्ती—कारण आचार्यांनीं 'जगताला आधार देणारा तो आहे,' असें म्हटलें आहे. श्रुतीमध्येंही विचारिलें आहे कीं, 'हरि नसेल तर जगताचीं व्यापारकर्में करण्यास दुसरा कोण समर्थ आहे?' तात्पर्य, हरीशिवाय दुसरा कोणीहि स्वतंत्रच नाहीं.

शिष्य—जगतामध्यें नित्य आणि अनित्य अशा दोन प्रकारच्या वस्तु आहेत, म्हणून हरीकडे अनित्य वस्तूला आधार देणें हा कार्यभाग द्यावा; पण नित्य वस्तूंच्या संबंधानें त्याच्याकडे त्या नित्य वस्तूंची व्यवस्था नसावी. कारण त्या स्वतःच अत्यंत स्वतंत्र, निर्मर्याद आणि उत्पत्तिविनाशशून्य आहेत.

सिद्धान्ती—या शंकेचें निवारण करण्यासाठींच आचार्यांनीं नित्यानित्य असें पद घातलें आहे. नित्य वस्तूंची व्यवस्था ह्या पूर्णानंद परमेश्वराकडे आहे. ही व्यवस्था नसती तर याचें ऐश्वर्य अपवादरहित झालें नसतें अथवा त्याला पूर्णानंदही झाला नसता. तो पूर्णानंदी आहे आणि त्याचें ऐश्वर्य निःसीम आहे हें तर ठरलेलेंच आहे. म्हणून तो ह्या आपल्यापासून निराळ्या असणाऱ्या नित्य वस्तूंच्या स्वाधीन नसतो, इतकेंच नव्हे, तर तो त्यांचा स्वामी व नियंता असतो, कारण 'हें त्यांचें नित्यत्वही त्यास नित्य हरीपासून मिळालेलें असतें'

असें वचन आहे. आतां नित्य असें जें पद घातलें आहे त्याचा अर्थ तो स्वरूपानें नित्य आहे असें समजावें. सारांश, हा हरि नित्य व अनित्य वस्तूंचा ज्ञाता व नियामक आहे.

शिष्य—हरि नित्य आहे म्हणून त्याला अनित्य शरीराची उपाधि नसली पाहिजे. तसेंच, जो शरीरशून्य आहे त्याला जगताचें व तेथील नित्यानित्य वस्तूंचें नियमन करितां येणारच नाहीं. बरें; तो शरीरी आहे असें म्हटलें तर तो मृत्यूच्या स्वाधीन होईल !

सिद्धान्ती—या तुझ्या शंका व्यर्थ आहेत. कारण आचार्यांनीं मूळ भाष्यांतच तो ज्ञानमूर्ति आहे व नित्य आहे असें बुद्धिपूर्वकच म्हटलें आहे. तो मूर्तिमान् आहे. म्हणून जगाची व्यवस्था त्याला करितां येते हें ठीकच आहे आणि त्याची मूर्ति ज्ञानादि अशरीरी वस्तूंनीं सिद्ध झाली आहे; म्हणून या त्याच्या ( हरीच्या ) ज्ञान-शरीराला मरणशून्य नित्यत्व असतें, हेंही न्यायास अनुसरूनच आहे. हा सर्व विषय पुढील सोळा, सतरा, इत्यादि सूत्रांचें व्याख्यान करितांना स्पष्ट होणार आहे.

याप्रमाणें देवतेला नमस्कार करून लागलाच गुरूलाही नमस्कार करावा, हें शिष्यांस समजावून देण्यासाठीं गुरुस्वरूपानें हरीला श्रीमध्वाचार्य नमस्कार करितात. तो असाः—

**भा०—यस्माद्ब्रह्मेंद्ररुद्रादिदेवतानां श्रियोऽपि च ।**
**ज्ञानस्फूर्तिः सदा तस्मै हरये गुरवे नमः ॥**

ब्रह्मादि देवतांस व लक्ष्मीसही ज्यापासून ज्ञान-स्फूर्ति होते; त्या गुरुरूपी हरीला मी नमस्कार करितों.

शिष्य—भगवन् ! या भाष्यांत ब्रह्मादि देव आणि श्रीलक्ष्मी यांचा एकाच शब्दामध्यें उच्चार न करितां दोन निरनिराळे शब्द कां घातले ?

**ज० वि०—यस्मादिति । ब्रह्मादीनामप्राप्तज्ञानमुत्पद्यते श्रियस्तु सर्वदा विद्यत इति सूचयितुं श्रियोऽपीति पृथग्ग्रहणम् । चशब्दोऽवधारणे । यस्मादित्यनेन संबध्यते । ज्ञानस्फूर्तिः ज्ञातव्यार्थप्रतिभा । यथायोगं क्रियाध्याहारः ॥**

सिद्धान्ती—बरोबर विचारलेंस. ब्रह्मादिदेवांना अप्राप्त असलेलें ज्ञान हरिप्रेरणेनें उत्पन्न होतें; पण लक्ष्मीही सर्वदा ज्ञानपूर्ण आहे. हें अभिप्रेत सुचविण्यासाठीं व ब्रह्मादि देवांहून लक्ष्मीची योग्यता मोठी आहे हें सांगण्यासाठीं, देवाचें व श्रीलक्ष्मीचें निरानिराळें वर्णन केलें आहे. देवाची व तिची योग्यताच सारखी नाहीं; आचार्यांनीं ' लक्ष्मीचेही ' असा शब्द उपयोजिला आहे त्याचें रहस्यच हें आहे, भाष्यांतील ' आणि ' या शब्दानें देवांचा व लक्ष्मीचा पृथक्-

भाव आहे, हें सुचविलें जातें. व या भेदाचें विस्मरण आपल्यास होत नाहीं; ज्ञानाचें स्फुरण (जाणण्याच्या वस्तूला अंतःकरणांत प्रकट करणारी स्फूर्ति) देवादिकांसही परमेश्वराकडूनच होतें; आणि श्री लक्ष्मीस तें स्फुरण विष्णूच्या कृपेनें सदैव असतें. असा देवास व लक्ष्मीस यथायोग्य क्रियापदें देऊन भाष्याचा अर्थ करावयाचा आहे.

**ज॰ वि॰—यो ह वा अविदितार्षेयच्छंदोदैवतब्राह्मणेन मंत्रेण यजति याजयति अध्यापयति वा स्थाणुं वर्च्छति गर्तं वा पद्यते प्रवामीयत इति श्रुतेर्दैवतादिज्ञानवत एव विद्याफलतीति ज्ञायते। तत्र ब्राह्मणपदोपलक्षितार्थज्ञानं व्याख्यानादेव भविष्यति। छंदोज्ञानं त्वक्षरगणनया सुकरमेव॥**

सिद्धान्ती–ज्ञानाचें माहात्म्य वेदामध्यें फार सांगितलें आहे. प्रत्येक मंत्राचा "ऋषि, छंद, दवत व ब्राह्मण, इत्यादि न जाणतां जो कोणी हवन करितो किंवा करवितो, वेद शिकतो किंवा शिकवितो, त्याला जडरूपत्व प्राप्त होतें, किंवा अथांग कूपांत अथवा नरकसागरांत डुंबण्याचा त्याला प्रसंग येतो किंवा तो पुरुष अल्पायुषी होतो" ही श्रुति प्रमाण आहे. म्हणून आपल्याप्रमाणेंच देवादिकांसही मंत्रदेवतादिज्ञानाची अतिशय आवश्यकता आहे. हें ज्ञान असेल तरच विद्या फलद्रूप होते, असें या श्रुतीवरून समजतें. आतां, ब्राह्मण शब्दानें काय समजावयाचें त्याचा उलगडा भाष्यकार स्वतः करतील. तो असा कीं मंत्राचें व्याख्यान म्हणजे ब्राह्मण होय. छंदाचें ज्ञान म्हणजे वाक्यामध्यें किंवा पद्यामध्यें अक्षरें किती असतात, त्याचें ज्ञान होय. हें ज्ञान मिळविणें मुळींच कठीण नाहीं. असो; यानंतर—

**भा॰—स्वायंभुवो मनुरेतैर्मंत्रैर्भगवंतमाकूतिसूनुं यज्ञनामानं विष्णुं तुष्टाव॥**

**ज॰ वि॰—ऋषिदेवते तु ज्ञापयन्नाह–स्वायंभुव इति। व्याचिकीर्षितत्वेन बुद्धौ प्रकृतत्वादेतैरित्युक्तम्। मूर्त्यंतरं विहाय यज्ञस्य स्तुतौ किं कारणमित्यतो विशेषतः स्वसंबंधमाह–आकूतिसूनुमिति। भगवंतमिति पूजार्थम्॥**

सिद्धान्ती—ऋषि आणि देवता यांचें स्वरूप भगवान् भाष्यकारच सांगतात. ह्या उपनिषदांत ज्यांचें स्पष्टीकरण भाष्यरूपानें व्हावयाचें आहे, ते सर्व मंत्र म्हणून यज्ञरूपी विष्णूची स्तुति स्वायंभुव मनु करिता झाला. हे मंत्र आचार्यांस प्रत्यक्ष होते म्हणून त्यांस 'हे मंत्र' असें म्हटलें.

शिष्य—आपण मला मूर्तीचें स्वरूप सांगणार होतां, तें न करितां यज्ञाची स्तुति–कथा काय म्हणून आपण चालविली आहे?

भा०—स्वायंभुवः स्वदौहित्रं विष्णुं यज्ञाभिधं मनुः ।
ईशावास्यादिभिर्मन्त्रैस्तुष्टावावहितात्मना ॥
रक्षोभिरुग्रैः संप्राप्तः खादितुं मोचितस्तदा ।
स्तोत्रं श्रुत्वैव यज्ञेन तान्हत्वाऽवध्यतां गतान् ॥

ज० वि०—कुत एतदवगम्यत इत्यत आह-स्वायंभुवइति । अवहितात्मना सावधानेन मनसा । यद्यप्यसौ स्वपरमोक्षार्थं तुष्टाव तथाप्यवांतरमस्य फलान्तरं सिद्धमित्याह-रक्षोभिरिति । तदा स्तुतिकाले स्तोत्रं श्रुत्वैव तदसहमानैः रक्षोभिः खादितुं संप्राप्तो यज्ञेन तेभ्यो मोचित इत्यर्थः ॥

सिद्धान्ती—त्याचा हा संबन्धच तसा आहे. तो कसा तें चित्त लावून ऐक. स्वायंभुव मनूनें जरी आपल्याला व इतर लोकांना मोक्ष-प्राप्ति होण्यासाठीं आकूति-पुत्र व आपला नातु जो यज्ञ नामक सर्ववंद्य भगवान् विष्णु, त्याची ईशावास्यादि मंत्रांनीं स्तुति केली व तीही एकाग्र मनानें केली, तथापि या मंत्रांच्या जपानें आणखीही कांहीं फलप्राप्ति सिद्ध झाली आहे.

शिष्य—ती काय ?

सिद्धान्ती—त्यावेळीं म्हणजे मनूनें केलेली स्तुति ऐकल्यावर यज्ञ नामक विष्णूनें यज्ञविद्वेषी राक्षसांचा विध्वंस केला. हे अवध्य राक्षस ईशावास्याचें पठन ऐकून रागावले होते व विष्णूचा आजा जो मनु त्याला खावयास आले होते. त्यांना ठार मारून विष्णूनें मनूची सुटका केली.

भा०—प्रादाद्धि भगवांस्तेषामवध्यत्वं हरः प्रभुः ।
तैर्वध्यत्वं तथाऽन्येषामतः कोन्यो हरेः प्रभुरिति ब्रह्माण्डे ॥

ज० वि०—तान्राक्षसानित्यध्याहारेण पुल्लिंगोपपत्तिः । अवध्यत्वे कारणमाह-प्रादाद्धीति । ननु बाधने कथं तेषां शक्तिरित्यत आह-तैरिति । अन्येषां तैर्वध्यत्वमिति तेषामन्यवधे सामर्थ्य-मित्यर्थः । तथाशब्दो वरसमुच्चये । यत एवं हरिः शिववरमप्यतिक्रांतवानतो हरेरन्यः को नाम प्रभुः समर्थः किं तु हरिरेवेत्यर्थः ॥

शिष्य—या राक्षसांना जर पूर्व कालीं "तुम्ही अमर आहांत" असा वर मिळाला होता, असें भाष्यकार म्हणतात तर त्यांना मारण्याला श्रीहरि हा कसा समर्थ झाला ?

सिद्धान्ती—या राक्षसांना शंकर प्रभूनें अवध्यतेचा (न मारले जाण्याचा) वर दिला होता. तसेंच, दुसऱ्याचा वध करण्याचें सामर्थ्यही त्यांस प्राप्त झालें होतें; पण भगवान् हरि हा शंकरापेक्षांही जास्त सामर्थ्यवान् व शंकराचा स्वामी आहे, म्हणन

शंकरवराचें अतिक्रमण करून यज्ञविध्वंसक अवध्य राक्षसांचा हरीला सहजच वध करितां आला. तात्पर्य, हरीसारखा सामर्थ्यवान् दुसरा कोण आहे ? कोणी नाहीं. त्याचें सामर्थ्यच विलक्षण आहे. भाष्यांत ' तथा (तसाच)' हा शब्द शंकरानें त्या राक्षसांस अवध्यत्वाचा व इतर–वधाचा असे दोन वर दिले होते, हें दाखवितो.

**भा०—भागवते चायमेवार्थ उक्तः ॥**

**ज० वि०–अत्र प्रमाणान्तरमाह–भागवते चेति । ईशावास्यादिमंत्राणां योर्थो वक्ष्यतेऽयमेव भागवतेऽष्टमादावुक्तः । तत्र च मनुः स्तोता यज्ञनामा विष्णुः स्तुत्य इति स्पष्टं प्रतीयते । तत्समाख्यानादत्रापि तयोरेव ऋषिदेवतात्वं ज्ञायत इति भावः । अनेनोपनिषदोधिकारिविषयप्रयोजनाभिसंबंधोपि दर्शितो भवति । मन्वादीनामधिकारिणां यज्ञनाम्नो विष्णो विषयस्य मोक्षस्य प्रधानस्य रक्षोनिरसनस्याप्रधानस्य च प्रयोजनस्य सूचितत्वात् । अतो युक्तमेतदुपनिषदो व्याख्यानं गहनार्थत्वाच्चेति । उपदिष्टमपि तत्त्वं अधिकारिण एव हृदयेऽवतिष्ठते नान्यस्येति तत्त्वं विवक्षुरुपनिषदधिकारसिध्यर्थं विच्छिन्नतृष्णत्वं तावदाद्येन मंत्रेण सोपपत्तिकं विधत्ते ॥**

सिद्धान्ती—आम्ही म्हणतों याला दुसरेंही एक प्रमाण आहे. ईशावास्यादि मंत्रांत जो अर्थ प्रसिद्ध करावयाचा आहे, तोच अर्थ श्रीमद्‌भागवताच्या आठव्या स्कंधाच्या पहिल्या अध्यायामध्यें प्रथमतः सांगितला आहे. तेथें तर मनु हा स्तोत्र म्हणणारा आहे, व यज्ञ नामक विष्णु स्तुत्य आहे, असें स्पष्ट दिसतें. तोच अर्थ या उपनिषदांत सांगावयाचा आहे म्हणून याही उपनिषदाचा तोच देव (यज्ञ नामक विष्णु ) आणि तोच ऋषि ( स्वायंभुव मनु ) आहे असें समजावयाचें आहे. याप्रमाणें ऋषि व देवता सांगून या उपनिषद्–विषयाचें (१) अधिकारी (२) विषय (३) प्रयोजन, आणि (४) संबंध हें अनुबंध–चतुष्टय सांगितल्यासारखें केलें. येथें मनु आदि ऋषि हे अधिकारी आहेत. यज्ञ नामक विष्णु विषय आहे. मोक्षाची प्राप्ति व राक्षसांचा नाश, हीं मुख्य व गौण फलें आहेत. व मोच्यमोचकभाव हा संबंध आहे. मुमुक्षु जीव मोच्य आहेत व उपनिषद्‌-ज्ञान हें मोचक आहे. हा संबंध होय. असें आहे म्हणून या उपनिषदाचें व्याख्यान करणें अतिशय महत्त्वाचें आहे, असें ठरविलें. शिवाय, या उपनिषदाचा अर्थ अतिशय गहन आहे, म्हणूनही हें व्याख्यान महत्त्वाचें आहे. या उपनिषदांतील अर्थाचा उपदेश श्रुत झाला तरी तो अधिकारी पुरुषांच्या मात्र अंतःकरणामध्यें स्पष्ट ठसतो. दुसऱ्याला तो अर्थ समजणें शक्यच नाहीं. हें तत्त्व सांगण्यासाठीं व ज्याची वासना समूल नाहीशीं झाली आहे तोच येथील अर्थ जाणण्याला योग्य अधिकारी असतो, हें सिद्ध करण्यासाठीं पहिल्या मंत्राचा उपपत्तिपूर्वक अर्थ सांगतात.

---

## मंत्र पहिला.

**ज० वि०—तत्रेशावास्यपदं दुर्गमार्थत्वाद्याख्याति—**

शिष्य—येथें ईशावास्य या पदाचा अर्थ लवकर समजणार नाहीं, तें पद दुर्गम आहे, म्हणून स्पष्ट करितात काय ?

**सिद्धान्ती**—होय.

**भा०—ईशस्यावासयोग्यमीशावास्यम् ।**

**ज० वि०—ईशस्येति । अनेनावासमर्हतीत्यावास्यं ईशस्यावास्यं ईशावास्यमित्युक्तं भवति ॥**

**सिद्धान्ती**—ईश्वरानें वास्तव्य करणें जेथें योग्य आहे, तें आवास्य, ईशाचें जें आवास्य तें ईशावास्य. हा अर्थ व्याकरणपद्धतीनें ठीक झाला.

**भा०—जगत्यां प्रकृतौ । तेन ईशेन त्यक्तेन दत्तेन भुंजीथाः ॥**

**ज० वि०—जगत्यामित्येतत्पृथिव्यामित्यन्यथाप्रतीतिनिरासाय व्याचष्टे-जगत्यामिति । तेनेति परामर्शस्य विषयो न प्रतीयते त्यक्तस्य च भोगसाधनत्वमयुक्तमतो दुर्गमार्थं तृतीयपादं व्याख्याति-तेनेति ।**

**सिद्धान्ती**—जगती याचा अर्थ पृथ्वीमध्यें असा कोणी करतील; तो होऊं नये म्हणून जगतीचा अर्थ ‘ प्रकृति ’ असा केला आहे. मूळमंत्रामध्यें “त्यानें” ‘ असें जें सर्वनाम आलें आहे, त्याचें मूळ नाम मंत्रामध्यें नाहीं म्हणून त्यानें म्हणजे ईश्वरानें असें स्पष्ट सुचविलें. ‘त्या ईश्वरानें त्यक्त केलेलें म्हणजे दिलेलें जें कांहीं असेल त्याचा मात्र उपभोग कर ’ असें सांगावयाचें आहे. टाकून दिलेलें भोगण्यास अयोग्य असतें अशी शंका येईल, तिचें निवारण ‘ त्यक्त=दत्त दिलेलें असा अर्थ करून केलें.

**ज० वि०—समासे उपसर्जनीभूतस्यापीशस्य बुद्ध्या विवेकेनायं परामर्श इति भावः । पूर्वार्धोक्ततात्पर्यपरामर्शश्चायामिति ज्ञातव्यम् । ततश्चायं मंत्रार्थः । यत्किंच जगदिदं तत्सर्वं प्रवृत्यर्थमात्मन ईशस्यावासमर्हतीति तावत्तदेवानुप्राविशदिति श्रुतिप्रसिद्धम् । तेन ज्ञायते स्वयमिदं प्रवृत्तावशक्तं परमेश्वराधीनमिति । किं च जगत्यां प्रकृताविदं सर्वमाश्रितमित्येतदाकाश एव तदोतं च प्रोतं चेति श्रुतिसिद्धम् । प्रकृतिश्च परमेश्वराधीना । एतस्मिन्खल्वक्षरे गार्ग्याकाश ओतश्च प्रोतश्चेत्यादिश्रुतेः । ततोपि सर्वमस्वतंत्रं परमेश्वराधीनमिति विज्ञायते । यत एवमीश्वर एव स्वतं-**

**अस्तेन कारणेन तेनेशेन त्यक्तेन दत्तेन वित्तेन यदृच्छालब्धेनेति यावत्। भुंजीथाः भोगं कुर्याः। यतश्चेशादन्यदस्वतंत्रं तेन तस्य दाने सामर्थ्याभावात्कस्यस्वित् कस्याऽपि राजादेः सकाशात् धनं मा गृधः मा कांक्षेथाः। मंत्रार्थस्थापनाय स्मृतिसमाख्यामाह—**

शिष्य—भगवन्! समासामध्यें जें पद गौण असतें, त्याच्याबद्दल सर्वनाम घालणें योग्य नाहीं, असा व्याकरणाचा नियम असतां येथें मंत्रांतील 'त्या' सर्वनामानें समासांत असल्यानें गौण झालेला ईश हा शब्द कसा दाखविला जातो?

सिद्धान्ती—हें असें गूढ तत्त्व सामान्य बुद्धीच्या माणसाला समजत नाहीं, म्हणूनच हें उपनिषद् फार गूढ आहे. याचा अर्थ समजण्याला उत्तम विवेकच हवा आहे. असो; मंत्राच्या पूर्वार्धाचा अर्थ असें स्पष्ट दाखवितो कीं जगत् हें ईश्वराचें वास्तव्य स्थान आहे, व ईशाधीन प्रकृतीचा आधार ईश्वर आहे, म्हणून ईश्वर स्वतंत्र व जगत् अस्वतंत्र आहे, हा गूढ अर्थ लक्ष्यांत ठेव. आतां सर्व अर्थ हा–ह्या विश्वामध्यें जें सर्व कांहीं आहे, तें ईश्वराचेंच वास्तव्यस्थान आहे. ईश्वर तेथें राहतो; त्याचा हेतु हा, कीं प्रत्येक पदार्थाला प्रवृत्तीचें ( कर्म करण्याचें ) सामर्थ्य यावें. "आपणच हें उत्पन्न करून आपण त्यामध्यें शिरता झाला", अशी श्रुति प्रसिद्ध आहे. या श्रुतीवरूनच असें समजतें कीं, जगतांतील यच्चयावत् पदार्थ स्वतः कर्म करण्याला असमर्थ आहेत; व ते सर्वथा परमेश्वराच्या अधीन आहेत. तुला ठाऊकच आहे कीं, हे सर्व पदार्थ प्रकृतीच्या आश्रयानें राहतात, हें "आकाश हें सर्व ओतप्रोत भरून राहिलें आहे," असें श्रुति सांगते ह्यावरून ठरतें. बाबा! प्रकृति ही आकाशाची जननी आहे, पण स्वतः ती परमेश्वराच्या तंत्रानें चालते. "हा अविकारी जो विष्णु त्याच्यामध्यें हें सर्व आकाश ओतप्रोत भरलेलें आहे. गार्गि! हें तुला ठाऊक असूं दे." अशी श्रुति आहे. या श्रुतीवरून प्रकृति व प्रकृतीमधील सर्व प्राकृत पदार्थ परमेश्वराच्या अधीन आहेत, असें समजतें. तसेंच ईश्वर स्वतंत्र आहे हेंही समजतें. म्हणून स्वतंत्र कारण जो ईश्वर तो जें कांहीं आपल्यास धन देईल, म्हणजे यदृच्छेनें आपल्यास जें प्राप्त होईल, त्याचा मात्र आपण उपभोग घ्यावा. परमेश्वराशिवाय दुसरा कोणी स्वतंत्र नाहीं, व धनाचा उपभोग देण्याघेण्याचें सामर्थ्यही दुसऱ्या कोणाला नाहीं. यासाठीं मंत्रांतील 'तेन' याचा अर्थ 'परमेश्वर' असा केला पाहिजे. समजलें? असो; म्हणून दुसऱ्या कोणाचेंही धन तूं घेऊं नकोस व दुसऱ्या कोणापाशींही—राजापाशींसुद्धां–'मला धन द्या? किंवा दुसरें कांहीं द्या' असें तोंड वेंगाडून मागूं नकोस. आपण केलेला मंत्रार्थ खरा आहे, हें स्थापन करण्याकरितां ब्रह्माण्डपुराणांतील एक समानार्थक श्लोकाचा अवतार करितात—

**भा०—स्वतःप्रवृत्त्यशक्तत्वादीशावास्यमिदं जगत्।**
**प्रवृत्तये प्रकृतिगं यस्मात्स प्रकृतीश्वरः॥**

तदधीनप्रवृत्तित्वात्तदीयं सर्वमेव यत्।
तद्दत्तेनैव भुंजीथा अतो नान्यं प्रयाचयेदिति ब्रह्माण्डे ॥१॥

ज० वि०—स्वत इति। स्वतःप्रवृत्त्यशक्तत्वादेवेदं जगत्प्रवृत्त्यर्थं ईशावास्यम् अन्यथा तन्न स्यात्। अत ईशावास्यत्वात् स्वतःप्रवृत्यशक्तं ईशाधीनम्। किं च यस्मादिदं प्रकृतिगम् यस्माच्च विष्णुः प्रकृतीश्वरस्ततोऽपि। यद्यस्मादेवमुक्तप्रकारेण तदधीनस्वरूपत्वात्सर्वं वित्तं तदीयमेवातस्तद्दत्तेनैव भुंजीथाः। अतः परमेश्वरादन्यं न प्रयाचेत भवानित्यर्थः ॥ १ ॥

सिद्धान्ती—या ब्रह्माण्डपुराणांतील वाक्याचा अर्थ असा आहे कीं, जगताला स्वतः प्रवृत्ति करण्याचें सामर्थ्य नाहीं; म्हणून तें प्रवृत्तिपर आपल्यास दिसतें यावरून, तेथें ईश्वराचें वास्तव्य आहे, असें आपण समजलेंच पाहिजे. ईश्वर तेथें नसेल तर, प्रकृतीच्या, जगताच्या व पदार्थांच्या अंतर्यामी नसेल तर, पदार्थाला प्रवृत्ति करण्याचें सामर्थ्यच असणार नाहीं, व दुसरें असेंही समजलें पाहिजे कीं, प्रकृति आणि तद्गत पदार्थ हेही परमेश्वराच्याच स्वाधीन आहेत; म्हणून अर्थातच श्रीविष्णु प्रकृतीचा स्वामी झाला. तेव्हां वर सांगितल्याप्रमाणें त्याच्याच स्वाधीन सर्व कांहीं आहे, व सर्वांची प्रवृत्ति आहे, सर्व व्यापार त्याच्या तंत्रानें चालतात, म्हणून सर्व द्रव्यही त्याचेंच झालें. अतएव, तो देईल तेवढ्याचाच आपण उपभोग घेतला पाहिजे आणि परमेश्वराशिवाय दुसऱ्या कोणाजवळ याचना न केली पाहिजे, हा ब्रह्मांडोक्त वाक्याचा अर्थ झाला. या अर्थावरून तुला समजेलच कीं ही स्मृति पहिल्या मंत्राचा स्पष्ट अर्थ करिते ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

ज० वि०—तृष्णाविच्छेदवत्स्वोचितकर्मानुष्ठानमप्यावश्यकं ज्ञानार्थिनामित्येतत्कुर्वन्नेवेति द्वितीयमंत्रेण विधत्ते। तत्र नान्यथेतोस्तीत्येतद्दुर्गमार्थत्वाव्द्याख्याति—

सिद्धान्ती—याप्रमाणें तृष्णेचा उच्छेद केलेल्या जिज्ञासु पुरुषानें स्ववर्णाश्रमाला विहित असणाऱ्या कर्मांचें अनुष्ठान केलें पाहिजे, हें सांगण्यासाठीं दुसऱ्या मंत्राची योजना आहे. याही मंत्राचा व त्यांतील कांहीं शब्दांचा अर्थ समजणें कठीण आहे. म्हणून त्याचें व्युत्पत्तिपूर्वक व्याख्यान करितात. व कदाचित् दुसराच अर्थ कोणी घेतील त्याचाही निरास करितात. मंत्राचा अर्थ असा आहे:—

भा०—अकुर्वतः कर्म न लिप्यत इति नास्ति ॥

ज० वि०—अकुर्वत इति। ततश्चायं मंत्रार्थः। शतं समाः शतं वर्षाणि इह मानुषादिजन्मनि यज्जिजीविषेत् जीवितुमिच्छेत्

**तत्कर्माणि स्वोचितानि कुर्वन्नेवामरणं भगवत्पूजात्मकानि असंकल्पितफलानि स्वोचितानि कर्माणि सर्वथा कुर्यादिति यावत्। कुतः एवं कर्माणि कुर्वति नरे मनुष्यमात्रेऽपि त्वयि कर्म पापं न लिप्यते। स्वोचितेनासंकल्पितफलेन कर्मणा भगवत्पूजां कुर्वंतमल्पाधिकारिणमपि न प्रागुत्तराणि कर्माणि पापानि बाधन्ते। ततश्च ज्ञानाधिकारी स भवतीति यावत्। इतः कर्मकरणात् अन्यथा कर्म न लिप्यत इति नास्ति। भगवत्पूजामकुर्वतं पापानि बाधन्त एव। ततश्चासौ ज्ञाने नाधिक्रियते। अशुद्धचित्तत्वात्। अतः कर्माणि कार्याणीति ॥**

सिद्धान्ती—" या मनुष्य जन्मांत जीवाला शंभर वर्षे आयुष्य असतें. इतक्या वर्षेपर्यंत जगावें अशी ज्याला इच्छा असेल त्यानें आपल्या वर्णाश्रमास योग्य अशीं भगवत्–पूजात्मक अवश्य कर्में आमरण करावीं; मात्र कर्म करितांना भक्तानें कोणत्याही प्रकारचा संकल्प धरूं नये. कारण अशा प्रकारचीं निःसंकल्प कर्में जो पुरुष करितो त्याला कर्माचा किंवा पापाचा स्पर्श होत नाहीं. खरेंच आहे. आपल्याला उचित असणारीं कर्में निष्काम बुद्धीनें करून आपण भगवत्पूजा केली तर आपल्याला—आपण मनुष्य प्राणी आहों तरी—पूर्वींच्या किंवा पुढील कर्मांची, भूतभविष्य कर्मांची, किंवा पापांची बाधा होत नाहीं. मग आपला अधिकार कितीही लहान किंवा कितीही मोठा असो. अशीं आपण कर्में करूं लागलों म्हणजे आपल्यास ज्ञानाचा अधिकार प्राप्त होतो; पण आपण असें केलें नाहीं, व आपल्यास उचित असणारीं कर्में आपण केलीं नाहींत, किंवा कर्म करित असतां फलाची वासना ठेविली तर आपल्याला पापाचा स्पर्श होत नाहीं, असें नाहीं; म्हणजे आपण पापाचे अधिकारी होतों. जे लोक विष्णूचें आराधन करित नाहींत, त्यांना पापाची बाधा होतेच होते. अर्थात् सकाम कर्मठांना व ईशपूजा न करणारांना ज्ञानाचा अधिकार मिळत नाहीं; कारण त्यांचें चित्तच अशुद्ध असतें. कर्म कां करावें? याची उपपत्ति अशी आहे. नित्य कर्म केलेंच नाहीं तर किंवा संकल्पपूर्वक भलतेंच केलें तर चित्ताच्या अशुद्धतेमुळें ज्ञानाचा अधिकार येत नाहीं. ज्ञान तर हवें असतें. अतएव ज्ञानप्राप्तीसाठीं आपण निर्मळ मनानें कर्म केलेंच पाहिजे.

**ज० वि०—अपरे व्याचक्षते। ज्ञानिनः सर्वकर्मत्यागः पूर्वमंत्रेण विहितः। यथा ईशा ईशित्रा परमेश्वरेण यत्किंच जगत्यां पृथिव्यां जगदिदं तत्सर्वं वास्यमाच्छाद्यं तेन कारणेन त्यक्तेन सर्वकर्मत्यागेन भुंजीथाः पालयेथाः। एवं त्यक्तैषणस्त्वं कस्यस्विद्धनं मा गृधः मा कांक्षीः। अथवा मा गृधः कस्मात् कस्यस्विद्धनं न कस्यापि। अतो मिथ्याविषये बुद्धिं मा कार्षीरिति। यस्तु नरमात्रो-**

ल्पज्ञस्तं प्रति कर्मानेन मंत्रेणोच्यत इति। तदनुपपन्नम्। अज्ञवज्ज्ञानिनोऽपि भगवत्पूजात्मकस्वकर्माकरणे पापलेपसद्भावेन द्वाभ्यामपि तत्कर्तव्यतायाः स्मार्तत्वादिति भावेनाह—

पूर्व०—मला वाटतें, आपलीही अर्थाची दिशा चुकली. पहिल्या मंत्रानें तर सर्व कर्मांचा त्याग करावा असें ज्ञात्या पुरुषाला सांगितलें आहे.

सिद्धान्ती—कशावरून ?

पूर्व०—ज्याअर्थी परमेश्वरानें ह्या जगातील सर्व कांहीं पदार्थ आच्छादून टाकिले आहेत, त्याअर्थी सर्व कर्मांचा त्याग करून तूं स्वस्थ रहा; मग तुझी अशी कर्मविषयक वासना नष्ट झाली म्हणजे सहजच दुसऱ्याच्या धनाची आशा तूं करणार नाहींस; किंवा असेंही म्हणतां येईल कीं परमार्थानें हे विश्वगत पदार्थ कोणाचेच नाहींत म्हणजे ते मिथ्याच आहेत. म्हणून या मिथ्या पदार्थांची आसक्ति तूं लावून घेऊं नकोस. सारांश, तूं कर्म करूं नकोस. हा पहिल्या मंत्राचा अर्थ खरा आहे. असें ठरलें तर मग काय ? असो; आतां, सर्वच जीवांना सर्व कर्मांच्या त्यागाचा अभ्यास साधणार नाहीं, म्हणून अशा अज्ञानी मुमुक्षूंना ह्या दुसऱ्या मंत्रानें नित्य कर्म करण्याचा उपदेश केला आहे. सारांश, पहिला मंत्र ज्ञानी लोकांसाठीं आहे व तो नैष्कर्म्याचा उपदेश करितो. आणि दुसरा मंत्र अल्पज्ञ लोकांसाठीं सांगितला आहे. या मंत्रानें अल्पज्ञ व अशुद्ध चित्ताच्या लोकांनीं कर्म करावें, श्रुतिविहित मात्र कर्म चित्तशुद्ध्यर्थ करावें, असें ठरतें.

सिद्धान्ती—हें तुमचें पांडित्य शुष्क आहे. अज्ञ लोकांप्रमाणेंच ज्ञानी लोकांसही पाप लागतें. केव्हां ? जेव्हां, हे लोक ईशपूजन करणार नाहींत, किंवा स्वकर्तव्यकर्मांचा त्याग करतील तेव्हां. कर्तव्य-त्याग केला तर उभयतांसही पापाचा लेप लागतो, म्हणून उभयतांनाही कर्म आणि उपासना यांचा स्वीकार केला पाहिजे. स्वतः भाष्यकारच नारद स्मृतिगत एक श्लोक उध्दृत करीत आहेत, त्याचा अर्थ समजून घ्या आणि मग कांहीं बोलावयाचें असेल तर बोला.

भा०—अज्ञस्य कर्म लिप्येत कृष्णोपास्तिमकुर्वतः।
ज्ञानिनोऽपि यतो ह्रास आनंदस्य भवेद्ध्रुवम्।
अतोऽलेपिलेपः स्यादतः कार्यैव सा सदेति नारदीये॥ २॥

ज० वि०—अज्ञस्येति। कृष्णोपास्तिं स्वकर्मणेति शेषः। नियतमोक्षत्वेन कर्मणामाकिंचित्करत्वादलेपस्य ज्ञानिनः कुतः कर्मलेप इत्यत आह-यत इति ह्रासो भवेत्कृष्णोपास्त्यकरणनिमित्तपापेनेति शेषः। यतो ह्रासो भवेदतो मोक्षप्रच्युतिरूपलेपरहितेऽपि

ज्ञानिनि कर्मलेपः स्यादेव । यत एवमुभयोर्लेपोऽतो ज्ञाभ्यामपि सा कृष्णोपास्तिः कार्यैवेत्यर्थः । असंगतं च तस्येशाच्छाद्यत्वकथनम् । न हि तत्कर्माकरणे हेतुः । तथासत्यज्ञस्यापि तत्प्रसंगेनोत्तरमंत्रविरोधात् । ईशावास्यत्वज्ञानोपलक्षणपक्षेऽप्यसंगतिरेव । न हि जगदीशावास्यमिति जानता कर्म न कार्यमिति नियमोस्ति । अद्वैतज्ञानमनेनोपलक्षितमिति चेन्न । विरोधात् । न ह्याच्छाद्याच्छादकयोरभेदो दृष्टपूर्वः । सर्वमपीशा वास्यमंगीकुर्वताऽवश्यं जगतीपदस्य सर्वोपलक्षणत्वमंगीकर्तव्यम् । ततो वरं प्रकृतिवाचकत्वग्रहणमेव । सर्वार्थलाभात् । न च तत्पक्षेऽस्योपयोगोस्ति । भुंजीथा इत्यस्य पालनार्थतायामात्मनेपदविरोधः । धनमिथ्यात्वं च प्रत्यक्षादिविरुद्धमिति ॥ २ ॥

सिद्धान्ती—येथें असें सांगितलें आहे कीं, कृष्णाची उपासना न करून पुनः जो स्वकर्मही करीत नाहीं किंवा स्वकर्म करून तें परमेश्वरास समर्पण करीत नाहीं, तो ज्ञानी असेल तरी त्याला अज्ञाप्रमाणें पापाचा स्पर्श होतो.

पूर्वपक्षी—हें कशावरून ? जो मुमुक्षु होऊन ज्ञानी झाला, त्याला कर्मलेप होत नाहीं. ज्ञानी पुरुषावर लेप चढविण्याला कर्मामध्यें किंवा पापामध्यें सामर्थ्यच नाहीं !

सिद्धान्ती—स्मृति काय म्हणते, तें पहा; उगीच मनांतले मांडे कशाला खाता ? स्मृतिवाक्यावरून तोही पापी होतो असें ठरतें. तसेंच त्या कृष्णोपासना न करणाऱ्या अभक्ताच्या सर्व आनंदाचा निश्चितपणानें खरोखर नाश होतो, हें ठरतें. सारांश, ज्ञानी लोक सुद्धां जर पापी होतात, अलिप्त असणाऱ्या पुरुषासही जर कर्माच्या अकरणानें पापाचा लेप लागतो, तर श्रुति-स्मृतींनीं सांगितलेलें कर्म व परमेश्वराची उपासना करणें हें आपलें कर्तव्यच आहे, असें ठरतें. कृष्णाची उपासना केली नाहीं, तर पाप लागून आनंदाचा ऱ्हास होतो व अलिप्त असल्यामुळें ज्यांनां मोक्षच्युति प्राप्त व्हावयाची नाहीं असे ज्ञानी लोकसुद्धां कर्मलिप्त होतात. म्हणून ज्ञानी असो वा अज्ञानी असो; जीवानें कर्माचें व उपासनेचें अनुष्ठान केलें पाहिजे, हा आमचा स्मृतिसाहाय्यानें ठरलेला अभिप्राय आहे ! आतां तुम्ही जो पूर्वपक्ष केला आहे, त्याची उपपत्ति आम्हांस समजत नाहीं. परमेश्वरानें सर्व पदार्थांचें आच्छादन केलें आहे, असें सांगितलें म्हणजे ' कर्म करूं नये ' असा अर्थ कसा उत्पन्न होतो ? ईश्वराचें आच्छादन आणि कर्माचें अकरण यांत कार्य–कारण संबंध आहे, असें मुळींच दिसत नाहीं. संबंध आहे असें समजलें तर कोणीच कर्म करूं नये, असा प्रसंग प्राप्त होईल ! आणि अज्ञानी लोकांनीं मात्र कर्म करावें हा जो तुम्ही दुसऱ्या मंत्राचा अर्थ केला आहे त्याच्याशीं विरोध उत्पन्न होईल, बरें; ' ईश्वरानें हें सर्व जगत् आच्छादून

टाकिलें आहे.' हें ज्ञानाचें उपलक्षण आहे, असें समजलें तरी विसंगतीचाच प्रसंग येतो. ईश्वरानें हें सर्व आच्छादून टाकलें आहे असें ज्ञान झालें तरी 'कर्म करूं नये' असा नियम उत्पन्न होत नाहीं. या ज्ञानाचा व कर्माकरणाचा संबंध काय?

पूर्व०—आमचें म्हणणें असें आहे कीं 'ईशावास्य म्हणजे ब्रह्माशीं अभिन्न असें हें सर्व जगत् असून सर्वत्र अद्वैतच आहे.' हें ज्ञान झालें म्हणजे कर्मांची आवश्यकताच राहत नाहीं.

सिद्धान्ती—तरी विरोध कोठें चुकतो आहे? ईश्वरानें हें सर्व दृश्य आच्छादिलें आहे; असें म्हटलें म्हणजे आच्छादणारा परमेश्वर आणि आच्छाद्य वस्तु असे दोन पदार्थ होतातच कीं नाहीं? ह्या उभयतांमध्यें अभेद आहे. झांकणारी व झांकलेली या दोन्ही वस्तु एकच आहेत, असें आम्हीं तरी पाहिलेलें नाहीं. सारांश, तुमचें विधान युक्तिशून्य आहे. शिवाय सर्वच ईशावास्य आहे, असा स्वीकार केला म्हणजे 'जगती' पदाचाही सर्वथा लक्षणेनेंच अर्थ केला पाहिजे. अर्थातच लक्षणा करून अर्थ करण्यापेक्षां पदाचा जो मुख्य अर्थ आहे तोच घेणें हें जास्त श्रेयस्कर असतें. लक्ष्यार्थापेक्षां वाच्यार्थ श्रेष्ठ असतो, कारण तो सर्व अर्थाचें प्रतिपादन करितो. हा सामान्य नियम आहे. पुनः, सर्व श्रुति-स्मृतींनीं सांगितलेल्या तात्पर्याचा आम्ही केलेल्या अर्थामध्यें अंतर्भाव होतो. शिवाय, तुम्हांला या लक्षणेचा कांहीं उपयोगही होत नाहीं. आणखी, 'भुज' याचा अर्थ 'पालन करणें' असा केला आहे, तोही व्याकरणविरुद्ध आहे. आत्मने-पदाचा विरोध येथें उत्पन्न होतोच. पालनार्थी 'भुज' असला म्हणजे आत्मने-पद नसतें. मंत्रांत आत्मनेपदी 'भुञ्जीथाः' हा शब्द आहे. पुनः आणखी, धन हें मिथ्या आहे, असें जें तुम्ही म्हणतां तें प्रत्यक्षादि प्रमाणांच्या विरुद्ध आहे. सारांश, तुमचा अर्थ प्रकरणविरोधी, अर्थ-शास्त्रविरोधी, श्रुति-स्मृतिविरोधी, व्याकरणविरोधी आणि प्रत्यक्षादिप्रमाणविरोधी आहे. अर्थातच तो त्याज्य आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

ज० वि०—एवं प्राप्ताधिकारं प्रति परमात्मतत्त्वबुभुत्साजननायासुर्या इति मंत्रेणापरमात्मविदां निंदा क्रियते। तत्रासुर्या इत्यस्य वर्णविपर्ययेणासुर्याः सूर्यप्रकाशहीना इत्यन्यथाप्रतीतिनिरासायार्थमाह—

सिद्धान्ती—याप्रमाणें योग्य अधिकाऱ्याचें स्वरूप सांगून अधिकाऱ्याला परमात्मतत्त्व जाणण्याची इच्छा उत्पन्न व्हावी, यासाठीं प्रथमतः तिसऱ्या मंत्रामध्यें परमात्मा न जाणणाऱ्या लोकांची निंदा केली आहे. तसेंच, 'असुर्य' म्हणजे

'सूर्यप्रकाशहीन' असा कोणी खोटा अर्थ करील, ऱ्हस्व 'असुर्य' शब्दाला 'असूर्य' असें दीर्घत्व देऊन, सारांश, वर्णविपर्यय करून अर्थ करील—त्याचा निरास करण्यासाठीं या शब्दाचा अर्थच सांगितला आहे.

भा०--सुष्ठुरमणविरुद्धत्वादसुराणां प्राप्यत्वाच्चासुर्याः ॥

ज० वि०—सुष्ठुरमणेति । सुष्ठुरमणं सुखं सुर्यं तद्विरुद्ध-महादुःख(व)त्वादसुर्या इत्यर्थः । असुराणां प्राप्यत्वादित्यनेन सकलसुखराहित्यमुपलक्ष्यते । कुतोऽयमसुर्यपदार्थ इत्यत आह—

सिद्धान्ती—जेथें उत्तम प्रकारचें रमणीय सुख भोगावयास सांपडतें तें 'सुर्य' व जेथें महादुःख भोगणें प्राप्त होतें तें 'असुर्य' होय. येथें 'असुरांची' म्हणजे राक्षसांची मात्र वास्तव्य करण्याची योग्यता असते, व येथें सर्वदा सुखशून्यत्व असतें.

शिष्य--हा अर्थ कसा उत्पन्न झाला ?

सिद्धान्ती--सांगतों ऐक.

भा०—न च रमन्त्यहो असदुपासनयात्महन इत्युक्तत्वात् ।

ज० वि०—नचेति । एतमेव मंत्रं मूलीकृत्य प्रवृत्तेऽस्मिन्वाक्येऽसुर्यपदार्थवर्णनम् । न च रमन्तीति क्रियते । तत्र चशब्देन महादुःखमनुभवन्तीत्येषोर्थः समुच्चीयते । महादुःखसुखाभावपरताऽस्य पदस्यास्मद्व्याख्यान एव संभवति नान्यथेति भावः । आत्मनो नित्यत्वेन हननासंभवात्तत्रानर्थकथनमयुक्तमित्येतदप्यनेन परिहृतम् । असदुपासनया आत्महन इति व्याख्यातत्वात् । विपरीतं भावयता हि तद्याथात्म्यं तिरस्कृतमिति तस्य गौण्या वृत्त्याऽऽत्महंतृत्वम् । स्पष्टं चात्र प्रमाणमाह—

सिद्धान्ती—श्रीमान् भाष्यकारांनीं ह्या मंत्रांतील पूर्वार्धाचें वाक्य मूलभूत करून असुर्य शब्दाचा अर्थ करण्यासाठीं भागवतांतील श्लोकार्ध उद्धृत केलें आहे. त्याचा अर्थ असा आहे कीं, 'असताची उपासना करून आत्मघात करणाऱ्या लोकांस केव्हांही सुखप्राप्ति होत नाहीं. उद्धृत केलेल्या वाक्यांत "आणि" हा शब्द 'हे लोक महा दुःखाचा अनुभव घेतात.' हा अर्थ समुच्चयानें सांगतो. महादुःखाची प्राप्ति आणि सुखाचा अभाव हे अर्थ 'असुर्य' शब्दाचा आम्ही जो अर्थ केला आहे, त्यानें मात्र शक्य होतात. इतर तऱ्हेनें व्याख्यान केल्यास आमच्या सुंदर व श्रीमद्भागवतमान्य अर्थाचा निष्कर्ष होत नाहीं. सारांश, असताचे उपासक आत्मघाती होतात.

शिष्य—आत्मा नित्य आहेना ? मग त्याचा घात कसा होईल ?

सिद्धान्ती—तुझी शंका मनांत आणूनच आम्ही वरील अर्थ केला आहे. असताची उपासना करणारा म्हणजे विपरीत भावना मनांत ठेवून आत्मस्वरूपाचा तिरस्कार करणारा पुरुष आत्मघाती नव्हे तर काय? आत्म्याची अयथार्थ भावना करणारा आत्मघातकी होतो, हा लक्षणेनें अर्थ होतो. असो; या आमच्या म्हणण्याला दुसरेंही एक स्पष्ट प्रमाण भाष्यकारांनीं सांगितलें आहे.

भा०—महादुःखैकहेतुत्वात्प्राप्यत्वादसुरैस्तथा।
असुर्या नाम ते लोकास्तान्यान्ति विमुखा हरौ॥
इति वामने॥ ये के चेत्यनेन नियम उक्तः।
नियमेन तमो यान्ति सर्वेऽपि विमुखा हराविति च॥ ३॥

ज० वि०—महादुःखेति। विमुखा हराविति समाख्ययाऽऽत्मशब्दो हरिपर इति चोक्तं भवति। तथा च नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वरूपमात्मानं जीवं ये विपरीतं प्रतिपद्यन्ते ते आत्महन इत्यपव्याख्यानमेव। ते लोका इति तच्छब्दः प्रसिद्धिद्योतकः। ये ते प्रसिद्धास्तान्यान्तीत्यर्थः। ये आत्महनस्ते केचन ताँल्लोकानभिगच्छन्ति केचनेत्यन्यथाप्रतीतिनिरासायाह-ये केचेति। ये केचात्महनस्ते सर्वेऽपीत्येवं नियमपरमेवेदं न तूक्तप्रकारेण विभागपरमित्यर्थः। कुत इत्यत आह। नियमेनेति। नियमेनेत्यस्यैव विवरणं सर्वेपीति। अंधयतीत्यंधम्। अतिनिबिडांधकारावृता इत्यर्थः। प्रेत्य मृत्वा। एवमुदाहृतवचनविरोधादेव देवादिशरीराण्यसुर्या लोका इति व्याख्यानमयुक्तमेवेति॥ ३॥

सिद्धान्ती—जे लोक हरिविन्मुख असतात. तेच आत्मविन्मुख लोक होत, ह्याच लोकांस 'असुर्य' नामक महादुःखकारी व असुरयोग्य प्रदेशांत जावें लागतें, असें सांगण्याचें तात्पर्य आहे. समान अर्थ प्रतिपादक श्लोक आहे म्हणून आत्मा शब्दाचा अर्थ हरि आहे, हें स्पष्ट आहे.

पूर्वपक्षी—नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, जें आत्मस्वरूप म्हणजे जीव-स्वरूप आहे-त्याच्यासंबंधानें विपरीत भावना करून जीव अनित्य, अशुद्ध, अबुद्ध, आणि अमुक्त आहे असें मानतात ते लोक आत्मघाती होत.

सिद्धान्ती—हें केवळ अपव्याख्यान आहे. कारण 'ते लोक' असें म्हटलें आहे; म्हणून ते लोक सर्वांस ठाऊक आहेत, प्रसिद्ध आहेत, असाच अर्थ निघतो. वामन पुराणामध्येंही असुर्य लोक म्हणजे असुरांनीं मात्र प्राप्य अशा महादुःखकारी लोकांप्रत हरिविन्मुख लोकांस जावें लागतें, असें स्पष्ट म्हटलें आहे. जे कोणी हरिविन्मुख असतात-आत्मविन्मुख असतात-ते लोक मात्र 'असुर्य' लोकाला जातात, असें स्पष्ट सांगितलें आहे. हा ईश्वरी नियम आहे. तुम्ही म्हणतां तसा

येथें विभाग नाहीं. सर्व आत्मघाती लोक म्हणजे हरिविन्मुख लोक असुर्य नामक प्रसिद्ध लोकाला जातात. जेथें अति निबिड अंधकार असतो त्याला 'अन्धन्तम' म्हणतात. मेल्यावर हे हरिविन्मुख लोक तिकडे जातात. असें वामन पुराणांत स्पष्ट म्हटलें आहे म्हणून 'देवादि शरीरें म्हणजेही असुर्य लोक' असें जे लोक म्हणतात, ते व्याख्यान करितांना चुकतात. कारण देवांचीं शरीरें तेजस्वी आणि अमर अशीं असतात ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**ज० वि०—एवं निवृत्तकर्मणां विशुद्धाशयस्यैहिकामुष्मिकाशेषविषयेभ्यो व्यावृत्तस्येश्वरतत्त्वबुभुत्सावतः कोऽसावात्मा यद्विपरीतोपासनमसुर्यलोकप्राप्तिसाधनं स्यादित्यपेक्षायां परमात्मतत्त्वोपदेशः क्रियते—अनेजदित्यादिना । तत्राद्यं मंत्रमन्यथाप्रतीतिनिरासाय स्मृत्यैव व्याचष्टे—**

**सिद्धान्ती—**याप्रमाणें जो निष्काम कर्म करून शुद्धचित्त झाला आहे, जो ऐहिक आणि पारमार्थिक सुखासंबंधानें, सारांश, सर्व विषयांच्या उपभोगासंबंधानें विरक्त झाला आहे, आणि ज्याला ईश्वरतत्त्व जाणण्याची इच्छा झाली आहे, त्याला आत्मा कोण आहे, हें सांगण्याच्यापूर्वी आत्मेतर वस्तूची उपासना केली असतां, असुर्य लोकप्राप्ति कशी होते, हें सांगितलें. आतां, चवथ्या मंत्रांत परमात्मतत्त्वाचा उपदेश करितात, कारण उघड आहे. विपरीत भावना करून अनात्मकाची उपासना केली असतां 'असुर्य' लोक मिळतो, तर "आत्मा" ही काय वस्तु आहे ? असा सहज प्रश्न उत्पन्न होईल; त्याचें उत्तर चवथ्या मंत्रांत दिलें आहे. तरी पण प्रथमतः आपण अर्थ करितों, त्याला आधार आहे, असें सांगण्यासाठीं भगवान् भाष्यकार एका स्मृतीचा उल्लेख करितात.—

**भा०—अनेजन्निर्भयत्वात्तदेकं प्राधान्यतस्तथा ।**
**सम्यग्ज्ञातुमशक्यत्वादगम्यं तत्सुरैरपि ॥**

**ज० वि०—अनेजदिति । तत्परमात्मस्वरूपं निर्भयत्वादेवानेजत् । अकम्पमानं न तु निष्क्रियत्वात् । प्राधान्यत एव चैकं न तु द्वितीयवस्तुरहितत्वात् । तथाशब्दो विशेषणसमुच्चये । मनसोऽपि जवीयो वेगवत्तरम् । मनो हि वेगवत्प्रसिद्धम् । सम्यग्ज्ञातुमशक्यत्वादेव नैनद्देवा आप्नुवन्निति तत्सुरैरप्यगम्यमुच्यते । न तु सर्वथाऽगोचरत्वात् ॥**

**सिद्धान्ती—**परमात्मस्वरूप निर्भय आहे म्हणून त्याला 'अनेजत्' म्हटलें. न कांपणारें, (अकंप पावणारें) असा या शब्दाचा मूळ अर्थ आहे. 'कर्म करणारें' असा

त्याचा अर्थ नाहीं. तसेंच, 'दुसरी वस्तूच नाहीं, म्हणून तें (ब्रह्म) एक होय' असें नव्हे, तर तें ब्रह्मच काय तें प्रधान आहे, म्हणून तें एक आहे. 'तथा' शब्द निष्कंप व प्रधान हीं दोन्ही विशेषणें एकाच ब्रह्माला लागतात, असें दाखवितो. म्हणजे ब्रह्म निर्भय आणि सर्व-श्रेष्ठ आहे, असें ठरतें. हें ब्रह्म अतिचपल, मनापेक्षांही अनंतपटीनें वेगवान् आहे. तें देवांनासुद्धां अप्राप्यच आहे; याचा अर्थ तें सर्वथा अगोचर आहे असा नव्हे, तर देवांसही त्याचें यथार्थ ज्ञान होत नाहीं, असा आहे.

भा०—स्वयं तु सर्वानगमत्पूर्वमेव स्वभावतः।
अचिन्त्यशक्तितश्चैव सर्वगत्वाच्च तत्परम्॥
द्रवतोऽत्येति संतिष्ठत्तस्मिन्कर्माण्यधान्मरुत्॥

ज० वि०—पूर्वमर्षदित्यस्य व्याख्यानं स्वयं तु सर्वानिति। अगमत् व्यजानात्। पूर्वमेवेत्यनुवादेन स्वभावत इति विवरणम्। अचिन्त्यशक्तितश्च सर्वगतत्वाच्च तत्परंब्रह्म संतिष्ठत् द्रवतोऽन्यानत्येतीत्युच्यते। न त्वन्यस्य कल्पितत्वात्। अपइत्यस्य व्याख्यानं कर्माणीति। आसमन्तात्पालयन्तीति कर्माण्यापः। सर्वैः क्रियमाणानि कर्माणि तस्मिन्नर्पितवानित्यर्थः। अन्यकर्माणि कथं मातरिश्वाऽर्पयेदित्यत आह—

सिद्धान्ती—या आत्मारामाला प्रथमतःच सर्व वस्तूंचें स्वभावसिद्ध ज्ञान झालें. कारण, त्याचें सामर्थ्य अचिंतनीय आहे, व तो आत्मा सर्व-गामी आहे. सर्व द्रव्यें द्रव पावतात; म्हणून स्थिर ब्रह्म या चंचल द्रव्यांपेक्षां श्रेष्ठ आहे. असो; हें सर्व-श्रेष्ठ आहे, दुसरें श्रेष्ठ कांहीं नाहीं. परमेश्वराच्या ठिकाणीं वायूनें आपल्या सर्व कर्मांचें आधान केलें आहे. 'अपस्' शब्दाचा अर्थ कर्म असा आहे. आसमंतात् सर्वांचें पालन कर्में करितात,' म्हणून त्यांस 'आपः' अशी संज्ञा दिली आहे. सारांश; पदार्थांनीं जीं जीं कर्में करावयाचीं तीं तीं सर्व परमेश्वराला वायूनें अर्पित केलीं.

शिष्य—अन्य पदार्थांचीं कर्में वायूला कशीं अर्पण करितां येतील?

भा०—मारुत्येव यतश्चेष्टा सर्वा तां हरयेऽर्पयेदिति ब्रह्माण्डे॥

ज० वि०—मारुतीति। यतः सर्वा चेष्टा मरुत्प्रेरणयोत्पन्नत्वान्मारुती। अतस्तां हरये। हरावर्पयेदित्युक्तमित्यर्थः। अर्षदित्येतदगमदिति व्याख्यातम्। तन्मूलभूतं धातुसूत्रमपि पठति।

सिद्धान्ती—ज्या अर्थीं सर्व चेष्टा (हालचाल) वायूच्या प्रेरणेनें होतात, त्या अर्थीं त्या सर्व, हरीला अर्पण कराव्या, म्हणजे हरिकर्तृत्वानें त्या चालल्या आहेत, असें अनुसंधान ठेवणें योग्यच आहे. हा ब्रह्माण्डपुराणाचा अभिप्राय

८—४८४—१३-९-११.

येथें विभाग नाहीं. सर्व आत्मघाती लोक म्हणजे हरिविन्मुख लोक असुर्य नामक प्रसिद्ध लोकाला जातात. जेथें अति निबिड अंधकार असतो त्याला 'अन्धन्तम' म्हणतात. मेल्यावर हे हरिविन्मुख लोक तिकडे जातात. असें वामन पुराणांत स्पष्ट म्हटलें आहे म्हणून 'देवादि शरीरें म्हणजेही असुर्य लोक' असें जे लोक म्हणतात, ते व्याख्यान करितांना चुकतात. कारण देवांचीं शरीरें तेजस्वी आणि अमर अशीं असतात ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

ज० वि०—एवं निवृत्तकर्मणां विशुद्धाशयस्यैहिकामुष्मिकाशेषविषयेभ्यो व्यावृत्तस्येश्वरतत्त्वबुभुत्सावतः कोऽसावात्मा यद्विपरीतोपासनमसुर्यलोकप्राप्तिसाधनं स्यादित्यपेक्षायां परमात्मतत्त्वोपदेशः क्रियते—अनेजदित्यादिना । तत्राद्यं मंत्रमन्यथाप्रतीतिनिरासाय स्मृत्यैव व्याचष्टे—

सिद्धान्ती—याप्रमाणें जो निष्काम कर्म करून शुद्धचित्त झाला आहे, जो ऐहिक आणि पारमार्थिक सुखासंबंधानें, सारांश, सर्व विषयांच्या उपभोगासंबंधानें विरक्त झाला आहे, आणि ज्याला ईश्वरतत्त्व जाणण्याची इच्छा झाली आहे, त्याला आत्मा कोण आहे, हें सांगण्याच्यापूर्वी आत्मेतर वस्तूची उपासना केली असतां, असुर्य लोकप्राप्ति कशी होते, हें सांगितलें. आतां, चवथ्या मंत्रांत परमात्मतत्त्वाचा उपदेश करितात, कारण उघड आहे. विपरीत भावना करून अनात्मकाची उपासना केली असतां 'असुर्य' लोक मिळतो, तर "आत्मा" ही काय वस्तु आहे ? असा सहज प्रश्न उत्पन्न होईल; त्याचें उत्तर चवथ्या मंत्रांत दिलें आहे. तरी पण प्रथमतः आपण अर्थ करितों, त्याला आधार आहे, असें सांगण्यासाठीं भगवान् भाष्यकार एका स्मृतीचा उल्लेख करितात.—

भा०—अनेजन्निर्भयत्वात्तदेकं प्राधान्यतस्तथा ।
सम्यग्ज्ञातुमशक्यत्वादगम्यं तत्सुरैरपि ॥

ज० वि०—अनेजदिति । तत्परमात्मस्वरूपं निर्भयत्वादेवानेजत् । अकम्पमानं न तु निष्क्रियत्वात् । प्राधान्यत एव चैकं न तु द्वितीयवस्तुरहितत्वात् । तथाशब्दो विशेषणसमुच्चये । मनसोऽपि जवीयो वेगवत्तरम् । मनो हि वेगवत्प्रसिद्धम् । सम्यग्ज्ञातुमशक्यत्वादेव नैनद्देवा आप्नुवन्निति तत्सुरैरप्यगम्यमुच्यते । न तु सर्वथाऽगोचरत्वात् ॥

सिद्धान्ती—परमात्मस्वरूप निर्भय आहे म्हणून त्याला 'अनेजत्' म्हटलें. न कांपणारें, (अकंप पावणारें) असा या शब्दाचा मूळ अर्थ आहे. 'कर्म करणारें' असा

त्याचा अर्थ नाहीं. तसेंच, 'दुसरी वस्तूच नाहीं, म्हणून तें (ब्रह्म) एक होय' असें नव्हे, तर तें ब्रह्मच काय तें प्रधान आहे, म्हणून तें एक आहे. 'तथा' शब्द निष्कंप व प्रधान हीं दोन्ही विशेषणें एकाच ब्रह्माला लागतात, असें दाखवितो. म्हणजे ब्रह्म निर्भय आणि सर्व-श्रेष्ठ आहे, असें ठरतें. हें ब्रह्म अतिचपल, मनापेक्षांही अनंतपटीनें वेगवान् आहे. तें देवांनासुद्धां अप्राप्यच आहे; याचा अर्थ तें सर्वथा अगोचर आहे असा नव्हे, तर देवांसही त्याचें यथार्थ ज्ञान होत नाहीं, असा आहे.

भा०—स्वयं तु सर्वानगमत्पूर्वमेव स्वभावतः।
अचिन्त्यशक्तितश्चैव सर्वगत्वाच्च तत्परम्॥
द्रवतोऽत्येति संतिष्ठत्तस्मिन्कर्माण्यधान्मरुत्॥

ज० वि०—पूर्वमर्षदित्यस्य व्याख्यानं स्वयं तु सर्वानिति। अगमत् व्यजानात्। पूर्वमेवेत्यनुवादेन स्वभावत इति विवरणम्। अचिन्त्यशक्तितश्च सर्वगतत्वाच्च तत्परंब्रह्म संतिष्ठत् द्रवतोऽन्यानत्येतीत्युच्यते। न त्वन्यस्य कल्पितत्वात्। अपइत्यस्य व्याख्यानं कर्माणीति। आसमन्तात्पालयन्तीति कर्माण्यापः। सर्वैः क्रियमाणानि कर्माणि तस्मिन्नर्पितवानित्यर्थः। अन्यकर्माणि कथं मातरिश्वाऽर्पयेदित्यत आह—

सिद्धान्ती—या आत्मारामाला प्रथमतःच सर्व वस्तूंचें स्वभावसिद्ध ज्ञान झालें. कारण, त्याचें सामर्थ्य अचिंतनीय आहे, व तो आत्मा सर्व-गामी आहे. सर्व द्रव्यें द्रव पावतात; म्हणून स्थिर ब्रह्म या चंचल द्रव्यांपेक्षां श्रेष्ठ आहे. असो; हें सर्व-श्रेष्ठ आहे, दुसरें श्रेष्ठ कांहीं नाहीं. परमेश्वराच्या ठिकाणीं वायूनें आपल्या सर्व कर्मांचें आधान केलें आहे. 'अपस्' शब्दाचा अर्थ कर्म असा आहे. आसमंतात् सर्वांचें पालन कर्में करितात,' म्हणून त्यांस 'आपः' अशी संज्ञा दिली आहे. सारांश; पदार्थांनीं जीं जीं कर्में करावयाचीं तीं तीं सर्व परमेश्वराला वायूनें अर्पित केलीं.

शिष्य—अन्य पदार्थांचीं कर्में वायूला कशीं अर्पण करितां येतील?

भा०—मारुत्येव यतश्चेष्टा सर्वा तां हरयेऽर्पयेदिति ब्रह्माण्डे॥

ज० वि०—मारुतीति। यतः सर्वा चेष्टा मरुत्प्रेरणयोत्पन्नत्वान्मारुती। अतस्तां हरये। हरावर्पयेदित्युक्तमित्यर्थः। अर्षदित्येतदगमदिति व्याख्यातम्। तन्मूलभूतं धातुसूत्रमपि पठति।

सिद्धान्ती—ज्या अर्थी सर्व चेष्टा (हालचाल) वायूच्या प्रेरणेनें होतात, त्या अर्थी त्या सर्व, हरीला अर्पण कराव्या, म्हणजे हरिकर्तृत्वानें त्या चालल्या आहेत, असें अनुसंधान ठेवणें योग्यच आहे. हा ब्रह्माण्डपुराणाचा अभिप्राय

आहे, मंत्रांतील " अर्षत् " याचा अर्थ समजला असा आहे. त्याचा व्याकरण-सूत्राधारानें भाष्यकार अर्थ सांगतात.

भा०—ऋष ज्ञाने ॥ ४ ॥

ज० वि०—ऋष ज्ञान इति । अनेजदित्यादेर्निष्क्रियत्वाद्यर्थकल्पने मनसो जवीय इत्यादिविरोधश्च । न च सोपाधिकनिरुपाधिकत्वेन व्यवस्था । मुख्यार्थसंभवेऽमुख्यार्थायोगात् । स्वप्रधाने ब्रह्मणि वेदान्तानां तात्पर्यादत्र स्वरूपकथनमात्रेण वाक्यपरिसमाप्तिः ॥४॥

'ऋष' याचा मूळ अर्थ ज्ञान असा आहे, हा अर्थ धातुपाठांतील आहे.

पूर्वपक्षी—'अनेजत्' याचा अर्थ क्रियाशून्यत्व केला तर?

सिद्धान्ती—'मनापेक्षांही तो वेगवान् आहे' यापुढील वाक्यार्थी तुमच्या अर्थानें विरोध येतो, परमात्मा निरुपाधिक आहे, व मन सोपाधिक आहे अशी ही लाक्षणिक व्यवस्था करून चालावयाचें नाहीं. कारण, जेथें मुख्य अर्थ ठीक जुळतो, तेथें गौण अर्थ घेणें हें कधींही न्याय्य होणार नाहीं. आतां, हें तुम्हांस ठाऊकच आहे कीं, सर्व वेदान्ताचें तात्पर्य एक शुद्ध ज्ञानरूपी ब्रह्मामध्येंच समर्पित होतें; तेव्हां तुम्ही 'सोपाधिक, निरुपाधिक इत्यादि' भेद काढून जो अर्थाचा अनर्थ करितां तो कोणत्याही युक्तीनें योग्य नाहीं; येथें स्वरूपकथन आहे. हें ब्रह्मस्वरूप ज्ञान उत्तम विद्वानाचें इष्ट साध्य आणि मुमुक्षूला इष्ट साधन असतें ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

ज० वि०—उत्तरमंत्रे तदेजतीत्यस्य तद्ब्रह्म चेष्टत इति तु व्याख्यानम् । प्रायपाठविरुद्धम् । अतः तद्बिभेतीत्यन्यथाप्रतीतिः स्यात्तन्निरासायाह—

सिद्धान्ती—या मंत्रांत 'एजति' म्हणजे 'ब्रह्म कर्म करितें' हें जें व्याख्यान केलें आहे तें संप्रदायविरुद्ध आहे. असो; अन्य अर्थाची प्रतीति होऊं नये यास्तव भाष्यकारांनीं—

भा०—तदेजति तत एव एजत्यन्यत् ॥

ज० वि०—तदिति ॥ तदित्यव्ययं पंचम्यर्थे चेदमंगीक्रियते । तर्ह्येजनस्य किं कर्तृ तत्राह—अन्यदिति । ननु किमध्याहारेण तद्ब्रह्म बिभेतीत्येवार्थः किं न स्यादित्यतस्तन्नेजतीत्युत्तरवाक्यविरोधात् । शाब्द्या ह्यनुपपत्तेरार्थी बलवतीति भावेन तद्व्याख्याति—

सिद्धान्ती—याच्या प्रेरणेनें बाकीचे सर्व दुसरे पदार्थ कर्म करितात, असा स्वच्छ अर्थ करून 'तें ब्रह्म कोणालाही भीत नाहीं.' या दुष्ट अर्थाचा निरास केला आहे. 'तत्' याचा अर्थ 'ततः' ('त्याच्यापासून') असा पंचम्यन्त अर्थ आहे.

शिष्य—मग 'एजत्' (भिणें) याचा कर्ता कोण ?

सिद्धान्ती—'अन्यत्' (बाकीचे सर्व पदार्थ) हा कर्ता आहे 'तदेजति तत एव एजत्यन्यत्'—त्यापासून सर्वांस भीति आहे असा भाष्यकारांनीं अर्थ केला आहे.

पूर्वपक्षी—पण येथें अन्यत् या शब्दाचा अध्याहार करावा लागतो. हा शब्द मुळांत नाहीं, म्हणून मला वाटतें कीं 'ब्रह्म भय पावतें' असाच अर्थ करावा.

सिद्धान्ती—नाहीं, पुढच्याच वाक्याला विरोध येतो. केवळ शब्दांनींच जेथें चांगलासा अर्थ लागत नाहीं तेथें पूर्वापर संबंध लक्षांत आणून अर्थ करावा, असा पद्धतशीर न्याय आहे.

भा०—तत्स्वयं नैजति ॥

ज० वि०—तत्स्वयमिति ॥ तन्नेजतीत्येतान्निष्क्रियत्वार्थमपि व्याख्यातुं शक्यमित्यतो मंत्रार्थे समाख्यामाह ॥

सिद्धान्ती—तें स्वतः कोणत्याही प्रकारची क्रिया करित नाहीं, असा कदाचित् अर्थ उत्पन्न होईल म्हणून 'तत्त्व-संहितें' मधील उतारा देतातः—

भा०—ततो बिभेति सर्वोऽपि न बिभेति हरिः स्वयम् ।
सर्वगत्वात्स दूरे च बाह्यतश्च समीपगः ॥ इति तत्त्वसंहितायाम् ५

ज० वि०—तत इति दूरे समीपतश्च बाह्येतश्चेति योज्यम् ॥ ५ ॥

सिद्धान्ती—हरीला सर्व भितात; पण स्वतः हरि कोणालाही भीत नाहीं, तो सर्व-गामी आहे, म्हणून तो बाह्यदृष्टीनें अतिशय लांब आहे व अंतर्दृष्टीनें अत्यंत जवळ आहे, याप्रमाणें अंतर्बाह्य योजना केली म्हणजे दूर आणि समीप यांच्या-मधील विरोध नाहींसा होतो ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

ज० वि०—तद्दूरे तद्वन्तिक इत्यादौ परमेश्वरस्य सर्वभूताश्रयतया सर्वभूतगतत्वमुक्तम् । तज्ज्ञानफलं यस्तु सर्वाणीति मंत्रेणोच्यते ।

सिद्धान्ती—ह्या मंत्रांत ब्रह्म जवळ आहे व तें लांब आहे इत्यादि शब्दांनीं 'ब्रह्म हें सर्वगामी आहे.' असें सांगितलें 'तें सर्व–भूतांचें आधारस्थान आहे.' हें ब्रह्माचें सर्वगत्व आपल्यास समजेल; तर त्याच्या ज्ञानाचें फल कोणतें मिळतें, तें या मंत्रांत सांगितलें आहे.

भा०—सर्वगं परमात्मानं सर्वं च परमात्मनि ।
यः पश्येत्स भयाभावान्नात्मानं गोप्तुमिच्छतीति सौकरायणश्रुतिः॥६॥

ज० वि०—तत्र जीवस्य सर्वभूतात्मकत्वमुच्यत इत्यपव्याख्याननिरासाय मंत्रं श्रुत्या व्याचष्टे ॥ सर्वगमिति ॥ सर्वगं परमात्मानमिति सर्वभूतेषु चात्मानमित्यस्यार्थः । सर्वं च परमात्मनीति पूर्वार्धस्य । भयाभावादिति ततो न विजुगुप्सत इत्येतद्व्याख्यानस्य नात्मानं गोप्तुमिच्छतीत्यस्योपपादनम् । अभेदार्थतायां सप्तम्यनुपपत्तिश्च ॥ ६ ॥

सिद्धान्ती—येथें "जीव हा सर्व भूतांचा आत्मा आहे" असें जे कोणी कोणी अनर्थकारी व्याख्यान करितात. त्याचा निरास करावयासाठीं व आपलें म्हणणें साधार आहे, हें सिद्ध करण्यासाठीं 'सौकरायण' श्रुतीचा अवतार करून भाष्यकारांनीं आपलें मत स्पष्ट केलें आहे, पहा:—

'जो पुरुष परमात्म्याला सर्वगामी समजतो व परमात्म्यामध्यें सर्व वस्तूंस पाहूं लागतो, तो भयविरहित होऊन जातो. त्यास स्वसंरक्षण करण्याचें कारण उरत नाहीं.' हा सौकरायणी' श्रुतीचा अर्थ झाला. येथें सर्वगामी' असें जें या उदाहृत श्रुतींत म्हटलें आहे, त्याचा अर्थच ईशावास्यांतील 'आत्मस्वरूपाला सर्व भूतांमध्यें पाहूं लागतो' या वाक्याचा अपरपर्याय आहे; आणि 'परमात्म्यामध्यें सर्व वस्तूंचा अंतर्भाव होतो' हा ईशावास्यांतील दहाव्या मंत्राच्या पूर्वार्धाचा अर्थ आहे. हा असा उभय श्रुतींमध्यें समान अर्थ आहे. असो; 'भयाचा अभाव असतो' याचाच अर्थ 'त्याला कोणत्याही प्रकारची लज्जा उत्पन्न होत नाहीं' हा आहे. हें व्याख्यान 'आत्मारामाला संरक्षण करूं इच्छित नाहीं.' याचेंच स्पष्टीकरण होय.

पूर्वपक्षी—कांहीं अभेदवादी लोकांनीं 'भूतांमध्यें व परमात्म्यामध्यें कोणत्याही प्रकारचा भेद नाहीं' असा अर्थ केला आहे. तो बरोबर आहे, असें वाटतें.

सिद्धान्ती—नाहीं. तो न्यायाला मुळींच अनुसरून नाहीं. कारण अभेदार्थाला मंत्रांतील सप्तमी विभक्ति आड येते. सप्तमीचा अर्थ केव्हांही प्रथमा विभक्तिपर होत नाहीं. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**ज० वि०—एतन्मंत्रार्थविवरणार्थो यस्मिन्सर्वाणीत्ययं मंत्र इति वक्ष्यति। तत्र यस्मिन्नात्मनि जीवे सर्वभूतानि स आत्मैव यस्य विजानतः तानि संवृत्त इत्याद्यन्यथाप्रतीतिनिरासाय मंत्रं व्याख्याति।**

सिद्धान्ती—ह्या सातव्या मंत्राचा अर्थ आतां सांगणार आहेत 'तो ह्या सातव्या मंत्रानें सहाव्याचा अर्थ विशेष स्पष्ट होतो' असें म्हणून केला आहे.

पूर्वपक्षी—आपल्या स्वतःच्या ज्या जीवात्म्यामध्यें सर्व भूतें आहेत तोच आत्माराम होय, आणि हें जाणणारा पुरुष आत्मस्वरूपच आहे, असा या मंत्राचा अर्थ आहे.

सिद्धान्ती—नाहीं. ह्या तुमच्या भलत्या अर्थाचें निरसन करण्यासाठीं भाष्यकार मंत्राचें व्याख्यान करितात तें असें:—

**भा०-यस्मिन्परमात्मनि सर्वभूतानि स परमात्मैव तत्र सर्वभूतेष्वभूत्। एवं सर्वभूतेष्वेकत्वेन परमात्मानं विजानतः को मोहः॥**

**ज० वि०—यस्मिन्निति। सर्वभूतानि तिष्ठन्तीति शेषः। तत्रेत्यनुवादेन सर्वभूतेष्विति व्याख्यानम्। अभूत् अनादितो वर्तते। विजानत इत्यस्यान्वयसिद्ध्यर्थमेवमित्यध्याहारः कृतः। एवं सर्वाधारतया सर्वभूतेषु परमात्मानम् विजानतः तं चैकत्वेन विजानत इति योज्यम्। विजानतोऽनुपश्यत इति द्वयोरपि व्याख्यानं विजानत इति। अर्थान्तरे संभवति कुतोयं मंत्रार्थ इत्यतः श्रुत्यन्तरेण व्याख्यानादिति भावेनाह—**

सिद्धान्ती—परमात्म्यामध्यें सर्व भूतें राहतात, तोच परमात्मा सर्व भूतांमध्यें अनादिकालापासून स्थित असतो. या प्रकारचें ज्ञान म्हणजे 'सर्व भूतांमध्यें एकच परमात्मा आहे' असें ज्ञान ज्याला झालें, त्याला मोह कोठून उत्पन्न होणार ?

'या प्रमाणें परमात्मा सर्वाधार आहे, सर्वांचा आधारस्वरूप आहे, म्हणून तो भूतांमध्यें एकत्वानें, एकरूपानें, राहतो.' असें ज्याला ज्ञान झालें, त्याला मोह उत्पन्न होणें शक्यच नाहीं. ह्या मंत्रांत "विजानतः" व "अनुपश्यतः" या दोन्ही शब्दांचा अर्थ साक्षात्काररूपानें "जाणणाऱ्याचें" हा आहे. दोन्ही शब्द एकार्थकच आहेत.

पूर्व०—निराळ्या अर्थाचा संभव असतांना आपण या मंत्राचा जो अर्थ करितां याला आधार काय ?

सिद्धान्ती—ही तुमची शंका मनांत आणूनच, भाष्यकारांनीं पिप्पलाद शाखेंतील श्रुतीचा अभिप्राय दिला आहे, त्यावरून भाष्यकार व आम्ही पूर्वोक्त अर्थ करितों.

भा०—यस्मिन्सर्वाणि भूतानि स आत्मा सर्वभूतगः ।
एवं सर्वत्र यो विष्णुं पश्येत्तस्य विजानतः ॥
को मोहः कोऽथवा शोकः स विष्णुं पर्यगाद्यतः ।
इति पिप्पलादशाखायाम् ॥

ज० वि०—यस्मिन्निति ॥ विजानतः एकत्वं चेति शेषः । ननु परमेश्वरज्ञानेऽपि कुतः शोकाद्यभावः इत्यत आह । स विष्णुमिति ॥ यतो ज्ञानी विष्णुं पर्यगात् सम्यक्प्राप्नोत्येव । अतः शोकाद्यभावः तस्य युक्त इत्यर्थः । अनेन सपर्यगादित्युत्तरमंत्रार्थतात्पर्यमप्युक्तं भवति । एकत्वमित्यस्य पौनरुक्त्यं चान्यथा । अनुवादस्य वैयर्थ्यात् । नन्वेवं मंत्रव्याख्यानेऽपि पुनरुक्तिः स्यात् । यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवेत्यस्य यस्मिन्सर्वाणि भूतानीत्यनेनोक्तत्वात्सर्वभूतेषु चात्मानमित्यस्य चात्मैवाभूदित्यनेनोक्तत्वात् । अतो नायं मंत्रार्थ इत्यत आह—

सिद्धान्ती—याही श्रुतीचा अर्थ प्रस्तुतच्या श्रुतीप्रमाणेंच आहे. "ज्याच्यामध्यें सर्वभूतें असतात, तो सर्वगामी आत्मा आहे." याप्रमाणें (या स्वरूपानें) जो सर्वत्र विष्णुस्वरूप पाहतो त्या ज्ञानी पुरुषाला, मोह अथवा शोक उत्पन्न होतच नाहींत. तो ज्ञानी पुरुष इष्ट लोकाप्रत जाऊन,—विष्णुलोकास जाऊन—तेथें आनंदानें राहतो. विष्णुलोकांत गेलेल्या पुरुषाला, शोक कोठील आणि मोह तरी कसा असणार?

शिष्य—परमेश्वर-ज्ञान झालें व त्याच्या लोकीं वसती झाली, तरी शोकादिकांचा अभाव कसा होतो?

सिद्धान्ती—हा ज्ञानी पुरुष विष्णुलोकाप्रत जातो, हें सांगितलेंना? आणि आनंदमय विष्णुलोकांत शोकादिकांचा अभाव आहे; हें तुला विदितच आहे. म्हणून विष्णुलोकीं जाणाऱ्या पुरुषाला, शोकादि अमंगल उपाधि प्राप्त होत नाहींत, हें स्पष्टच ठरलें. शिवाय, या पिप्पलादश्रुतीच्या अवतरणानें आतां जो मंत्र पुढें येणार आहे, त्याचें तात्पर्यही येथेंच सांगितल्यासारखें झालें आहे. दुसऱ्या रीतीनें ज्यांनीं व्याख्यान केलें आहे, त्यांस 'तो एकच आहे' या वाक्याची पुनरुक्ति टाळितां येत नाहीं. शिवाय, अनुवादालाही व्यर्थता प्राप्त होते. अनुवादामध्यें कांहीं तरी जास्त सांगितलें पाहिजे, किंवा कशाचा तरी निषेध केला असला पाहिजे; आणि प्रतिपक्ष्यांच्या अर्थामध्यें दोहींचाही

अभाव आहे; म्हणून पुनरुक्तीचा दोष त्यांच्या पदरीं पडतो. आमच्या अर्थांत हा दोष नाहीं.

पूर्वपक्षी—खासें! अहो! तुम्ही तरी हा दोष कोठें टाळितां आहांत? " जो सर्वभूतें आत्मारामामध्यें पाहतो.' याचीच पुनरुक्ति 'ज्याच्यामध्यें सर्व-भूतें असतात-' या शब्दांनीं होते व 'सर्व-भूतांमध्यें आत्मा आहे,' याची पुनरुक्ति 'तो परमात्मा सर्व-भूतें झाला' यानें होते. अर्थातच तुम्ही करूं पाहत आहांत, तसा या मंत्राचा अर्थ नाहीं. पुनरुक्ति टाळण्यास दुसरा कांहीं अर्थ केला पाहिजे.

सिद्धान्ती—ऐका, भाष्यकार काय म्हणतात, तें:—

**भा०—पूर्वोक्तानुवादेन शोकमोहाभावोऽपि विजानतश्चात्रोच्यते। अभ्यासश्च सर्वगतत्वस्य तात्पर्यद्योतनार्थः ॥ ७ ॥**

**ज० वि०—पूर्वोक्तेति ॥ पूर्वमंत्रोक्तस्य सर्वाधारतया सर्वगतत्वस्यात्रानुवादोऽतो न पुनरुक्तिरित्यर्थः। न च वाच्यमाधिकविधानायानुवादो भवति। न चात्राधिकं किंचिदिति। पूर्वमेवं विदो भयाभावः फलत्वेनोक्तः। अत्र पुनः शोकमोहाभावोऽपि। प्राक् सर्वाधारत्वेन सर्वगतत्वदर्शनफलमुक्तम्। अत्र तु विशेषतो जानत इत्येवं फले ज्ञाने चाधिक्यसद्भावादित्यर्थः। उपलक्षणं चैतत् एकत्वमनुपश्यत इत्याधिक्यं च द्रष्टव्यम्। तद्धावत इत्यस्य सर्वगतत्वस्य तद्दूर इत्यादिना पुनरुच्यमानत्वात्पुनरुक्तिदोष इत्याशंकां पुनरुक्तिदोषपरिहारप्रसंगात्परिहरति। अभ्यासश्चेति श्रुतिः। स्वस्य परमात्मसर्वगतत्वे तात्पर्यं द्योतयितुं तदभ्यस्यतीति न दोष इत्यर्थः। सर्वगतत्वस्येत्युपलक्षणम्। अनेजत्तन्नेजतीत्युभयत्वस्यापि द्रष्टव्यम् ॥ ७ ॥**

भाष्यकार म्हणतात कीं, सहाव्या मंत्रामध्यें 'तो सर्वाधार आहे' म्हणून 'सर्वगामी आहे' याचाच अनुवाद याही मंत्रांत आहे, म्हणून पुनरुक्ति नाहीं. आतां 'अनुवाद करणें म्हणजे कांहीं तरी अधिक विधान करणें असतें, तसें तर येथें कांहीं नाहीं' असेंही म्हणण्याचें प्रयोजन नाहीं. कारण पूर्व मंत्रांत 'ज्ञानी पुरुषाला कसलीही भीति राहत नाहीं' हें ज्ञानाचें फल सांगितलें आहे; आणि या सातव्या मंत्रांत 'ज्ञानीपुरुष शोक-मोहशून्य होतो.' हें फल सांगितलें आहे, तसेंच पूर्व मंत्रामध्यें 'परमात्मा सर्वाधार आहे,' म्हणून 'तो सर्वगामी आहे' असें ज्ञानी पुरुषाला ज्ञान होतें, असें सांगून येथें विशेष ज्ञानी पुरुषाला साक्षात्कारजन्य शोक-मोहादिकांच्या अभावाचें ज्ञान होतें म्हणून कथन केलें. सारांश, येथें फलामध्यें व ज्ञानामध्यें अधिकपणा आहे, हें स्पष्ट आहे. शिवाय हें सांगणें म्हणजे

एक उपलक्षणच आहे. या उपलक्षणानें एकत्व पाहाणाऱ्या ज्ञानी पुरुषांचे शोकमोहादि नष्ट होतात हा अर्थ ज्यास्त निघतो ?

पूर्वपक्षी—' तो सर्वगामी आहे म्हणून तो सर्वांपेक्षां वेगवान् आहे, तो दूर आहे ' इत्यादि आत्मस्वरूप सांगणाऱ्या मंत्रामध्यें पुनरुक्तीचा दोष परीहारावयाचा होता. तेथें ही अप्रस्तुत जलताडनक्रिया कशाला ?

सिद्धान्ती—हा प्रसंग टाळण्यासाठींच भाष्यकार म्हणतात, कीं श्रुतीचें तात्पर्यंच आत्मा सर्वगामी आहे ' हें आहे आणि हें आपलें तात्पर्य सहज लीलेनें लक्षांत यावें. म्हणून श्रुति पुष्कळ वेळ एकाच तात्पर्याचा अनेकदां उच्चार करिते, हा श्रुतिमातेचा आपल्यावर उपकार आहे. हा दोष नव्हे. आत्मारामाचा सर्वगामीपणा हेंही एक उपलक्षणच आहे. या उपलक्षणानें आत्मारामाचें सर्व मंगल स्वरूप ज्ञानी भक्तांच्या अंतःकरणांत स्पष्ट व यथार्थ प्रकटतें. मागें ' आत्माराम निष्कंप आहे, निर्भय आहे, ' असें एका मंत्रांत सांगितलें आहे आणि तेंच येथें ब्रह्माच्या सर्वगतत्वानें सांगितलें ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

ज०वि०—ज्ञानिनः शोकाद्यभावे युक्तित्वेन स पर्यगादिति विष्णुप्राप्तिरुक्ता। तत्र च राजादीनिव परमेश्वरं प्राप्तस्यापि शोकाद्यभावः किंनिमित्त इत्यतः शुक्रमित्यादिविशेषणानि । तत्रादेहोक्त्या प्राप्तशंकापरिहाराय कविरित्युत्तरार्धः । तमिमं मंत्रप्रतीत्यादिपरिहाराय पुराणवाक्येन व्याख्याति—

सिद्धान्ती—या मंत्रामध्यें विष्णुस्वरूपाला प्राप्त होण्याची स्थिति उपनिषद्वारानें व स्मृतीच्या आधारानें सांगतात. ज्ञानी पुरुष शोकमोह—शून्य झाला आहे म्हणून तो विष्णु लोकाला जाण्यास योग्य होतो, हें न्याय्य पद्धतीनें व युक्तीनें मागच्या मंत्रांत सांगितलें आहे. ' राजाच्या जवळ एखादा पुरुष गेला म्हणून तो शोकमोह—शून्य होतो असा नियम नाहीं, त्या प्रमाणेंच परमेश्वरप्राप्ति झालेला पुरुष सुद्धां नियमानेंच शोकमोह—शून्य होईल, हें कशा वरून ! ' असें विचारण्याचेंही प्रयोजन नाहीं. कारण श्रुतीनेंच शुक्र इत्यादि विशेषणें देऊन ज्या काय शंका येतील, त्यांचें निराकरणपर योग्य शब्द उपयोजून व्याख्यान स्पष्ट केलें आहे. उदाहरणार्थ शरीरशून्यत्वानें उत्पन्न झालेली शंका ' कवि ' या पदानें केली आहे. तसेंच या मंत्रांत कांहींतरी अतर्क्य गोष्टी सांगितल्या आहेत, या शंकेचा परीहार करण्यासाठीं पुराणांतील वाक्य अवतारून श्रुतीचा अर्थ विशद केला आहे.

भा०—शुक्रं तच्छोकराहित्यादव्रणं नित्यपूर्णतः।
पावनत्वात्सदाशुद्धमकायं लिंगवर्जनात्।
स्थूलदेहस्य राहित्यादस्नाविरमुदाहृतम्॥

ज० वि०—शुक्रमिति। शुचं शोकं रहति त्यजतीति शुक्रमित्यर्थः। नित्यपूर्णत इति। नित्यत्वपूर्णत्वाभ्यामित्यर्थः। व्रण संचूर्णन इत्यतः स्तोको व्रणः कालेनास्तोकं नित्यं गुणैरस्तोकं पूर्णमिति। पावनत्वात्पावित्र्यहेतुत्वात्। यद्यपि कायशब्दः स्थूलसूक्ष्मशरीरसाधारणस्तथापि अस्नाविरमिति स्थूलशरीराभावस्य पृथगुक्तेरकायं लिंगवर्जनादित्युक्तम्। स्नावोपलक्षितधातुमयं स्नाविरं स्थूलशरीरमेव हि प्रसिद्धम्। यतो हि ब्रह्म शुद्धं तस्मादपापविद्धम्। ततश्च पापमूलस्थूलसूक्ष्मशरीरविधुरम्। तथा च देहनिमित्तशोकादिशून्यम्। एवं भूतं च ज्ञानी पर्यगात्। सारूप्यादिलक्षणां तद्गतिं गतो भवति। अतस्तस्य शोकाद्यभावो युक्त इति भावः॥

सिद्धान्ती—मंत्रांतील ' शुक्र ' शब्दाचा अर्थ श्रीमद्व्यासांनीं शोक टाकून देणारा असा केला आहे. ईश्वर शोकादिशून्य आहे व भक्तासही तो शोकादिशून्य करितो. व्रण म्हणज संचूर्ण करणें त्याचा अभाव तें अव्रण होय असें; तेव्हां 'अव्रण' म्हणजे 'थोडा नाहीं असा.' 'जो कालानें थोडा नाहीं म्हणजे नियमित नाहीं तो नित्य असतो व ज्याचे गुण मर्यादित नाहींत तो पूर्ण असतो.' हें ' नित्यत्व व पूर्णत्व अव्रणत्वाचें कारण आहे. तसेंच, हा परमात्मा सदैव शुद्ध आहे, पवित्र आहे, म्हणून त्याला कोणत्याही प्रकारचें शरीर नाहीं. ध्यानांत ठेवा कीं, यद्यपि काय ( शरीर ) हा शब्द स्थूल व सूक्ष्म शरीराला साधारणपणें लावितात तथापि " अस्नाविर " ( स्नायूंनीं उपलक्षित धातुमय शरीरशून्य ) या शब्दानें स्थूल शरीराचा अभाव पृथक्पणानें सांगितला आहे, व " अकाय " ( शरीरशून्यता ) याचा अर्थ लिंगदेहशून्य अथवा सूक्ष्मदेहशून्य असा श्री व्यासजींच्या विवेचनानुसारें घ्यावयाचा आहे. तसेंच, ज्या अर्थीं ब्रह्म हें शुद्ध आहे, त्या अर्थीं तें पापशून्य असलेंच पाहिजे. पापाची उत्पत्ति स्थूल-सूक्ष्म देहांपासून होते; ब्रह्मामध्यें पापाचें वास्तव्यच नाहीं; म्हणून त्याला स्थूल, सूक्ष्म शरीरें नाहींत हें योग्यच आहे. याचप्रमाणें शोक, मोह हेही देहांपासून उत्पन्न होतात, ते देहच ब्रह्माला नाहींत म्हणून तें शोकमोहशून्य आहे. अशा शुद्धब्रह्माप्रत ज्ञानी पुरुष प्राप्त होतो. म्हणजे त्याला सरूपता नामक सद्गति मिळते. अर्थातच तो पुरुष शोकमोहादिशून्य होतो, हें स्पष्टच आहे आणि हेंच सांगण्याचा श्रुतीचा अभिप्राय आहे.

ज० वि०—यद्यशरीरो विष्णुर्न तर्हि तस्य जगत्सर्जनाद्युपपद्यते घटादिसृष्ट्यादौ शरीरान्वयव्यतिरेकानुविधानदर्शनात्। न च

**वाच्यं शुक्तिकायामिव रजतं परमात्मनि जगदारोपितमेव अतो न शरीरापेक्षेति । बाधाभावेन तत्सत्यत्वनिश्चयात् । न चादेहत्वस्य जगत्सृष्ट्यादेश्च कालभेदेन व्यवस्था । जगत्सृष्ट्यादिप्रवाहस्यानाद्यन्ततया प्रमितत्वात् । अतः सत्यानाद्यनन्तकालीनजगदुत्पत्त्यादिकारणस्य विष्णोः कथमशरीरत्वमित्याशंकापरिहारायोक्तस्य कविरित्यादेर्व्याख्यानम् । एवंभूतोऽपीति ॥**

पूर्वपक्षी—जर विष्णूला शरीरच नाहीं, तर त्याला जगतांची उत्पत्ति-स्थित्यादिकार्यें करितांच येणार नाहींत. घटादि उत्पन्न करणारा पुरुष शरीरी असतो; अशरीरी पुरुषाला घटादि उत्पत्ति करितां येत नाहीं. हा अन्वय व्यतिरेकाचा तर उलट सुलट अनुभव आपल्याला प्रत्यहीं येत असतो. म्हणून अशरीरी परमेश्वराला सृष्टि उत्पन्न करितांच येणार नाहीं.

अभेदवादी—अहो ! ज्याप्रमाणें शुभ्र शिंपलीवर रुप्याची भ्रांति होते, त्याप्रमाणेंच परमात्म-स्वरूपावर जगताची भ्रांति होत आहे. ही भ्रांति उत्पन्न करण्याला म्हणजे जगदुत्पत्ति करण्याला, शरीराची अपेक्षा नको आहे. वास्तविक जगत् आहेच कोठें कीं जें परमेश्वराला स्वोत्पत्तीसाठीं शरीरी करील ?

पूर्वपक्षी—पण हें बोलणें ठीक जुळत नाहीं. कारण, ज्ञान झाल्यानंतर शिंपलीवर भासलेल्या रुप्याचा बाध होतो, रुपें नाहींसें होतें, तसें येथें हें आपलें जगत् केव्हांही नाहींसें होत नाहीं, तें सत्य आहे. तसेंच, सिद्धान्ती महाराज ! अदेहत्व आणि जगदुत्पत्त्यादि कार्यें, या उभयतांची कालभेदानेंही व्यवस्था लावितां येणें शक्य नाहीं. जगत् उत्पन्न केलें तेव्हां परमेश्वर अशरीरी नव्हता, असेंही तुम्हांस म्हणतां यावयाचें नाहीं. कारण, जगत्-उत्पत्ति-स्थिति-लय यांचा प्रवाह अनादि, आणि अनंत असाच प्रत्ययास येतो. जगाच्या उत्पत्तीला आदि नाहीं, व जगाचें अस्तित्व अनंतकालपर्यंत टिकणारें असतें. म्हणून सत्यरूप आणि अनाद्यनंत जगताची उत्पत्त्यादि कार्यें करणारा जो विष्णु तो अशरीरी कसा असूं शकेल ? त्याला शरीर नसणें हें संभवनीयच नाहीं.

सिद्धान्ती—ही शंका निवारण करण्यासाठींच मूळ मंत्रांतील 'कवि इत्यादि' शब्दांचे व्याख्यान भाष्यकार करतात. ऐका:—

**भा०—एवंभूतोपि सार्वज्ञात्कविरित्येव शब्द्यते ।**
**ब्रह्मादिसर्वमनसां प्रकृतेर्मनसोऽपि च ॥**
**ईशितृत्वान्मनीषी स परिभूः सर्वतो वरः ।**
**सदाऽनन्याश्रयत्वाच्च स्वयंभूः परिकीर्तितः ॥**
**स सत्यं जगदेतादृङ् नित्यमेव प्रवाहतः ।**

अनाद्यनन्तकालेषु प्रवाहैकप्रकारतः ॥
नियमेनैव ससृजे भगवान्पुरुषोत्तमः ।

ज० वि०—एवंभूतो ऽशरीरोऽपि स पुरुषोत्तमः सत्यं प्रवाहतो नित्यमपि जगत्ससृज इति संबंधः । एतादृगिति ॥ सत्यत्वादिना प्रमितमित्यर्थः । ससृज इत्युपलक्षणम् । प्रवाहतो नित्यत्वेपि पूर्वोत्तराणां जगतां वैचित्र्यं संभवति । तन्नास्तीति स्वरूपकथनम् । अनादीति । नियमेन प्रवाहैकप्रकारत इति प्रवाहिणामेकप्रकारत्वमभिप्रैति । तदनेन शाश्वतीभ्यः समाभ्य इति सप्तम्यर्थे व्याख्यातं भवति । अनाद्यनन्तसंवत्सरेषु याथार्थ्येन वर्तमानानपीत्यर्थः । अशरीरस्य जगत्सृष्ट्यादिनिर्वाहार्थमाह—सार्वज्ञादिति । एवाह्येवैवाहीतिवत् कविरित्येव कविरित्येवं परिभवति सर्वं वशीकरोतीति परिभूः सर्वतो वरः। स्वयमेव परमनपेक्ष्य भवतीति स्वयंभूः । सदानन्याश्रयः । चशब्दौ विशेषणसमुच्चयार्थौ । ननु शरीराधीनत्वात्सर्जनादेः कथं सार्वज्ञादिना घटत इत्यत आह—

सिद्धान्ती—अशा प्रकारचा विष्णु अशरीरी आहे, तथापि तो पुरुषोत्तम सर्वज्ञ आहे म्हणून त्याला 'कवि' असें म्हणतात. ब्रह्मादि सर्व देवांच्या व प्रकृतीच्या मनावर त्याचें स्वामित्व असतें; म्हणून त्याला 'मनीषी' असें म्हणतात. तसेंच, तो सर्व-श्रेष्ठ आहे म्हणून त्याला 'परिभू' हें नांव आहे; आणि तो केव्हांही दुसऱ्या कोणाच्याही आश्रयानें राहत नाहीं, म्हणून तो 'स्वयंभू' या विशेषणानें ओळखिला जातो. हा वराहस्मृत्यनुसार भाष्यकारांचा अभिप्राय आहे, आणि विष्णूचे गुण या प्रकारचे आहेत, म्हणून सत्य आणि प्रवाहद्वारा नित्य जगताची उत्पत्ति विष्णूला करितां येते. उत्पत्ति शब्दानेंच स्थिति आणि लय यांचा बोध होतो. सारांश, प्रवाहद्वारा नित्य असणाऱ्या सत्य जगताचींही उत्पत्त्यादिकार्यें त्याला करितां येतात.

पूर्वपक्षी—जगताचा प्रवाह नित्य आहे, हें आम्हांस मान्य आहे. पण वर्तमानकालीन सृष्टीपेक्षां पाठीमागची सृष्टि निराळी असणें, विचित्र असणें, हेंही संभवनीय आहे.

सिद्धान्ती—नाहीं. अनाद्यनंत कालामध्यें सृष्टीचा प्रवाह एक रूपाचाच असतो. कारण पुरुषोत्तमानें तो प्रवाह नियमांनीं बद्ध केला आहे. प्रवाह एकरूप आहे म्हणून प्रवाहांत असणारे पदार्थही एकरूपच असतात, हें सांगण्याचा भाष्यकारांचा कटाक्ष आहे. आणि यावरूनच 'शाश्वतीभ्यः' 'समाभ्यः' ही शब्दद्वयी आपली विभाक्ति सोडून सप्तमीमध्यें परिणत होते. म्हणजे अनाद्य-

नंत कालामध्यें हे सृष्ट्यादिपदार्थ यथार्थ स्वरूपानेंच सदैव स्थित होत असतात, हा अर्थ होतो. आतां, अशरीरी पुरुषोत्तम जगताची उत्पत्ति कशी करूं शकतो ? ' ही शंका, तो सर्वज्ञ आहे, सर्वशक्ति इत्यादि शब्दांनीं नाहींशी केलेली आहे. भाष्यामध्यें जो ' एव ' शब्द आला आहे ह्याचा अर्थ ' याप्रमाणें ' करावयाचा. असें करण्याला मीमांसक भगवान् जैमिनि यांचें वाक्य प्रमाण आहे. सर्वांस वश करितो म्हणून त्याला ' परिभू ' म्हटलें अथवा ' सर्व-श्रेष्ठ ' म्हटलें. कोणाचाही आश्रय न घेतां हा स्वतः सिद्ध असतो, म्हणून याचें ' स्वयंभू ' हें नांव आहे. भाष्यांत दोनदां ' आणि ' हा शब्द आला आहे तो सर्व विशेषणांचा परमेश्वराचे ठिकाणीं समुच्चय दाखवितो. सारांश, परमात्मा अशरीरी, सर्वज्ञ, सर्वनियंता, सर्व-श्रेष्ठ आणि स्वयंभू आहे, हा अभिप्राय आहे.

पूर्वपक्षी—एवंगुण विशिष्ट भगवान् विष्णु आहे, तरी त्याला सर्वज्ञादिगुणांनीं सृष्टि कशी उत्पन्न करितां येईल ?

भा०—सज्ज्ञानानंदशीर्षोऽसौ सज्ज्ञानानंदबाहुकः ।
सज्ज्ञानानंददेहश्च सज्ज्ञानानंदपादवान् ॥
एवंभूतो महाविष्णुर्यथार्थं जगदीदृशम् ।
अनाद्यनंतकालीनं ससर्जात्मेच्छया प्रभुरिति वाराहे॥८॥

ज० वि०—सज्ज्ञानेति । जडशरीराभावेपि सज्ज्ञानाद्यात्मकशीर्षादिमान्भवति । यत एवंभूतस्तस्माज्जगत्ससर्जेति योजना । सज्ज्ञानाद्यात्मकविग्रहवत्त्वमन्येषामविद्यमानम् तस्योपपादयितुं सार्वज्ञादिमाहात्म्यमुक्तमिति भावः । अपरे तु योयमतीतैर्मंत्रैरुक्त आत्मा स स्वेन रूपेण किं लक्षणक इत्यपेक्षायामयं मंत्र इत्युक्त्वा स पर्यगादित्येतदप्यात्मविषयं व्याकुर्वते । स आत्मा पर्यगाद्व्याप्तो भूदिति । तत्त्वसत् । शुक्रमित्यादेर्द्वितीयान्तस्यान्वयाभावप्रसंगात् । न चैतत्प्रथमांतमात्मन एव विशेषणं लिंगव्यत्ययात् । विपरिणामस्त्वगतिका गतिः । स्वयमेव सर्वं भवतीति स्वयंभूरिति च मनीषी परिभूरित्यनेन विरुद्धम् । न चैवंविधमात्मनो निष्कृष्टं रूपं तेषामिति ॥ ८ ॥

सिद्धान्ती—अहो ! त्याला जड शरीर नाहीं हें खरें, तथापि श्रीमान् भाष्यकारांनीं पूर्वोक्त वराहपुराणांतील श्लोक अवतीर्ण केले आहेत, त्यांवरून त्याला कांहीं एक प्रकारचें शरीर आहे, असें तुमच्या ध्यानांत येईल. " प्रभूला सच्चिदानंदात्मक मस्तक आहे, त्याचे हस्तही सच्चिदानंदात्मक आहेत, त्याचा देह व त्याचे चरण सच्चिदानंदात्मकच आहेत. आणि अशा या सच्चिदानंदी देहानें

व देहामध्यें विलास करणारा महाविष्णु स्वेच्छेनें हें सत्य आणि अनाद्यनंत जगत् उत्पन्न करिता झाला. अशा सच्चिदानंदी प्रभूनें हें जगत् उत्पन्न केलें यांत काय आश्चर्य आहे? अशा प्रकारचें शरीर दुसऱ्या कोणालाही नाहीं. हें स्पष्ट करण्यासाठीं व भगवन्माहात्म्य वर्णन करण्यासाठीं श्रीमहाविष्णु कवि आहे, मनीषी आहे, इत्यादि विशेषणें उपयोजिलीं आहेत.

पूर्वपक्षी—बरें, कांहीं भाष्यकार असें म्हणतात कीं 'मागच्या मंत्रांत ज्या आत्म्याचा उल्लेख आला आहे. त्याचें स्वरूप-लक्षण कसें आहे, हें या मंत्रांत सांगितलें आहे.' आणि या मंत्राचा अर्थ परमात्मविषयपर करतात. तो आत्मा सर्व-व्यापी आहे. असा पहिल्या दोन शब्दांचा अर्थ करितात. हाच अर्थ कां ठीक नाहीं?

सिद्धान्ती—तो अर्थ बरोबर आहे, असें समजलें तर शुक्र इत्यादि शब्दांची द्वितीया विभक्ति आहे, त्यांचा अन्वय 'तो' या प्रथमांत सर्वनामाशीं होणार नाहीं. शिवाय, 'हीं विशेषणें नपुंसकलिंगी आहेत' असें म्हणाल तर 'तो' या पुल्लिंगी शब्दाशीं त्यांचा अन्वय होत नाहीं. एवंच, अन्वयाचा अभाव अथवा लिंग-विरोध हे दोष अगतिक आहेत. तुम्ही म्हणतां, हा अर्थ केला तर हे दोष टाळतां येणें शक्यच नाहीं. तसेंच, 'आपणच सर्व स्वतः होणारा' 'सर्वांच्या मनांवर स्वामित्व ठेवणारा,' 'आणि सर्व-श्रेष्ठ असणारा' इत्यादि भगवंताचीं विशेषणें 'भगवानच सर्व आहे, या वाक्याशीं विरोध करितात. आपण सर्व होण्याला, आपण सर्वांच्या मनांचे स्वामी असण्याला व आपण सर्व-श्रेष्ठ असण्याला, आपण व सर्व यांचे अस्तित्व निरानिराळें असलें पाहिजे हा निराळेपणा अद्वैतास मान्य नाहीं, व अशा प्रकारचें स्वरूपही त्यांस संमत नाहीं म्हणून वरील विशेषणें अद्वैतविरोधी आहेत, असें आम्ही म्हणतों असो. तात्पर्य हें आहे कीं, परमेश्वराची उपासना करणारा ज्ञानी भक्त सच्चिदानंदात्मक शरीर धारण करणाऱ्या महाविष्णूशीं सरूपता पावतो आणि शोक-मोह-शून्य होतो. ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**ज० वि०—अंधं तमः प्रविशंतीत्यादिमंत्रानप्रतीत्यन्यथाप्रतीतिनिरासाय स्मृत्यैव व्याचष्टे। अन्यथोपासका इति।**

सिद्धान्ती—ह्या नवव्या मंत्रांत सांगितलेल्या उपदेशाचा प्रत्यय येणार नाहीं किंवा भलताच प्रत्यय येईल, हें टाळण्यासाठीं या मंत्राचा अर्थ भगवान् भाष्यकार स्मृतीच्या आधारानें स्पष्ट करितात:—

**भा०—अन्यथोपासका ये तु तमोंधं यांत्यसंशयम्।**
**ततोऽधिकमिव व्यक्तं यान्ति तेषामनिन्दकाः॥**

तस्माद्यथास्वरूपं तु नारायणमनामयम् ।
अयथार्थस्य निंदां च ॥ ९।१० ॥

ज्ञ० वि०–यथावत्परमात्मज्ञानं मोक्षसाधनमित्युक्तम् । न केवलं तत् । किं नामान्यथाज्ञाननिन्दासमुचितमेवेत्येतदर्थप्रतिपादकमाद्यमंत्रत्रयम् । तत्र तावद्यथावज्ज्ञानस्येवान्यथाज्ञाननिन्दाया अप्यावश्यकत्वोपपादनायान्यथाज्ञानस्योक्तमसुर्यलोकसाधनत्वमनूद्यान्यथाज्ञानानिन्दनस्य ततोऽधिकानर्थसाधनत्वमाद्येन मंत्रेणोच्यते । तस्यार्थोऽन्यथेति । उपासकाः विष्णोरिति शेषः । सर्वत्र ज्ञानशब्दस्योपासनापर्यंतत्वाद्यामिश्रोक्तिः । तत्राविद्यापदं विषयिवाचकं विषयस्यान्यथाकारस्य लक्षकमित्याभिप्रेत्याविद्यामुपासत इत्येतदन्यथोपासका इति व्याख्यातम् । ततोऽन्यथाज्ञानिप्राप्यात्तमसोऽधिकामिव । इवार्थमाह । व्यक्तमिति । उशब्दोवधारणार्थः । विद्यायामित्यनेन संबध्यते । तेन विद्यायां यथार्थज्ञान एव रताः नत्वन्यथाज्ञाननिंदां कुर्वंतीत्येषोर्थो लभ्यते । अत उक्तं तेषामनिंदका इति । ततः किमित्यतो वक्ति–तस्मादिति । यस्मान्मिथ्याज्ञानतदनिंदाभ्यां तमःप्राप्तिः । निंदां च विद्यादिति शेषः । अयथार्थस्य निंदामिति । अयथार्थज्ञानस्य निंद्यत्वमित्यर्थः ॥ ९ ॥

सिद्धान्ती—जे अन्यथा उपासना करितात ते निःसंशय अंधतम प्रदेशांत जातात. शिष्या! मागें अनेक वेळ सांगितलें आहे कीं, परमात्म्याचें यथार्थ ज्ञान हें मोक्षसाधन आहे. पण इतक्यानेंच इष्ट कार्यभाग आटपत नाहीं, तर अन्यथाज्ञानानें कोणते अनर्थ उत्पन्न होतात हें सांगून अन्यथाज्ञानाची निंदा करणें हेंही यथार्थ ज्ञानासह अवश्य असलें पाहिजे, हें सांगण्यासाठीं पुढील तीन मंत्रांची योजना आहे. यथार्थ ज्ञानाप्रमाणेंच अयथार्थ (अन्यथा) ज्ञानाची निंदा अवश्य आहे, त्याचें प्रतिपादन करण्यासाठीं ‘ अन्यथाज्ञानानें असुर्य लोकाप्रत जावें लागतें ’ हें तिसऱ्या मंत्रांत सांगितलें. आतां, या मंत्रांत जे अन्यथाज्ञानाची निंदा करीत नाहींत, ते अधिक दुःखात्मक लोकाप्रत जातात असें अधिक सांगावयाचें आहे, असा प्रकार पहिल्या मंत्रांत तुला दिसेल. येथें सर्वत्र ज्ञान शब्दाचा उपासनेपर्यंत अर्थविस्तार होतो म्हणजे ज्ञानाचा अर्थ केव्हां बोध, केव्हां उपासना आणि केव्हां बोध व उपासना असा होतो. मंत्रांत जें “ अविद्या ” पद आहे तें विषयि–वाचक आहे, विषयाचें जें अन्यथा स्वरूप त्याला दाखविणारी ती अविद्या होय आणि इचे उपासक म्हणजे अन्यथोपासक होत. एवंच अन्यथा स्वरूपाची उपासना करणारे ( अविद्येची उपासना करणारे ) ते अंधतम लोकाप्रत जातात, आणि यांच्या पेक्षांही अत्यंत कष्ट–मय प्रदेशांत ते लोक जातात कीं, जे केवळ विद्येम-

मध्येंच रममाण होतात, विद्येमध्यें म्हणजे यथार्थ ज्ञानामध्येंच जे रममाण होतात, अन्यथाज्ञानाची निंदा न करितांना केवळ यथार्थ ज्ञानाचीच जे उपासना करितात, ते अंधतमापेक्षांही जास्त स्पष्ट अशा कष्टमय प्रदेशांत जातात. सारांश, तात्पर्य हें आहे कीं, अविद्येची निंदा न करितां, किंवा अविद्याही अनर्थकारिणी आहे, असें जाणूनही तिची निंदा न करितां, जे केवळविद्येची म्हणजे यथार्थ ज्ञानाची उपासना करितात, ते अगम्य आणि अचिंतनीय अशा कष्ट-मय प्रदेशाप्रत जातात. म्हणून ज्या अर्थी मिथ्या ज्ञान व मिथ्या ज्ञानाच्या निंदेचा अभाव या दोन्ही गोष्टी तमः-प्राप्तीला मात्र कारण होतात, अतएव ज्या अर्थी विद्येच्या उपासने बरोबरच अविद्येची निंदा करणें आवश्यक आहे, त्या अर्थी शुद्ध, यथा-स्वरूप जो नारायण त्याचें निर्विकार स्वरूप ज्ञानपूर्वक उपास्य करून त्याच्या अयथार्थ स्वरूपाची ज्ञानतः निंदा करावयाची या वृत्तीचा प्रत्येक मुमुक्षूंनें अंगीकार केला पाहिजे. सारांश; अयथार्थ ज्ञान निंद्य आहे, हें समजून यथार्थ ज्ञानाची ( नारायणाच्या स्वरूपाची ) ज्ञानपूर्वक उपासना करावी, हें तात्पर्य आहे. ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा.

**ज० वि०—किं विपक्षे अनर्थप्राप्तेरेव सम्यग्ज्ञानासम्यग्ज्ञाननिंदयोः कर्तव्यता, नेतिब्रूमः। किंतु मोक्षफलस्यांशत उभयसाध्यत्वादपीति प्रतिपादकोन्यदेवाहुर्विद्ययेति द्वितीयमंत्रः। तथाहि। विद्यया यथार्थज्ञानेनान्यदेव मोक्षैकदेशलक्षणं फलं प्राप्यमाहुर्वृद्धाः। अविद्यया अन्यथाज्ञाननिंदया चेति यावत्। अन्यदेव फलमाहुरिति धीराणां धीमताम् वृद्धवचनसंमतियुक्तं वचनं शुश्रुम। ये धीराः नोऽस्मभ्यं मोक्षसाधनं विचचक्षिरे व्याचचक्षिरे। तस्मादुपपन्नः समुच्चय इति ॥ १० ॥**

पूर्वपक्षी—कोणताही पक्ष घेतला तरी, म्हणजे विद्येची उपासना केली किंवा अविद्येची केली तरी अनर्थ प्राप्तीचाच प्रसंग येतो; तेव्हां यथार्थ ज्ञानाचें, सम्यग्ज्ञानाचें, संपादन करणें व असम्यग्ज्ञानाची निंदा करणें येवढेंच कर्तव्य आहे कीं काय? यांचा फलद्रूप उपयोग कांहींच नाहीं कीं काय?

सिद्धान्ती—छेः छेः! असें नाहीं. आतांच आम्ही सांगितल्याप्रमाणें यथार्थ ज्ञानाचें संपादन आणि अयथार्थ ज्ञानाची निंदा हीं दोन्ही मोक्ष-फल देण्याला अंशतः समर्थ आहेत. आणि हेंच आतां दहाव्या मंत्रांत सांगावयाचें आहे. यथार्थ ज्ञानानें मोक्षाचें एकदेशी मात्र फल मिळतें व अयथार्थ

ज्ञानाच्या निंदेनें निराळेंच फल (एक देशी मोक्षफल, मिळतें असें संप्रदाय जाणणाऱ्या) बुद्धिमान् वृद्ध लोकांचें म्हणणें आहे. ज्या बुद्धिमान् पुरुषांनीं आम्हांला मोक्षाच्या साधनांचा बोध केला, त्यानीं आम्हांस सांगितलें आहे कीं विद्येची उपासना आणि अविद्येचा उपहास हीं साधनें निरनिराळीं अंगीकृत केलीं म्हणजे मोक्षाचें एकदेशी मात्र फल मिळतें. म्हणून ह्या उभयतांचा समुच्चय करावा म्हणजे त्या समुच्चय–सामर्थ्यानें मोक्षपदवी प्राप्त होईल. हें म्हणणें योग्यच आहे. ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा.

**ज० वि०—अस्यैवार्थस्य विवरणार्थो विद्यां चेति तृतीयो मंत्रः । तस्येदं व्याख्यानं ये विदुरिति ॥**

सिद्धान्ती—ह्या वरील अर्थच जास्त स्पष्ट करण्यासाठीं मागें सांगितलेल्या त्रयीपैकीं तिसऱ्या (क्रमानें ११ व्या) मंत्राचा अवतार केला आहे. ह्याचें व्याख्यान असें:—

**भा०—ये विदुः सह सज्जनाः ॥**

**ज० वि०—यथास्वरूपं त्वित्याद्युक्तावृत्यान्वयः । तेन विद्यापदं ईश्वरयाथात्म्यस्याविद्यापदं चान्यथाज्ञाननिंद्यत्वस्योपलक्षणमित्युक्तं भवति । सहेत्येकपुरुषार्थहेतुत्वेनेत्यर्थः ।**

नवव्या व दहाव्या मंत्रांत नारायणाचें यथार्थ स्वरूपज्ञान, व अयथार्थ स्वरूपाची निंदा ह्यांचा विद्या व अविद्या या शब्दांनीं उल्लेख केला, तोच अन्वय लक्ष्यांत ठेवून भाष्यकार म्हणतात कीं, ‘ विद्या ’ शब्दानें परमेश्वराचें यथार्थ ज्ञान व ‘ अविद्या ’ शब्दानें अयथार्थ ज्ञानाची निंदा, असे अर्थ घ्यावयाचे आहेत. विद्या व अविद्या हे शब्द केवळ उपलक्षणपर आहेत. असो; मंत्रांतील ‘ सह ’ शब्दाचा अर्थ एकपुरुषार्थाचा हेतु मनांत ठेवून जे ज्ञानी व धर्मशील लोक असतात, ते पुढील फळें पावतात.

**भा०—ते निंदयाऽयथार्थस्य दुःखाज्ञानादिरूपिणः ।**
**दुःखाज्ञानादिसंतीर्णाः सुखज्ञानादिरूपिणः ।**
**यथार्थस्य परिज्ञानात्सुखज्ञानादिरूपताम् । यान्ति ॥११॥**

**ज० वि०—दुःखाज्ञानादिरूपिणोऽयथार्थस्येति । तज्ज्ञानस्येत्यर्थः । अयथार्थज्ञाननिंदया मृत्युपदोदितदुःखादितरणं भवति । यथार्थज्ञानेन च सुखज्ञानादिरूपलक्षणामृतप्राप्तिर्भवतीत्येत-**

दुपपादनाय दुःखाज्ञानादिरूपिणोऽयथार्थस्य सुखज्ञानादिरूपिणो यथार्थस्येति विशेषणोपादानं कृतम्। तथा च श्रुतिः। तं यथायथोपासते तदेव भवतीति ॥ ११ ॥

सिद्धान्ती—दुःख आणि अज्ञान इत्यादि हींच ज्यांचीं फलें व लक्षणें आहेत, त्या नारायण स्वरूपाच्या अवास्तविक स्वरूपज्ञानाची तीव्र निंदा केली असतां 'मृत्यु' शब्दानें ज्या दुःखसंततीचा बोध होतो, ती संतति किंवा दुःखसागर या अविद्या-निंदकाला तरून जातां येतो; तसेंच सुख आणि ज्ञान इत्यादि ज्याचीं लक्षणें (फलें) आहेत, त्या नारायणस्वरूपाच्या यथार्थ ज्ञानाची प्राप्ति करून घेतली तर सुखज्ञानादिरूप अमृताची (मोक्षाची) प्राप्ति होते. हें स्पष्टपणें व निश्चितार्थानें (मंत्र ११ इ०) सिद्ध होऊन लक्ष्यांत यावें म्हणून भाष्यकारांनीं यथार्थ ज्ञानाला सुखज्ञानादि व अयथार्थज्ञानाला दुःखज्ञानादि विशेषणें उपयोजिलीं आहेत. या त्यांच्या सिद्धान्ताला श्रुतीचाही आधार आहे. "भक्त ज्या स्वरूपानें परमेश्वराची आराधना करितो, त्या स्वरूपासारखें स्वरूप तो प्राप्त करून घेतो.' ॥ ११ ॥

---

## मंत्र बारावा.

ज० वि०—अन्यथाज्ञानमेवानर्थसाधनं यथार्थज्ञानमेव मोक्षसाधनमित्येतद्विवरणार्थमंधंतमः प्रविशंतीत्युत्तर-मंत्रत्रयम्। तत्राद्यमंत्रस्यार्थः ॥

सिद्धान्ती—अन्यथाज्ञान हें अनर्थ उत्पन्न करण्याचें मात्र साधन आहे व यथार्थज्ञान हेंच मोक्षाचें साधन आहे, हे श्रुतीला सांगावयाचें आहे म्हणून ह्या पुढील तीन मंत्रांचें अवतार-प्रयोजन आहे. आतां प्रथम पहिल्या (क्रमानें १२ व्या) मंत्राचा अर्थ भाष्यकार करितातः—

भा०—एवं सृष्टिकर्तृत्वं नांगीकुर्वंति ये हरेः।
तेपि यांति तमो घोरं तथा संहारकर्तृताम् ॥
नांगीकुर्वन्ति तेऽप्येवं तस्मात्सर्वगुणात्मकम्।
सर्वकर्तारमीशेशं सर्व-संहारकारकम् ॥ १२।१३ ॥

ज० वि०—एवमिति। यथाऽन्यथोपासकाः अन्यथाज्ञाननिंदका इत्यर्थः। असंभूतिं जगत्सृष्टेरकर्तारमित्यस्य तात्पर्यम्-सृष्टीति। अत्राप्युशब्दोऽवधारणार्थः। संभूत्यामित्यनेन संबध्यते तेन संभूत्यां उ जगत्स्रष्टृत्व एव। जगत्स्रष्टैव विष्णुः न तु संहारकर्तेत्यस्मिन्नर्थे रता इत्येषोऽर्थो लभ्यते। तस्मादुक्तं-तथेति। तेऽप्येवं सृष्टिकर्तृत्वा-

नंगीकारिण इव तमो यान्तीत्यर्थः । ततः किमित्याह-तस्मादिति । यस्मादेवं सृष्टिकर्तृत्वानंगीकारेऽनर्थः । विद्यादिति वाक्यशेषः । सृष्टिकर्तृत्वानंगीकारेऽनर्थकथनमुपलक्षणार्थमिति ज्ञापयितुं सर्वगुणात्मकमित्युक्तम् । एतदप्युपलक्षणम् । उपसंहारेऽधिकस्यापि वक्ष्यमाणत्वात् ॥ १२ ॥

सिद्धान्ती—याप्रमाणें म्हणजे अन्यथाज्ञानाची निंदा न करितां त्या अवास्तविक ज्ञानाची 'असंभूतीची ( जगत्कर्ता जो नाहीं त्याची ) जे लोक उपासना करितात, म्हणजे 'हरि हा सृष्टीचा उत्पादक आहे' हें तत्त्व ज्यांस संमत नसतें, ते लोक घोर तमामध्यें प्रवेश करितात.

शिष्य—येथें 'संभूति' म्हणजे हरीचें जगत्कर्तृत्व ज्यांस मान्य आहे, ते लोक ना ?

सिद्धान्ती—होय, या संभूति शब्दाशीं 'उ' या अवधारणा ( निश्चय ) उत्पन्न करणाऱ्या अव्ययाचा अन्वय करून त्याचा 'मात्र' असा अर्थ करावयाचा आहे. सारांश, जे लोक 'हरि हा सृष्टि उत्पन्न करणारा मात्र आहे, तो जगत्संहारकर्ता नाहीं' असा अर्थ समजून घेऊन, हरिसंबंधीं जगत्स्रष्टृत्वाचें मात्र स्वरूप ध्यानांत धरून त्यांतच रममाण होतात, त्याच स्वरूपाची उपासना करितात, ते लोकही वरील लोकांप्रमाणेंच घोर व भयंकर तमामध्यें जाऊन पडतात. 'हरि हा जगदुत्पादक नाहीं' असें म्हणणाऱ्यांची जी गति, तीच 'हा संहारकर्ता नाहीं' असें म्हणणाऱ्यांची आहे. सारांश, दोघांसही अमंगल गति प्राप्त होते.

शिष्य—मग आम्ही आतां करावयाचें तरी काय? या पुढें काहीं तरणोपाय सांगितला आहे कीं नाहीं ?

सिद्धान्ती—आहे तर ! बाबा ! ज्या अर्थीं सृष्टिकर्तृत्व स्वीकारलें नाहीं तर अनर्थ उत्पन्न होतात, त्या अर्थीं हरीचें पूर्ण स्वरूप जाणून घेणें अत्यंत अगत्याचें आहे.

शिष्य—तो जगत्कर्ता व जगत्संहारकर्ता आहे, हेंच जाणावयाचें ना ?

सिद्धान्ती—हीं विशेषणें तर केवळ उपलक्षणें आहेत. यांनीं का हरीचें स्वरूप समजणार ? 'सर्वगुणात्मक तो हरि आहे' याचें केवळ 'हरीचें जगत्कर्तृत्व' हें एक उपलक्षण मात्र आहे. तो सर्वगुणात्मक आहे, इतक्यानें सुद्धां हरीचें पूर्ण स्वरूप-वर्णन होत नाहीं. असो; तो सर्वगुणात्मक, जगत्कर्ता, देवदेवेश्वर, जगत्संहारकर्ता इत्यादि प्रकारांनीं त्याचें स्वरूप समजून घेतलें पाहिजे. तेव्हां येथील सर्व अनर्थ आपल्यास टाळतां येतील. असो; याचा आणखी विस्तार उपसंहारांत श्रीमान् भाष्यकारच स्वतः करणार आहेत. ॥ १२ ॥

---

## मंत्र तेरावा.

ज० वि०—किं विपक्षे बाधकसद्भावादेवैतज्ज्ञातव्यम् । नेति ब्रूमः । किंतु मोक्षोपयोगित्वादपीति प्रतिपादयितुमन्यदेवाहुः संभवादिति द्वितीयो मंत्रः । तत्र संभवात्सृष्टिकर्तृत्वज्ञानादसंभवात्संभवविपरीतसंहारकर्तृत्वज्ञानादित्यर्थः ॥ १३ ॥

शिष्य—भगवन्! प्रतिपक्ष्याच्या म्हणण्याला बाध आणावयाचा, एतदर्थच का 'हरि सृष्टीचा उत्पत्तिकर्ता किंवा तिचा संहारकर्ता आहे' हें जाणून घ्यावयाचें!

सिद्धान्ती—छेः रे! या ज्ञानाचा उपयोग मोक्षप्राप्तीकडेही व्हावयाचा असतो. हें सांगण्यासाठींच या त्र्यींतील दुसऱ्या (क्रमानें १३ व्या) मंत्राची योजना आहे. येथें 'संभवाहून' (सृष्टिकर्तृत्वज्ञानाहून) व 'असंभवाहून' (सृष्टिसंहारकर्तृत्वज्ञानाहून) मोक्षसाधन निराळें आहे, असा नुसता उपक्रम करून पुढील मंत्रांत मोक्षसाधनाचें स्वरूप सांगितलें आहे ॥ १३ ॥

---

## मंत्र चवदावा.

ज० वि०—तस्यैव विवरणार्थं संभूतिं चेति तृतीयो मंत्रः ।
तस्यार्थः—

सिद्धान्ती—मागील मंत्राचा अर्थ विशद करण्यासाठींच त्र्यींतील तिसरा (क्रमानें १४ वा) मंत्र आहे. त्याचा अर्थ ऐकः—

भा०—यो वेद संहृतिज्ञानाद्देहबंधाद्विमुच्यते ।
सुखज्ञानादिकर्तृत्वज्ञानात्तद्व्यक्तिमाव्रजेत् ॥
सर्वदोषविनिर्मुक्तं गुणरूपं जनार्दनम् ।
जानीयान्नगुणानां च भागहानिं प्रकल्पयेत् ॥
न मुक्तानामपि हरेः साम्यं विष्णोरभिन्नताम् ।
न वै प्रचिंतयेत्तस्माद्ब्रह्मादेस्साम्यमेव वा ॥
मानुषादिविरिंचान्तं तारतम्यं विमुक्तिगम् ।
ततो विष्णोः परोत्कर्षं सम्यग्ज्ञात्वा विमुच्यते ॥
इति कौर्मे ॥ १४ ॥

ज० वि०—यो वेदेति । पूर्ववदावृत्त्यैवान्वयः । संहृतिज्ञानादिति । तत्कर्तृत्वज्ञानादित्यर्थः । देहसंबंधस्य मृत्युत्वं तद्धेतुत्वाज्ज्ञातव्यम् । सुखज्ञानादिति पूर्ववद्युक्तिसूचनार्थम् । मंत्रार्थमुपसंहरति । तस्मादिति वक्ष्यमाणमादौ योज्यम् । हरेस्साम्यं न चिंतये-

दिति वक्ष्यमाणेनान्वयः । विष्णोरभिन्नतां मुक्तानामित्यनुवर्तते । ब्रह्मादेरमुक्तवर्गस्य साम्यमेव । किमुताभिन्नताम् । वाशब्दो न चिंतयेदित्यस्यानुकर्षणार्थः । मानुषादित्यत्र जानीयादित्यनुवर्तते । ततो मुक्तामुक्तगणात्तस्मादिति परामृष्टहेतुं दर्शयति-सम्यगिति । केचिदविद्यापदं कर्मवाचकम् मत्वैकैकनिन्दया मोक्षे ज्ञानकर्मणोः समुच्चयस्य प्रतिपादकमाद्यमंत्रत्रयमिति मन्यन्ते । अन्ये तु विद्यापदं देवताज्ञानस्य वाचकं मत्वा स्वर्गादौ तस्य कर्मणा समुच्चयं प्रतिपादयतीदमित्याचक्षते । उत्तरं तु मंत्रत्रयं संभूत्यसंभूतिपदयोरुत्पत्यनुत्पत्तिमत्परं हिरण्यगर्भप्रकृतिवाचकत्वं गृहीत्वा तदुपासनयोः सत्यलोकादिप्राप्तौ समुच्चयस्य प्रतिपादकमिति प्रतिपन्नाः । तदेतदपव्याख्यानम् । पुराणवाक्येनैवान्यथा व्याख्यातत्वात् । नान्यः पंथेत्यादिश्रुतिविरुद्धश्च समुच्चयपक्षः । केवलकर्मिणोऽप्यधिकः केवलज्ञानिनः संसार इति च कामकारेण चैके इत्यादिविरुद्धम् । आत्मज्ञाननिष्ठाया एवात्रोपक्रमादिभिर्निर्णीतत्वाद् देवताज्ञानकर्मणोः समुच्चयश्च न प्रकरणानुगुणः । कुर्वन्नेवेति मंत्रस्यापि निवृत्तकर्मतया व्याख्यातत्वात् । संभूतिं च विनाशं चेत्यत्र कुतोऽयं विनाश आपतित इति चिंत्यम् । विनाशधर्मकत्वाद्विनाशो हिरण्यगर्भ इति चेन्न । संभूतिपदेन पौनरुक्त्यात् । अव्याकृतोक्त्यभावाच्च । अकारलोपेन संभूतिरव्याकृतमित्यपूर्वं व्याकरणकौशलमित्यास्ताम् ॥ १४ ॥

सिद्धान्ती—मागें सांगितलेले परमेश्वराचे गुण ज्याला समजले, विद्या व अविद्या या उभयतांचें सहज्ञान झालें, त्याला संहार करणारा जो परमेश्वर त्याचें संहारकत्वात्मक ज्ञान होऊन तो देहबंधापासून मुक्त होतो. देहबंधावर मृत्यूची लक्षणा करून देहबंध म्हणजेच मृत्यु असें म्हणण्याचा भाष्यकारांचा आशय आहे. देहबंध आणि मृत्यु यांत कार्यकारणभाव संबंध आहे. असो; त्या मृत्युहेतूचें कारण संहारकर्ता परमेश्वरच आहे, असें भक्तितः जाणिलें म्हणून हा ज्ञाता मृत्युसागर तरून जातो, व देहबंधांतून सुटतो. तसेंच—सुखज्ञानादि फल परमेश्वराच्या यथार्थ ज्ञानापासून मिळतें म्हणून त्या परमेश्वराचें यथार्थज्ञान भगवदुपासनारूपी युक्तीनें मिळविलें म्हणजे सुखज्ञानादि अमृत स्पष्टतेनें प्रकट होतें. असो; यापुढें भाष्यकार मंत्राचें तात्पर्य सांगतात. ऐक—' म्हणून सर्वदोषांपासून सर्वथा अलिप्त व सर्व सद्गुणांनीं युक्त जो जनार्दन त्याचें स्वरूपज्ञान पूर्णपणें जाणून घ्यावें. गुणामध्यें केव्हांही भागत्यागलक्षणा आहे किंवा जनार्दन निर्गुण आहे, असें मानूं नयें किंवा वेदानें जे गुण त्यांत आहेत, असें सांगितलें आहे त्यांत आपल्या मतानें कांहीं जास्त करूं नये किंवा कमीहि करूं नये. तसेंच

मुक्त लोक हरिनामक परमेश्वराच्या बरोबरीचे आहेत किंवा विष्णूशीं मुक्तांचा सर्वथा अभेद आहे, ब्रह्मादिक आपल्यासारखेच संसारी आहेत व आपल्याच वर्गांतील असून आपल्याशीं अभिन्न आहेत, इत्यादि वेडगळ कल्पना मनामध्यें आणूं नयेत. शिष्यराया! 'मनुष्यापासून तों ब्रह्मदेवापर्यंत मुक्त व अमुक्त या वर्गांत अनेक पायऱ्या आहेत म्हणजे श्रेष्ठ-कनिष्ठ असें तारतम्य आहे, विष्णु तर सर्वश्रेष्ठ आहे' असें खरें ज्ञान झालें असतां ज्याअर्थीं जीव मुक्त होतो, त्याअर्थीं प्रत्येक जीवानें परमेश्वर षड्गुणैश्वर्यसंपन्न, सर्वश्रेष्ठ, सर्वाधार, सर्वदयाघन, सर्वोत्पत्ति-संहारकर्ता इत्यादि अनंत मंगलगुणप्रपूर्ण आहे, असें एकनिष्ठ चिंतन केलें पाहिजे, असा मंत्राचा भावार्थ भगवान् भाष्यकारांनीं काढिला आहे व तो सर्वप्रकारें योग्य आहे. ज्याला मुक्त व्हावयाचें असेल, दुःखाचा परिहार सर्वथा करून अत्यंत सुखाचा आस्वाद घ्यावयाचा असेल, त्यानें हरीची उत्तम उपासना करून त्याच्या गुणांचें अखंड चिंतन करावें, व त्याच्याशीं नित्य सेवकवृत्तीनें रहावें.

शिष्य—भगवन्! येथें श्रीमान् भाष्यकारांनीं अविद्या म्हणजे अन्यथाज्ञानाची निंदा व विद्या म्हणजे यथार्थज्ञान स्वीकार असे अर्थ केले आहेत. पण रामानुजादि कित्येक भाष्यकार अविद्या म्हणजे कर्म व विद्या म्हणजे ज्ञान असे अर्थ करून 'नुसता कर्मठ व नुसता ज्ञानी, हे दोघेही दुःखच भोगतात, म्हणून मुमुक्षूनें कर्मज्ञान यांचा समुच्चय करावा' असा पहिल्या तीन मंत्रांचा अर्थ करितात. दुसरे कोणी वैदिककर्मवादी विद्या म्हणजे इंद्रादिदेवतांचें ज्ञान, असा अर्थ करून स्वर्गामध्यें ज्ञानकर्मांचा समुच्चय होतो, असें म्हणतात. तसेंच शंकरस्वामी येथील दुसऱ्या मंत्रत्रयांत 'संभूति, असंभूति' शब्दांचे 'उत्पत्ति, अनुत्पत्ति' असे अर्थ करून संभूति म्हणजे हिरण्यगर्भ' व असंभूति म्हणजे प्रकृति होय, असें स्पष्ट म्हणतात व हिरण्यगर्भ व अव्यक्त या उभयतांची सहोपासना केली असतां सत्यलोकाची प्राप्ति होते, असा कर्मज्ञानाचा समुच्चय प्रतिपादितात. तेव्हां येथें हा घोंटाळा काय आहे तो कृपा करून मला उलगडून सांगा. हें मतवैचित्र्य पाहून आमच्यासारख्यांचा ब्रह्मगोंधळ होतो. कृपा करा आणि माझा बुद्धिनिश्चय करा.

सिद्धान्ती—अरे! हीं सगळीं अपव्याख्यानें आहेत. प्रत्यक्ष श्रीमद्व्यासोक्त पुराणें जर 'ज्ञानकर्मांचा समुच्चय निंद्य आहे,' असें म्हणतात, जर प्रत्यक्ष सर्वज्ञ श्रुतिच म्हणते कीं 'मोक्षाला ज्ञानाशिवाय दुसरें साधनच नाहीं' तर तूं हे आतांच उध्दृत केलेले अवैदिक पक्ष अशुद्ध आणि अनर्थकारी आहेत, हें सांगावयास हवें काय? हे खुळे लोक काय बडबडतील याचा पत्ताच नाहीं. पहा कीं या अचरटांनीं असें प्रतिपादिलें आहे कीं केवल ज्ञानोपासकांस केवल कर्मउपासकांपेक्षां जास्त दुःखाच्या संसारांत पडावें लागतें! सामान्य मनुष्य सुद्धां असें भकणार नाहीं. ज्ञानानें संसारशृंखला अधिक घट्ट होते हा या

लोकांचा अपूर्वबोध आहे ! असो हा वाद असत्य आहे, हें सामान्य मनुष्यास कळतें, तर हा वेदविरुद्ध आहे किंवा श्रुति या मताची निंदा करिते, हें सांगावयास सुद्धां नको आहे.

शिष्य—पण मला एखादा तरी आधार दाखवून ठेवा.

सिद्धान्ती—' कामचारेण ' इत्यादि ब्रह्मसूत्र पहा,—व त्यांतच जिचा समावेश होतो ती ' कामचाराः, कामभक्षाः, कामवादाः ' इत्यादि ( वाटेल तें खाणारे, वाटेल तसें वागणारे व वाटेल तें बडबडणारे ) ही श्रुति पहा.—म्हणजे तुझी खातरी होईल कीं, हा पक्ष असत् आहे. ज्ञानानें संसारनिवृत्ति होतेना ? मग हेंच ज्ञान ' संसाराची वृद्धि करतें ' असें कोणी वृथा—पांडित्य करील, तर त्याला लोक ' वेडा ' ठरवितात !

शिष्य—पण शंकराचार्यादि विद्वान् लोक असें ह्मणतातना ? त्यांनींच हा ज्ञानकर्मसमुच्चय पक्ष उत्थापित केला आहे.

सिद्धान्ती—शंकराचार्य असोत किंवा त्यांचे दुसरे कोणी असोत, त्यांना ज्ञानकर्मांचा समुच्चय करितां येणें शक्यच नाहीं. यात्र उपनिषदांत पाहिनास ? पहिल्यापासून शेवटपर्यंत आत्मनिष्ठेचा उपदेश आहे. येथें यांच्या ज्ञानकर्मसमुच्चयाची डाळ कशी शिजणार ?

शिष्य—पण दुसराच मंत्र कर्मपर आहे, असें ते म्हणतील कीं !

सिद्धान्ती—पण तूं कसा ऐकशील ? लागलाच सांगशील कीं हा मंत्र सुद्धां कर्मनिवृत्तिपर आहे. आपण नाहींका याचा अर्थ तसाच केला ! बरें; तूं या शाहण्या पंडितांस असें विचार कीं जर तुम्ही ' संभूति ' शब्दानें ' हिरण्यगर्भ ' व ' असंभूति ' शब्दानें ' प्रकृति ' असे अर्थ समजतां, तर या १४ व्या मंत्रांतील ' विनाश ' शब्दाच्या अवताराची कशी वाट लावितां ? हा ' विनाश ' शब्द आला कोठून ? संभूतीच्या उलट असंभूति हा शब्द यावा. पण ' विनाशा ' ची ही स्वारी कोठली आली ?

शिष्य—' विनाश ' शब्दानें ' हिरण्यगर्भ ' हा अर्थ घ्यावा; कारण हिरण्यगर्भाचा ' विनाशत्व ' हा गुण आहे. जगत्प्रलयकालीं हिरण्यगर्भाचाही अंत होतोना ? शिवाय, ' हिरण्यगर्भ ' जर सर्व—विनाशक आहे, तर विनाशकारणाला ' विनाश ' म्हणून लक्षणा केली म्हणजे झालें !

सिद्धान्ती—तें ठीक. पण असा अर्थ जुळेल कसा ? ' संभूति ' शब्दाचा अर्थ ' हिरण्यगर्भ ' केला आहेना यांनीं ? येथें या मंत्रांत ' विनाश ' म्हणजे ' हिरण्यगर्भ ' हा अर्थ पत्करिला तर ' संभूती ' च्या ' हिरण्यगर्भाची ' व्यवस्था कशी ? पुनरुक्तीचा दोष येणार ! शिवाय, कारणालाच कार्य करावयाचें ' बापालाच मुलगा करावयाचें ' हें लक्षणानुसंधान उत्तमच आहे ! तिसरा दोष

हा आहे कीं, या मंत्रांत 'असंभूतीचा (अव्याकृताचा)' उच्चारच नाहीं. मंत्रांतच ज्याची संभूत-वार्ता नाहीं, तो अव्याकृत शब्दार्थ आणतां कोठून ?

**शिष्य**—असंभूतीचा अर्थ 'अव्याकृत' असा आहे.

**सिद्धान्ती**—पण तो 'असंभूति' शब्द तरी कोठें आहे ?

**शिष्य**—'संभूति' शब्दाचीच व्युत्पत्ति अशी आहे कीं, या शब्दांतील 'अ' वर्णाचा लोप झाला आहे. येथें 'संभूति' म्हणजे 'असंभूति' असें समजावयाचें; आणि असंभूति म्हणजे अव्याकृत प्रधान, मूलप्रकृति असा अर्थ करावयाचा. ही व्यवस्था केली म्हणजे पुनरुक्ति गेली, शब्दाचा उच्चार झाला, व लक्षणेचीही ठीक व्यवस्था जुळली.

**सिद्धान्ती**—वाहवा! वाहवा!! आपल्या ह्या लक्षणेच्या, 'अ' कार लोपाच्या, कल्पनांना आपले व्याकरणशास्त्रज्ञानाला, व आपले ग्रंथव्याख्यानपांडित्याला 'अपूर्व कुशलता' असें नांव द्यावें! काय साहस हें ? अरे! प्रत्यक्ष श्रुतीलाही हरताळ फांसायला हे अद्वैती तयार झाले आँ. पुरे. यांचें हें अनर्थकारी बालिशत्वाचें पुराण पुरे कर. नुसतें श्रवण केलें तर पंचमहापातकें लागावयाचीं. विष्णवे नमः! असो; पुढें चला आतां. विष्णवे नमः ॥ १४ ॥

---

## मंत्र पंधरावा.

**ज० वि०—एवं प्राप्ताधिकारं शिष्यं प्रति परमात्मस्वरूपं निरूप्य तत्साक्षात्कारो मोक्षसाधनमित्यतीतग्रंथेनोक्तम्। स चेश्वरसाक्षात्कारो न श्रवणादिमात्रेण भवति। नाऽपि मोक्षः साक्षात्कारमात्रेण। किं तु भगवत्प्रसादादेवेत्यतोऽनुष्ठितश्रवणादिकेनापि साक्षात्कारार्थं प्राप्तसाक्षात्कारेणापि च मोक्षार्थं यथा भगवत्प्रार्थनं कार्यं तत्प्रकारप्रदर्शनार्थो हिरण्मयेन पात्रेणेत्याद्युत्तरो ग्रंथः। तत्र सगुणब्रह्मप्राप्त्यर्थमेकर्षिप्रभृतिशब्दाभिधेयमादित्यं प्रति मार्गयाचनमनेन क्रियत इत्याद्यन्यथाप्रतीतिनिरासाय तद्व्याख्यानरूपां स्मृतिं तावदुदाहरति—**

**सिद्धान्ती**—याप्रमाणें ज्याला वेदान्तश्रवणाचा अधिकार प्राप्त झाला आहे, त्यास परमात्म-स्वरूपाचा उपदेश केला व परमात्म-साक्षात्कार झाला असतां मोक्ष मिळतो, असें येथपर्यंत झालेल्या ग्रंथानें सांगितलें. आतां, या पुढील ग्रंथांत कांहीं गोष्टी सांगावयाच्या आहेत, तिकडे मुमुक्षूंचें लक्ष्य असावें. (१) प्रथम ही गोष्ट विसरावयाची नाहीं कीं 'नुसत्या श्रवणमात्रानें ईश्वर-साक्षात्कार होत नाहीं.' (२) तसेंच 'नुसता साक्षात्कार झाला तरी मोक्ष मिळत नाहीं' हें ही विसरावयाचें नाहीं. (३) मोक्ष जर हवा असेल तर भगवत्प्रसाद होईल, परमेश्वराचा अनुग्रह

होईल, असा प्रयत्न आपण केला पाहिजे. (४) अर्थातच ज्यानें श्रवण केलें आहे त्यानेंही साक्षात्कारासाठीं व साक्षात्कार झालेल्या पुरुषानें मोक्षप्राप्तीसाठीं प्रार्थनापुरःसर भगवदुपासना केली पाहिजे, असा श्रुतीचा अभिप्राय व सिद्धान्त आहे. हें मनांत आणून या पुढील मंत्रांत प्रार्थनाविधि कसा असावा, त्याचें स्वरूप श्रुति सांगत आहे.

शिष्य—भगवन् ! हा प्रकार स्पष्ट करून सांगावा.

सिद्धान्ती—आतां प्रथम श्रीमद्भाष्यकार एका अन्यथावाक्याचा म्हणजे "सगुणब्रह्माच्या प्राप्तीसाठीं 'एकर्षि' प्रभृति विशेषणांनीं ओळखला जाणाऱ्या आदित्याच्या प्रार्थनापर हा मंत्र आहे व या प्रार्थनेंत 'आम्हांला मार्ग दाखीव' असें मागणें केलें आहे" या असदर्थाचें खंडन करितात, तें एका स्मृतीचा अवतार करून होय.

**भा०—पात्रं हिरण्मयं सूर्यमंडलं समुदाहृतम् ।**
**विष्णोः सत्यस्य तेनैव सर्वदाऽपिहितं मुखम् ॥**
**तत्त्वपूर्णत्वतः पूषा विष्णुर्दर्शयति स्वयम् ।**
**सत्यधर्माय भक्ताय ॥ १५ ॥**

**ज० वि०—पात्रमिति । सत्यस्येत्यनूद्य विष्णोरिति व्याख्यातम् । मुखमिति समस्तविग्रहोपलक्षणम् । यद्यपि मंत्रेऽपावृण्विति प्रार्थनम् । अत्र तु दर्शयतीति स्वरूपकथनम् । तथापि मंत्रतात्पर्यमात्रोक्तिरियमिति न दोषः । पुष पुष्टावित्यतः पूर्णत्वेन पूषेत्युक्तम् । सत्यधर्मायेत्यनूद्य भक्तायेति व्याख्यानम् ॥ १५ ॥**

सिद्धान्ती—या स्मृतीचा अर्थ असा आहे कीं 'सूर्यमंडल हें एक सुवर्णपात्र आहे. हें पात्र सत्यरूपी जो विष्णु त्याचें मुख (शरीर) झांकून टाकितें. मात्र पूषा म्हणजे विष्णु आपल्या पूर्णत्वानें आपलें स्वरूप सत्यधर्मानें चालणाऱ्या भक्तांस दाखवितो.' ही स्मृति ऐकल्यावर तुझ्या लक्ष्यांत येईल कीं मंत्रांतील 'सत्य' या शब्दाचा स्मृतीनें 'विष्णु' असा अर्थ करण्यासाठीं 'सत्य' हें 'विष्णूचें' विशेषण केलें आहे. अर्थातच 'सूर्यमंडल' असा कित्येक पंडित 'सत्याचा' अर्थ करितात, त्याचें स्मृतीनें खंडन केलें आहे. 'मुख' हा शब्द सर्व शरीराकरितां उपयोजिला आहे, नुसत्या द्वाराकरितां नव्हे. मंत्रांत जरी 'मुख उघड' अशा अर्थाचे शब्द आहेत, तरी त्यांचा तात्पर्यार्थ भक्तांना विष्णु स्वस्वरूप दाखवितो' असा स्मृतीनें सांगितला आहे. मंत्राचें तात्पर्यच तें आहे, म्हणून येथें अर्थ फिरविण्यांत दोष नाहीं. 'पुष=वाढणें, पुष्ट होणें' अशी व्युत्पत्ति आहे म्हणून स्मृतीनें 'पूषन्' याचा अर्थ 'पूर्णत्वदर्शक' केला, व 'सत्यधर्माय' हा शब्द उच्चारून त्याचा अर्थ 'सद्भक्ताला' असा केला. 'अज्ञान नाहींसे कर' ही मुख्य प्रार्थना आहे, हें मंत्राचें तात्पर्य आहे. ॥ १५ ॥

---

## मंत्र सोळावा.

भा०—प्रधानज्ञानरूपतः।

विष्णुरेक ऋषिर्ज्ञेयो यमो नियमनाद्धरिः॥

सूर्यः स सूरिगम्यत्वात् प्राजापत्यः प्रजापतेः।

विशेषेणैव गम्यत्वात्॥ १६॥

ज० वि०—एकशब्दस्य प्रधानवाचकत्वादृष ज्ञान इत्यतश्च प्रधानज्ञानरूपत्वत एकर्षिरित्युक्तम्। प्राधान्यं च ज्ञानस्य सर्वविषयत्वादिना ज्ञातव्यम्। नियमनात्सर्वस्येति शेषः। सूर्यः ससूरिगम्यत्वादित्यनेन सूरिशब्दोपपदस्य यातेरूपमिदमित्युक्तं भवति। प्रजापतेर्हिरण्यगर्भस्यायं प्राजापत्य इत्यभिसंधाय संबंधो दर्शितः। प्रजापतेर्गम्यत्वादिति। तर्हि सूर्य इत्यनेन गतार्थत्वमित्यत उक्तम्—विशेषेणैवेति। एतेन प्रजापतेरपत्यमिति व्याख्यानं निरस्तं भवति॥ १६॥

सिद्धान्ती—'एक' याचा अर्थ 'प्रधान, मुख्य' असा आहे. ऋषीचा अर्थ ज्ञानी असा आहे. भाष्यकारांनीं स्मृत्यनुरोधानें या मंत्राचा असा अर्थ केला आहे. "आपलें मुख्य जें ज्ञानरूप—तें भक्तांस दाखवितो.—तोच सर्वज्ञ आहे म्हणून 'एकर्षि' आहे, असो; विष्णूचें ज्ञानरूपच मुख्य आहे म्हणून तो एकच सर्वज्ञ 'ऋषि (ज्ञानवान्)' आहे. हरि नियंता आहे. हा 'यम'चा अर्थ आहे. नित्य गमन करणारा म्हणून विष्णु 'सूर्य' आणि 'विशेष गतीनें चालणारा' म्हणून प्राजापत्य म्हटलें. सारांश, हरि हा सर्वज्ञ ऋषि, नियंता (यम) गमनशील (सूर्य) व वेगवान् (प्राजापत्य) आहे." ज्ञानवंतांत रमादिकांचा अंतर्भाव होतो म्हणून सर्वज्ञ अथवा प्रकृतीचाही स्पष्ट व मुख्य ज्ञाता असें विशेषण भाष्यकारांनीं हरीला दिलें. सर्वनियामक (यमाचा सुद्धां यम) हरि आहे. 'सूरि' शब्दापासून 'सूर्य' शब्दाची व्युत्पत्ति करून त्याचा अर्थ गमनकरणारा व 'प्रजापति जो हिरण्यगर्भ त्याचा' म्हणून 'प्राजापत्य' असा विग्रह करून त्याचाही अर्थ विशेष गमन करणारा असा केला आहे. प्रजापतीचा मुलगा तो 'प्राजापत्य' हा अर्थ चुकला, व विशेष वेगवान् असा अर्थ करून पुनरुक्तीचा दोष घालविला.॥ १६॥

---

## मंत्र सतरावा.

भा०—अहं चासावहेयतः ।

अस्मि नित्यास्तितामानात्सर्वजीवेषु संस्थितः ।
स्वयं तु सर्वजीवेभ्यो व्यतिरिक्तः परो हरिः ॥
स क्रतुर्ज्ञानरूपत्वादग्निरंगप्रणेतृतः ।
सत्यं ब्रह्म हृदये धारयतीति सत्यधर्मा ॥ १७ ॥

ज० वि०—अहेयतः । अहेयत्वतः । न हीयत इत्यहमित्यर्थः । नित्यास्तितामानादिति । नित्यसत्त्वेन प्रमितत्वादित्यर्थः । अनेन अस भुवि, माङ् मान इत्येतयोरिदं रूपमित्युक्तं भवति । अहमस्मिशब्दोक्तत्वेऽपि न जीवैक्यं हरेराशंकनीयामित्याह–स्वयं त्विति । सर्वजीवेभ्यो व्यतिरिक्तोप्यहेयत्वादियोगेनैवाहमस्मिशब्दाभ्यामुच्यत इत्यर्थः । एतेन नाहं त्वां भृत्यवद्याचे किं नाम योऽसावादित्ये पुरुषः सोहमस्मीत्यपव्याख्यानमित्युक्तं भवति । अहमस्मिशब्दाभिधेयत्वे हरेर्मूर्तिनियमोप्यस्तीत्याह–सर्वजीवेष्विति । उपासकेष्वित्यर्थः । उपलक्षणं चैतत् । पूषादिशब्दैरप्यादित्याद्यंतर्गत एवोच्यते । अधिकारियोग्यताभेदेन खलु नानाप्रतीकेषु भगवदापरोक्ष्यमत्र प्रार्थ्यते । क्रतुर्मतिर्मनीषेत्यभिधानात्स क्रतुर्ज्ञानरूपत्वादित्युक्तम् । अंगं शरीरमप्रधानं जगद्वा नयतीत्यग्निरित्यर्थः । एवं पुराणवाक्येन तात्पर्यतो व्याख्यातान् मंत्रानिदानीं स्ववाक्येन विशदयन्सत्यधर्मपदं कथं भक्तस्य वाचकमित्यतस्तन्निर्वक्ति–सत्यमिति । भक्त उच्यत इति शेषः । अत्र सत्यं ब्रह्म धारयतीति सत्यधर्मेत्युक्ते कथमनाधारं ब्रह्मायं धारयतीति शंका स्यात्तन्निवृत्त्यर्थं हृदये धारयतीत्युक्तम् । हृदये ब्रह्मधारणं चादरनैरंतर्योपेतम् तद्ध्यानादिकमेव । तच्च भक्तस्यैव संभवतीति भावः । सत्यस्य च तथाभूतस्य धर्मस्यानुष्ठातेति व्याख्याने सत्यस्यापिहितमिति प्रकृतपरित्यागो दोषः ॥ १७ ॥

सिद्धान्ती—'अहं' याची व्युत्पत्ति अशी आहेः ज्याच्यापासुन कांहींही कमी होत नाहीं तो अहं होय.

शिष्य—'अस्मत्' शब्दापासून 'अहं' शब्द निघाला आहेना ?

सिद्धान्ती—होय. पण तशी रूढपद्धतीनें व्युत्पत्ति केली म्हणजे जीवबोधक 'अहं 'नें हरीचा बोध होत नाहीं, व तो होणें अवश्य आहे म्हणून ही अहेयत्वाची

(कमी न होण्याची), व्याकरणशुद्ध व्युत्पत्ति केली आहे. 'हरि हा नित्य आहे, अस्तित्वरूपाचा आहे, असा ज्ञानरूपी हरीचा बोध अवश्य आहे, असें 'अस्मि'चें रूप स्पष्ट सांगत आहे. तो सर्व जीवांच्या ठिकाणीं असणारा, पण स्वरूपानें त्या सर्वांहून व्यतिरिक्त (अत्यन्त भिन्न) असा आहे. 'अस्मि' शब्दाची ही व्युत्पत्ति केली म्हणजे हेच अर्थ प्रतीत होतात. ह्या विवेचनावरून हें स्पष्ट होतें कीं, हा 'मी आहें' असें वाक्य उच्चारिलें तरी 'जीव आणि विष्णु' हे एक असत नाहींत. तो विष्णु जीवांहून सर्वथा भिन्न आहे. हरिहो 'मी आहें' असें म्हणतो. पण या वाक्यांत 'केव्हांही कमी न होणारा, नित्य असणारा, ज्ञानवान् मी आहें' असा त्या वाक्याचा अर्थ असतो. शिष्यराज! या व्याकरणशुद्ध व्युत्पत्तीवरून तुझ्या लक्षांत येईल कीं 'मी तुजजवळ भिक्षा मागत नाहीं; कारण आदित्यांत जो पुरुष आहे, तोच मी आहें' इत्यादि असंबद्ध बडबड अद्वैती करितात, ती सर्व भ्रमाचा बाजार आहे. असो; हा हरि आपल्या उपासकांसमात्र आस्तित्व, नित्यत्व, ज्ञानत्व इत्यादि अनेक रूपांनीं प्रकट होतो. हरि आदित्याच्या अंतर्गत आहे, हें 'पूषन्' शब्दानें व्यक्त होतें. सारांश, भक्तांच्या अधिकारानुसार भक्तवत्सल हरि हा भक्तांनीं प्रस्थापित केलेल्या अनंत प्रतिकांमध्यें ( चिन्ह, सूचक, मूर्ति इत्यादि अर्थ प्रतीकाचे आहेत ) प्रत्यक्ष विद्यमान असतो. असो; भक्तानें आपल्या अधिकाराप्रमाणें 'तूं क्रतु ( ज्ञानरूप ) आहेस' 'अग्नि ( अंग हें ज्याचें प्रधानरूप नव्हे असा किंवा जगताचा नायक असा ) आहेस.' याप्रमाणें पुराणानुसार मंत्राचा अर्थ सांगून भाष्यकार म्हणतात कीं 'भक्त हे नेहमीं आपल्या हृदयांत ब्रह्माला ( सत्याला ) आधार देतात, सांठवून ठेवितात, म्हणून त्यांस 'सत्यधर्म' असें म्हणावें. 'क्रतु' याचा 'मति,' 'मनीषा' हे अर्थ आहेत म्हणून 'ज्ञानरूप' असा अर्थ केला. असो; हा हरि भक्तहृदयांत राहतो.

शिष्य—भगवन्! ब्रह्माला भक्त कसे आपल्या हृदयांत आधार देणार? तोच सर्वाधार आहेना?

सिद्धान्ती—काय शंका ही? असो; हरीला हृदयांत आधार देणें किंवा सांठविणें म्हणजे निरंतर ध्यान आदरानें करणें होय. हें भक्तांसच सुखदायक साध्य असतें, म्हणून त्यांस 'सत्यधर्म' हें विशेषण दिलें आहे. सारांश, 'सत्याचा ( ज्ञानाचा ) व सत्यधर्मांचा अनुष्ठाता आहे' असें व्याख्यान केल्यावर 'सत्याचें मुख झांकलेलें आहे' असा अर्थ करणें म्हणजे प्रकृताचा त्याग करणें, व अप्रस्तुत गोष्टीचा स्वीकार करणें, हा दोष उत्पन्न होतो. ॥ १७ ॥

शिष्य—मला एकदां या १५।१६।१७ मंत्रांचें तात्पर्य सांगाल काय?

## १५—१६ मंत्रांचें तात्पर्य.

ज० वि०—ततश्चायमर्थः हिरण्मयामिव हिरण्मयं ज्योतिर्मयम् पिबति रसांस्त्रायते च जगदिति पात्रम्। तेन हिरण्मयेन पात्रेण सूर्यमंडलेन । सत्यस्य सद्गुणपूर्णस्य आदित्यमंडलान्तर्गतस्य तव मुखं पिहितमस्ति । हे पूषंस्तद्वपुस्त्वं सत्यधर्माय त्वद्विषयध्यानादिमते मह्यं दृष्टये ममत्वद्दर्शनसिद्ध्यर्थमिति यावत् । अपावृणु अपगतावरणं कुरु। ॥ १५ ॥ हे पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजापत्य मदीयान् रश्मीन्व्यूह। तेजश्च समूह । स्वरूपं बाह्यं च मदीयज्ञानं विस्तारयेति यावत्। तथा च यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते प्रसादादहं पश्यामीति। आदित्यरश्म्यादीनामपगमनादिना तदंतर्गतब्रह्मप्रतीत्यसंभवादादित्यरश्म्यादिविषयं व्याख्यानं न युक्तम्। ॥ १६ ॥

सिद्धान्ती—सांगतों ऐक. हिरण्मय ( ज्योतिर्मय ) पात्रानें.—

शिष्य—म्हणजे ?

सिद्धान्ती—ज्याच्या योगानें रसाचें पान करितां येतें किंवा जगताचें अंधकारापासून संरक्षण होतें तें पात्र होय. सूर्यमंडल रसांचें आकर्षण करितें व जगतांचें तमोनिवारण करून पालन करितें, म्हणून त्याला पात्र असें म्हटलें. असो; हे सद्गुणपूर्ण व आदित्याच्या अंतर्गत राहणाऱ्या देवा ! तुझें मुख ( शरीर ) जगत्तारक सूर्यमंडलानें, ज्ञानानें, पूर्ण भरलेलें, ( झांकलेलें ) आहे. कृपा कर आणि तुझें अखंड ध्यान करणारा जो मी, त्या मला तुझी दर्शनसिद्धि होईल, असें आपलें स्वरूप अनावृत कर ( स्पष्ट दाखीव ) ॥ १५ ॥ हे पूर्णस्वरूपा ! सर्वज्ञा ! सर्वनियंत्या ! गमनशीला ! वेगवंता ! माझ्या रश्मीचे—

शिष्य—म्हणजे ? भक्ताला रश्मि कोठचे ?

सिद्धान्ती—रश्मि म्हणजे ज्याला प्रेम आणि सुख थोडें असतें, तो जीव होय. येथें जीव शब्दावर लक्षणा करून त्याचा अर्थ स्वरूपज्ञान असा केला आहे. असो; हे देवा ! माझें स्वरूपज्ञान व 'तेजः' म्हणजे बाह्यज्ञान ह्या उभयतांचाही विस्तार कर. असें केलेंस म्हणजे तुझें अति मंगल स्वरूप आहे, तें त्वत्प्रसादानें माझ्या दृष्टीस पडेल.

शिष्य—पण इतर भाष्यकार म्हणतात कीं 'सूर्याचे किरण अपगत झाले म्हणजे त्याच्या आंत जें ब्रह्म आहे, तें दिसेल' असा या मंत्राचा अर्थ आहे !

सिद्धान्ती—पण तो चुकला आहे. सूर्यकिरण अस्तंगत झाल्यावर ब्रह्मप्रतीति रे कशी होणार ? तात्पर्य, त्यांचा 'रश्मि' शब्दाचा अर्थच चुकला. ॥ १६ ॥

शिष्य—या १७ व्या मंत्रांत 'असौ' हा शब्द दोनदां आला आहे, हें काय?

## १७ व्या मंत्राचें तात्पर्य.

**भा०—एकोऽसौ शब्दः। प्राणे स्थित इति। योऽसावसौ पुरुषः सोहमस्मि ॥ १७ ॥**

**ज० वि०—योसावसौ पुरुष इत्यत्र द्विरसाविति किमर्थमित्यत आह-एक इति। असौ शब्दोऽसाविति शब्दः। इति वक्तीति शेषः। यद्यसुः प्राणस्तस्मिन्नित्यर्थः स्यात्तर्ह्यस्यान्वयो नास्ति। क्रियापेक्षत्वादधिकरणस्येत्यतः क्रियाध्याहारेणान्वयं दर्शयति-स्थित इति। असावसाविति वीप्सार्थतया किं न व्याख्यायत इति चेन्न। एवं व्याख्याने प्राणाख्यप्रतीकांतरस्याप्युक्तिलाभात्। एकेनापिशब्देन वीप्सासिद्धेः। तथा च योसौ प्रसिद्धोऽसौ प्राणे स्थितः पुरुषः स एवाहेयत्वनित्यसत्तामानाभ्यामहमस्मिशब्दाभिधेयस्तं च पश्यामीति वाक्यार्थः। अथवा पूषादिशब्दैरुपलक्षणया प्राणाद्यनेकप्रतीकस्थत्वं विष्णोरुक्तम्। तत्र भेदशंकायामिदमाह। सर्वप्रतीकेषु स्थित एक एवेत्यर्थः ॥ १७ ॥**

सिद्धान्ती—तूं चुकतोस. अक्षरवटिका सारखी आहे म्हणून 'असौ' सर्वनाम व 'असौ' ही 'असु=प्राण' या शब्दाची सप्तमी हे दोन शब्द तुला एकच वाटले. ऑ? तूंच काय मोठमोठे भाष्यकारही येथें फसले आहेत. असो.

शिष्य—जर एका 'असौ' चा प्राणामध्यें, असा अधिकरणी सप्तमीचा अर्थ केला, तर त्याच्याशीं अन्वय असणारें क्रियापद कोठें आहे या मंत्रांत?

सिद्धान्ती—हीच शंका मनांत आणून; सर्वज्ञ भाष्यकारांनीं 'राहिलेला' हें अध्याहृत पद भाष्यांत स्पष्ट घातलें आहे.

शिष्य—इतका अट्टाहास करण्यापेक्षां, 'एकच पद आदरार्थी दोनदां घातलें आहे' असें म्हटलें तर?

सिद्धान्ती—चालेल म्हणा; पण आमच्या या अर्थानें 'प्राण' हेंही एक परमेश्वराचें प्रतीक आहे, असा ज्ञानलाभ होतो. 'प्राणामध्यें राहणारा देव,' हा 'असौ' शब्दार्थ झाला. समजलें? आदर काय, एका शब्दानें सुद्धां सिद्ध होतो. असो; वाक्यार्थ हा आहे कीं, 'हा सर्व-प्रसिद्ध प्राणस्थ परमेश्वर हाच (अहं अस्मि) नित्य सत्तात्व व नित्य ज्ञानत्व आहे, असें मला समजतें व त्याला मी पाहतों.'

शिष्य—म्हणजे पूषादि शब्दांनीं उपलक्षण करून, विष्णूचीं प्राणादि अनंत प्रतीकस्थानें आहेत, असें दाखविलें. तेव्हां त्याचीं स्वरूपेंही निरनिराळीं अथवा तितक्या व्यक्ति निरनिराळ्या आहेत कीं काय?

सिद्धान्ती—मानवदृष्टीला त्याचीं लीला-स्वरूपें निराळीं दिसतील. पण विष्णु ही व्यक्ति एकच आहे. अनेक प्रतीकांमध्यें राहूनही तो एकच आहे, हें त्याचें योगैश्वर्य होय. असा १७ व्या मंत्राचा तात्पर्यार्थ आहे ॥ १७ ॥

---

## मंत्र अठरावा.

भा०—यस्मिन्नयं स्थितः सोप्यमृतः किमु परः ।
अः ब्रह्मैव निलयनं यस्य वायोः सोनिलम् ॥

ज० वि०—वायुरनिलममृतमित्येतद्वाक्यं मरिष्यतो वायुः प्राणोध्यात्मपरिच्छेदं हित्वाऽधिदैवमात्मानं अनिलममृतं प्रपद्यताम् । अथेदं शरीरमग्नौ हुतं भस्मान्तं भूयादिति केचिद्व्याचक्षते । तदसत् । अवश्यं भाविन्यर्थे प्रार्थनानुपयोगात् । प्रकरणादप्युपपत्तेर्बलीयस्त्वात् । अतो लिंगव्यत्ययेन विभक्तिव्यत्ययेन वा समानाधिकरणान्येतानि पदानि । ननु तर्हि प्रकृतासंगतानि स्युः । वायुरनिलं इति पुनरुक्तिः स्यादित्यत आह-यस्मिन्निति । यस्मिन्वायौ अयं परमेश्वरः सोऽपि वायुरपि अमृतः किमु परोऽमृत इति वक्तव्यमिति शेषः । नन्वस्मिन्वाक्ये वायुरमृतमित्येवोच्यते । न तु यस्मिन्वायावयं स्थित इति तत्कुतः कैमुत्यं लभ्यते । न हि वायोरमृतत्वमात्रेणेश्वरामृतत्वसिद्धिरिति चेन्मैवम् । अस्यार्थस्यानिलपदेनोक्तत्वात् । तत्कथमित्यतस्तात्पर्यतो व्याख्यातम् तदिदानीं निर्वक्ति-अः ब्रह्मैवेति । निलं निलयनमाश्रयः । यथाश्रुतस्यानुवादोयमित्यतोऽनिलमित्युक्तम् । अनेन पुनरुक्तिरपि परिहृता भवति । ननु यस्मिन्नयं स्थित इत्यनेन वायुरीश्वराश्रय इत्युक्तम् ॥ अनेन निर्वचनेनेश्वरो वायोराश्रय इति लक्ष्यते । तत्कथमनिलपदार्थोसाविति चेन्मैवम् । यस्मिन्नयं स्थित इत्यनेनापि यस्मिन्वायावयं परमेश्वरो नियामकत्वेन स्थित इति वायोरीश्वराश्रितत्वस्यैव कथितत्वात् । अथवा यस्मिन्परमेश्वरेऽयं वायुः स्थितः यदधीनो वर्तत इति यावत् । स वायुरपि यदामृतः तदा किमु वक्तव्यं स परोऽमृत इति व्याख्येयम् ॥

शिष्य—या मंत्राचा अर्थ शंकराचार्यांनीं असा केला आहे:—'मरणाऱ्या मनुष्याचा वायु म्हणजे प्राण हा आपलें शारीरिक स्वरूप सोडो व आधि-दैवी जो अमृत-सूत्रात्मा वायु, त्यामध्यें जाऊन मिळो व हें शरीर अग्नीला अर्पण केल्यावर त्याचें भस्म होवो,' हा प्रार्थनापर अर्थ ठीक आहे. नाहीं ?

सिद्धान्ती—नाहीं. कारण देहगत वायु विश्वगत वायूंत जाऊन मिसळणें किंवा अग्नींत टाकलेलें शरीर भस्म होणें, या क्रिया निसर्ग-नियमांनीं अवश्य होणार—यासाठीं प्रार्थना करण्याचें कारण नाहीं.

शिष्य—पण प्रस्तुतचा मंत्रविषय तर प्रार्थनेचा आहे.

सिद्धान्ती—म्हणून काय झालें ? योग्यायोग्य तर कांहीं पाहिलें पाहिजे. विषयाला प्रस्तुत असलें तरी भलतें व अप्रयोजक बोलणें ठीक नव्हे ! सम-जलें ? तेव्हां लिंगाचा किंवा विभक्तीचा व्यत्यय ( फेरबदल ) करून सर्व पदें एकार्थ-बोधक होतील, असें सामानाधिकरण्य केलें पाहिजे.

शिष्य—म्हणजे सर्व शब्द 'वायु' अर्थाचे होतील. होय ना ? पण ईश्वर-स्तुतीचें येथें प्रकरण चाललें आहे, त्याला व्यत्यय येईल, शिवाय, 'वायु' व 'अनिल' हें एकार्थक शब्द आहेत; तेव्हां पुनरुक्ति होईल.

सिद्धान्ती—नाहीं; भाष्यकार म्हणतात: ज्या वायूमध्यें हा परमात्मा राहतो तोच जर अमर आहे तर परमात्मा हरि अमृत आहे, अमर आहे, हें सांगावयास तरी कशाला हवें ?

शिष्य—पण हा आपला कैमुतिक न्याय (मग हरीची गोष्ट कशास सांगावी ? हा न्याय ) येथें लागूच पडत नाहीं. 'वायु अमर आहे' हा वाक्यार्थ आहे. 'ज्या वायूमध्यें हा हरि राहतो, त्या वायूंतील हरि अमर आहे' असें नाहीं सांगितलें. वायु अमृत झाला म्हणून हरिही अमृत (अमर) आहे, हें नाहीं ठरत.

सिद्धान्ती—हें भाष्यकारांस अगोदरच विदित होतें. त्यांनीं 'अनिल' या समस्त पदाचा विग्रह करून तुझ्या शंकेचें निवारण केलें आहे. 'अ म्हणजे ब्रह्म, हेंच निलयन म्हणजे वास्तव्यस्थान ज्या वायूचें तो अनिल होय.

शिष्य—हें कसें ? आपण मला संक्षिप्तरूपानें सांगत आहात, तें कांहीं समजत नाहीं. तेव्हां कृपा करून "अनिल" शब्दाचा अर्थ स्पष्ट करून सांगा.

सिद्धान्ती—सावधान चित्तानें ऐक 'अः' म्हणजे ब्रह्म हेंच आहे निल-यन म्हणजे आश्रयस्थान ज्या वायूचें तो अनिल होय. अनिल म्हणजे ब्रह्माच्या आश्रयानें राहणारा वायु होय. समजलें ? येथें आम्हांस विभक्तीचा अथवा लिंगाचा विचार कर्तव्य नाहीं. आम्ही श्रुतीचा अनुवाद केला आहे. त्याच-

प्रमाणें पुनरुक्तीचाही दोष म्हणजे एकाच अर्थाचे दोन शब्द घातल्याचाही दोष नाहींसा होतो.

पूर्वपक्षी—ब्रह्मामध्यें हा वायु राहतो, म्हणून वायूला ईश्वराचा आधार आहे; किंवा ईश्वर हा वायूचें आश्रयस्थान आहे; इतकेंच कायतें फार तर तुमच्या या चमत्कारिक शब्दसिद्धीनें ज्ञान होतें; पण आतांच पूर्वींचा जो आपण वायु सांगितला तो हा अनिल कसा होईल ?

सिद्धान्ती—ही शंका घेण्याचें कारण नाहीं. कारण ज्या वायूमध्यें हा परमेश्वर नियामक–वृत्तीनें राहतो म्हणजे ज्या वायूचें नियमन परमेश्वर करितो, जो वायु परमेश्वर–तंत्र आहे, तोच अनिल म्हणजे वायु आमच्या शब्दसिद्धीच्या पद्धतीनें ईश्वराच्या आश्रयानें राहतो, असें ठरतें; म्हणजे अनिल आणि वायु हे दोन्ही एकच पदार्थाचे पण भिन्नगुणव्यंजक होतात. किंवा ज्या परमेश्वरामध्यें हा वायु राहतो, ज्याच्या तंत्रानें चालतो तोच अनिल परमेश्वर–तंत्र असतो, असें होतें. असो; हा वायूही जर अमृत म्हणजे अमर आहे तर त्याचा आश्रय जो परमेश्वर तो अमर आहे हें सांगावयास पाहिजे काय.

ज० वि०—ततश्चेदमुक्तम् भवति । सोहमस्मीति जीवांतर्गतस्य परमेश्वरस्य नित्यास्तित्वं कल्याणतमरूपत्वं चोक्तम् । तन्न युक्तम् । प्रत्यक्षत एव देहस्य भस्मान्तत्वदर्शनात् । देहनाशे च तदंतर्गतस्य परमेश्वरस्य जीववन्मरणाद्यवश्यंभावादित्याशंक्येदमुक्तम्–वायुरनिलमिति । अयमर्थः । यद्यपीदं शरीरं भस्मान्तम् । तथापि तदंतर्गतस्य परमेश्वरस्य न मरणादिदोषप्रसंगः । कुतः अनिलः परमेश्वराश्रितो वायुरपि यदाऽमृतः । अथ तदा परमेश्वरः किं वक्तव्य इति तदमृतत्वस्य कैमुत्यसिद्धत्वादिति । ननु संसारिणो वायोः कथममृतत्वं संभवति । यद्युपचारेण तर्हि ईश्वरस्यापि किं तथाविधममृतत्वमस्तीत्याशंकां स्मृत्यैव परिहरति—

सिद्धान्ती—आमच्या म्हणण्याचें तात्पर्य हें आहे कीं 'तो मी आहें' या वाक्यांत 'मी' च्या म्हणजे जीवाच्या अंतरंगामध्यें राहणारा जो परमेश्वर तो नित्य अस्तित्व–रूप आहे. आणि कल्याणरूप आहे, हें सांगितलें आहे.

पूर्वपक्षी—हें म्हणणें योग्य नाहीं. कारण जीवाच्या देहाचें भस्म होतें, आणि अंत होतो, हें प्रत्यक्ष दिसतें. देह–नाश झाला म्हणजे त्याच्या बरोबरच देहांतर्गत राहणारा जो परमेश्वर तोही अवश्य मरण पावला पाहिजे !

सिद्धान्ती—ही तुमची शंका मनांत आणूनच, श्रुतीनें 'वायू' चे ठिकाणीं 'अनिल' या शब्दाची योजना केली आहे.

पूर्वपक्षी—म्हणजे काय ?

सिद्धान्ती—यद्यपि आपलें शरीर भस्म होऊन नाहींसें होतें, तथापि तदंतर्गत जो परमेश्वर त्याला मरणादि दोषांचा प्रसंग प्राप्त होत नाहीं. कारण, अनिल म्हणजे परमेश्वराच्या आश्रयानें राहणारा जो वायु, तो जर अमर आहे, तर त्याचें आश्रयस्थान जो परमेश्वर तो मर्त्य आहे, किंवा त्याला मरणादि दोषप्रसंग येतील, अशी भ्रांति स्वप्नांतसुद्धां होण्याचें कारण नाहीं.

पूर्वपक्षी—अहो ! उत्पन्न होऊन नाहींसा होणारा जो 'संसारी' वायु, त्याला श्रुतीनें तरी 'अमर' असें कसें म्हटलें ? वस्तुतः तर तो अमर नाहीं. कांहीं अर्थालंकार करून त्याला अमर म्हटलें असेल, तर अशी शंका उत्पन्न होते कीं, ईश्वराचेंही अमृतत्व असेंच आलंकारिकच आहे कीं काय ?

भा०—अतिरोहितविज्ञानाद्वायुरप्यमृतः स्मृतः ।
मुख्यामृतः स्वयं रामः परमात्मा सनातनः ॥
इति रामसंहितायाम् ॥ १८ ॥

ज० वि०—अतिरोहितेति । देहनाशेऽपि तत्कार्यविज्ञानतिरोभावाभावसादृश्यादित्यर्थः । अतिरोहितविज्ञानादिति भावप्रधानो निर्देशः । मुख्यामृतः देहनाशादिरहितः परमात्मा सनातन इति तत्र युक्तिद्वयम् ॥ १८ ॥

सिद्धान्ती—या तुमच्या कुतर्काचें निरसन करण्यासाठींच भगवान् भाष्यकारांनीं 'राम-संहिते' मधील श्लोकाचा अवतार केला आहे. त्याचा अर्थ असा आहे कीं ज्याचें विज्ञान केव्हांही अप्रकट होत नाहीं, नेहमीं प्रकट स्वरूपानें असतें तो वायु सुद्धां जर अमर असतो, तर ज्याचें शरीर व विज्ञान हीं दोन्ही केव्हांही नाहींशीं होत नाहींत. तो भगवान् 'श्री रामचंद्र परमात्मा' सनातनच असला पाहिजे. यावरून ( म्हणजे ज्याचें ज्ञान केव्हांही नाहींसें होत नाहीं, सदैव नित्य असतें, या अस्तित्ववाचक शब्दयोजनेवरून ) वायु अमर आहे हें ठरलें आणि ज्याच्या शरीराचा नाश होत नाहीं व ज्याचा आत्मा अतिश्रेष्ठ असतो तो रामचंद्र म्हणजे भगवान् परमेश्वर सदैव अमर असतो हेंही दोन हेतूंनीं स्पष्ट ठरलें. सारांश, येथें प्राण-स्वरूपानें परमेश्वराची प्रार्थना करून प्राण-नियामक परमेश्वर " अहं " ( मी ) या शब्दानें उद्बोधित होऊन उपासकांच्या अंतःकरणामध्यें राहणारा परमेश्वर एकच आहे, शरीराचें भस्म झालें तरी परमेश्वर सनातनत्वानें राहतो, असा या प्रार्थनेचा अर्थ आहे. ॥ १८ ॥

---

## मंत्र एकोणिसावा.*

ज० वि०—अथ प्रणवप्रतीकं प्रार्थयते—ॐमिति । ओतत्वादि-गुणयुक्त क्रतो मां स्मर । मया कृतं च ध्यानादिकं च स्मरेति । अभ्यासस्तात्पर्यार्थः । अत्र स्मरणं नाम प्रसिद्धमेवेति प्रतीतिं स्मृत्यैव परिहरति—

सिद्धान्ती—आतां यानंतर प्रणव ( ॐ ) हें प्रतीक करून भक्त प्रार्थना करितातः—

शिष्य—( ॐ ) म्हणजे ?

सिद्धान्ती—त्याचा अर्थ ज्यानें या जगताचा विस्तार केला तो भगवान् हरि, हा होय. जगाचा विस्तार करणें इत्यादि गुणयुक्त यज्ञरूपी परमेश्वरा ! मी काय जें ध्यान-धारणादि कर्म केलें असेल, त्याचें स्मरण कर. येथें श्रुतीनें दोनदां यज्ञस्वरूपी विष्णूचें आवाहन केलें आहे, तें एकनिष्ठ आदरोक्तीसाठीं होय.

पूर्वपक्षी—श्रुतींतील “स्मर” ( स्मरण करणें ) याचा अर्थ नेहमींचाच आहे ना ?

सिद्धान्ती—नाहीं. भगवान् भाष्यकार “ब्रह्मतर्का” तील श्लोक उद्धृत करून तुमच्या शंकेचें निराकरण करितातः—

भा०—भक्तानां स्मरणं विष्णोर्नित्यज्ञप्तिस्वरूपतः ।
अनुग्रहोन्मुखत्वं तु नैवान्यत्कचिदिष्यत इति ब्रह्मतर्के ॥ १९ ॥

ज० वि०—भक्तानामिति । भक्तकर्मकं यद्विष्णोः स्मरणं तद-नुग्रहोन्मुखत्वमेव । विष्णौ यः स्मरणशब्दः प्रयुज्यते स स्मरण-कार्यानुग्रहोन्मुखत्व एव लक्षणया वर्तत इति यावत् । नैवान्यत्सं-स्कारकारणकं ज्ञानमित्यर्थः । न केवलं भक्तविषय एवं किंतु सर्वत्रापीत्युक्तम् । कचिदिति । कुतः नित्यज्ञप्तिस्वरूपतः । स्मरणं ह्यनुभवनाशे तज्जन्यसंस्कारसहकृतेन मनसा जायते । ईश्वरश्च नित्यज्ञानस्वरूप इति तस्य स्मरणासंभवाल्लक्षणाश्रयणमिति भावः ॥ १९ ॥

सिद्धान्ती—परमेश्वर नित्य ज्ञान-स्वरूप आहे, म्हणून त्याचें भक्तविषयक स्मरण नेहमीं जागृतच असतें, अतएव भक्त ज्या विष्णुस्मरणाचे विषय आहेत तें स्मरण अनुग्रहाला अनुकूल असावें हीच प्रार्थना भक्त नेहमीं करित असतात.

---

* या भाष्यकारांनीं मंत्रसंख्या २० मानिली आहे.

त्यांना दुसऱ्या कोणत्याही वस्तूची इच्छा नसते. येथें विष्णूच्या ठिकाणीं जो स्मरण शब्द योजिला आहे, तो अनुग्रहवाचक, प्रसादवाचक, आहे. असा अर्थ लक्षणेनें घ्यावयाचा आहे. स्मरणाचा नेहमींचा अर्थ येथें घ्यावयाचा नाहीं. नेहमीचें स्मरण ( प्रत्यक्षानंतर दुसऱ्या एका संस्कारानें उत्पन्न झालेलें ज्ञान ) असतें तें येथें नाहीं. स्मरण म्हणजे अनुग्रहोन्मुखत्व होय.

शिष्यः—मला वाटतें कीं, ईश्वर नेहमीं ज्ञान-स्वरूप आहे. त्याच्या ज्ञानाचा केव्हांही नाश होत नाहीं. म्हणून त्याला स्मरण होणें ही गोष्ट असंभवनीयच आहे. यास्तव आपण येथें लक्षणेचा आश्रय करून, स्मरणाचा अर्थ 'प्रसादाला उन्मुख होणें' असा केला. परमेश्वराला भक्ताचेंच स्मरण असतें असें नाहीं तो सर्व-स्मर्ता आहे; असो; भक्तांच्या भक्तीनें संतुष्ट होऊन त्यांच्यावर अनुग्रह करण्यास परमेश्वरानें सिद्ध व्हावें एतदर्थ ही प्रार्थना आहे. ॥ १९ ॥

---

## मंत्र विसावा.

ज० वि०—साक्षात्कारप्रार्थनानंतरमग्निप्रतीकं भगवंतं मोक्षार्थं प्रार्थयते—

सिद्धान्ती—बरोबर समजलास. आतां या पुढें म्हणजे साक्षात्काराची प्रार्थना केल्यानंतर परमेश्वरभक्त अग्नीचें प्रतीक घेऊन मोक्षप्राप्तीसाठीं भगवंताची प्रार्थना करितो.

भा०—वयुनं ज्ञानं 'त्वद्वृत्तया वयुनयेदमचष्टविश्व'मिति
वचनात्। जुहुराणं अस्मानल्पीकुर्वत्। युयोधि वियोजय॥
यदस्मान्कुरुतेऽत्यल्पांस्तदेनोऽस्मद्वियोजय।
नय नो मोक्षवित्तायेत्यस्तौद्यज्ञं मनुः स्वराडिति स्कांदे॥
युयु वियोग इति धातुः।
भक्तिज्ञानाभ्यां भूयिष्ठां नम उक्तिं विधेम॥ २०॥

ज० वि०—वयुनमिति। वयुनानि कर्माणीति केषांचिद्व्याख्यानं तदसत्। मोक्षस्य कर्मसाध्यत्वाभावेन तदुक्तेर्वैयर्थ्यप्रसंगादित्यभिप्रेत्य वयुनशब्दार्थमाह—वयुनमिति। वयुनशब्दस्य ज्ञानवाचित्वं कुत इति चेत्प्रयोगं दर्शयति—त्वद्वृत्तयेति। जुहुराणं कुटिलमित्यन्यथाप्रतीतिनिरासायाह—जुहुराणमिति। अस्मानित्यन्वयसिद्ध्यर्थमावर्तितम्। युयोधीत्यप्रतीतार्थपदं व्याख्याति—युयोधीति। कुतोयं पदद्वयार्थ इत्यतः समाख्यानादित्याह-यदिति। युयोधीत्यस्य वियोगार्थसिद्धये धातुसूत्र-

मपि पठति-युयु वियोग इति धातुरिति । धातुव्याख्यानमित्यर्थः नम उक्तेर्भूयिष्ठत्वमभ्यस्तत्वमतोऽभ्यधिकार्थं वदन् नमस्कारस्य कथमुक्तित्वमित्याशंकां परिहरति-भक्तीति । ततश्चायमर्थः । हे अग्ने अस्मान्सुपथा पुनरावर्तिवर्जितेनार्चिरादिमार्गेण राये मोक्षाख्यवित्ताय नय । कुतः । हे देव अस्मदनुष्ठितानि विश्वानि संपूर्णानि मोक्षाय पर्याप्तानीति यावत् । वयुनानि ज्ञानानि भवान्वेद । प्रारब्धकर्मभिर्बद्धस्य कथं मोक्ष इत्यत उक्तम्-युयोधीति । अस्मान् जुहुराणमल्पीकुर्वत् । संसारे परिवर्तयदिति यावत् । एनः पापमनिष्टं कर्मेति यावत् । अस्मत्तो युयोधि । अस्मत्तो वियोजय । वयं तुभ्यं भूयिष्ठां नमउक्तिं विधेम । न तु तत्प्रतीकर्तुं शक्नुम इति॥२०॥

सिद्धान्ती—हे अग्ने ! आम्हांला चांगल्या मार्गानें ने. आम्हांस ज्ञानी कर, आमची योग्यता कमी करणारें जें कांहीं पापकर्म किंवा अनिष्ट आहे तें नाहींसें कर; आम्हांस मोक्षस्थानाप्रत घेऊन जा. आम्हीं तुला पुष्कळ वेळ भक्तिज्ञानपूर्वक नमस्कार करितों.

पूर्वपक्षी—"वयुनानि" याचा अर्थ शंकराचार्यांनीं 'कर्म' असा केला आहे. आणि तुम्हीं तर 'ज्ञान' असा अर्थ करितां, हें काय ?

सिद्धान्ती—तो अर्थ चुकला आहे. वयुन याचा अर्थ ज्ञान असाच केला पाहिजे. कारण मोक्षाला ज्ञान हेंच एक साधन आहे; कर्म नाहीं. कर्म असा अर्थ केला तर मोक्षाला त्याचा कांहींच उपयोग होणार नाहीं. शिवाय, 'वयुन' याचा अर्थ ज्ञान-पर केला आहे असें एक वचनही भाष्यकारांनीं अवतीर्ण केलें आहे. 'तूं दिलेल्या ज्ञानानें मीं हें सर्व विश्व पाहिलें' असा या वचनाचा अर्थ आहे. असो; "जुहुराणं" याचा अर्थ कुटिल असा करितात, तोही चुकला आहे. भाष्यकारांनीं 'स्कंद पुराणांतील' एक समाख्यापर (सारखाच अर्थ सांगणारा) श्लोक उद्धृत करून श्रुतींतील वादविषयक शब्दाच्या स्थानीं "अत्यल्प" हा शब्द व "युयोधि" या शब्दाच्या स्थानीं "वियोजय" (आम्हांस वियोग होईल असें कर) असे शब्द उपयोजिले आहेत, म्हणून भाष्यकारांचाच अर्थ बरोबर आहे. शिवाय "युयु" (वियोग करणें) हा मूळ धातु आहे.

पूर्वपक्षी—आम्ही पुष्कळ वेळ नमस्कार करितों, असें म्हणण्यांत काय अर्थविशेष आहे ? शिवाय "नमस्कार" असें म्हणण्यामध्यें काय तात्पर्य आहे.

सिद्धान्ती—भगवान् भाष्यकारांनीं अधिक अर्थ काढला आहे कीं 'भक्ति आणि ज्ञान या उभयतांच्या साहाय्यानें आम्ही नमस्कार करितों, व त्यांचा उच्चारही करितों' असा बोध व्हावा. तात्पर्य, 'हे अग्ने ! आम्हांला पुनः जन्मा

मरण घ्यावें लागणार नाहीं, अशा "अर्चिरादि" (देवयान) मार्गानें मोक्ष-संपत्तीच्या स्थानाप्रत घेऊन जा. देवा! आम्ही जीं काय मोक्षद ज्ञानें मिळविलीं आहेत, तीं तुला ठाऊक आहेत, देवा! जीं जीं अनिष्ट व बद्धक प्रारब्ध कर्में आत्मिक योग्यता कमी करतील, आम्हांस पुनः संसारांत ढकलून देतील, तीं सर्व आमच्यापासून नाहींशी करून टाक; आम्ही तुला भक्ति-ज्ञानपूर्वक 'नमः' असें पुष्कळदां म्हणून नमस्कार करितों. देवा! हीं अनिष्ट पापें अथवा प्रारब्ध कर्में नाहींसें करण्याचें सामर्थ्य आमच्यामध्यें नाहीं. म्हणून आम्ही ही प्रार्थना करित आहोंत. ॥ २० ॥ हें या मंत्राचें तात्पर्य आहे.

**ज० वि०—अथ समापितभाष्योऽपि भगवानाचार्यो यत्ते रूपं कल्याणतमं योसावसौ पुरुष इत्यादिना प्रतिपादितं नारायणं स्तुतिनतिभ्यां प्रीणयति—**

सिद्धान्ती—यानंतर भगवान् भाष्यकार आपलें हें उपनिषदावरील भाष्य संपवून नारायणाची नमस्कारपूर्वक स्तुति करितात, नारायणाचें स्वरूप अतिकल्याणतम आहे, तो प्राणनियामक आहे, इत्यादि प्रकारें या उपनिषदांतच प्रतिपादित झालें आहे. त्याच स्वरूपाची स्तुति व नति (नमस्कार) हे आचार्य करितात.

**भा०—पूर्णशक्तिचिदानंदश्रीतेजःस्पष्टमूर्तये ।**
**ममाभ्यधिकभिन्नाय* नमो नारायणाय ते ॥**

**इति श्रीमदानंदतीर्थभगवत्पादाचार्यविरचितमीशावास्योपनिषद्भाष्यं संपूर्णम् ॥**

**ज० वि०—पूर्णेति । पूर्णशक्तिचिदानंदश्रीतेजांस्येवमूर्तिर्यस्येत्युक्ते करचरणादिमान्विग्रहो नास्तीति प्रतीतिः स्यात् । अत उक्तम्—स्पष्टेति । स्पष्टा प्रसिद्धा करचरणादिमतीत्यर्थः । अभ्यधिकमित्रं । निरातिशयोपकारकम् । अतिपरमप्रीतिविषयश्चेति ॥**

**कमलावदनांभोजराजहंसाय विष्णवे ।**
**नमो जगज्जनिस्थेमहेतवे परमात्मने ॥**

**इति श्रीमदानन्दतीर्थभगवत्पादविरचितस्य याज्ञीयमंत्रभाष्यस्य विवरणं श्रीमज्जयतीर्थभिक्षुविरचितं संपूर्णम् ॥ ७ ॥**

* "अभ्यधिकभिन्नाय" असा पाठ आहे त्याचा अर्थ माझ्या स्वरूपाहून अत्यंत भिन्नस्वरूप असणाऱ्या देवा! असा आहे. श्रीमज्जयतीर्थांचा पाठ अभ्यधिकमित्राय असा आहे.

सिद्धान्ती—हे पूर्ण-शक्ति, चिदानंदरूपी, षड्गुणैश्वर्य-संपन्न, स्पष्टमूर्ति-धरा! माझें आत्यंतिक कल्याण करणाऱ्या सुहृदा! नारायणा! मीं तुला नमस्कार करितों।

शिष्य—ह्या एवंगुणविशिष्ट देवाला हस्तपादादि शरीर नाहीं अशी शंका येईल; तिचा निरास करण्यासाठीं भाष्यकारांनीं 'स्पष्ट आहे शरीर ज्याचें म्हणजे प्रसिद्ध करचरणादि आहेत ज्यास' असें "स्पष्टमूर्ति" या विशेषणानें उल्लेखित केलें आहे. होय ना?

सिद्धान्ती—बरोबर समजलास. अत्यंत उपकार करणारा अति उत्कट प्रीतीचें स्थान तो अभ्यधिक मित्र होय. असो; शिष्या! येथें श्रीमद्भाष्यकारांचें व्याख्यान समाप्त झालें. आतां आपण श्रीमद्भगवंतास नमस्कार करून आपलेंही विवरण पूर्ण करूं.

हे लक्ष्मी-वदन-कमलाच्या राज-हंसा! हे विष्णो! हे विश्वाच्या उत्पत्ति-स्थिति-इत्यादिकांच्या आदिकारणा! हे परमात्मन्! तुला आम्ही नमस्कार करितों.

याप्रमाणें श्रीमदानंदतीर्थकृत भाष्याचें व श्रीमज्जयतीर्थकृत विवरणाचें भाषांतर संपलें.

---

# श्रीमद्दयानंदस्वामि-शिष्यश्रीभीमशर्म-कृतव्याख्या.

## मंत्र पहिला.

यत् किञ्च ( यत्किमपि ) जगत्याम् ( पृथिव्याम् ) जगत्-( चलनात्मकं स्वरूपतो न्यूनाधिक्येन वर्तमानं प्रत्यक्षं घटाद्यात्मकमप्रत्यक्षमनुमानगम्यं परमाण्वाकाशमनोबुद्ध्याद्यात्मकम् ) अस्ति तदिदम् ( आत्मापेक्षया प्रत्यक्षमेव ) सर्वम् ( कार्यकारणरूपेणोभयात्मकम् ) ईशा-( यस्यैश्वर्यं साम्यातिशयविनिर्मुक्तं तेन ) वास्यम्-( आच्छादयितुं योग्यमर्थाद्यद्वस्तु यदन्तर्गतं भवति तत्तेनैवाच्छाद्यते जगच्चेश्वरापेक्षयाऽतिन्यूनमत एव तेनाच्छाद्यं तदन्तर्गतमिति भावः । सर्वमात्मन्यवस्थितमिति स्मरणाच्च । यद्वा वासयितुं योग्यं वास्यं एजन्ताक्तत् । तेनैव स्वस्वयोनौ कर्मानुसारतः सर्वः प्राणी वासित इति भावः । अथवा वस्तुं योग्यं वास्यं व्यापकत्वादीश्वर एव सर्वस्मिँश्चराचरात्मके जगति वस्तुमर्हति नान्यः कश्चिदिति। तथाचोक्तम्-एको देवः सर्वभूतेषु गूढ इत्यादि) तेन ( ईशा परमात्मना ) त्यक्तेन-( प्रारब्धकर्मानुसारतो दत्तेन न्यायतोऽनपेतेनान्नादिना ) भुञ्जीथाः- ( भृत्यविभागपूर्वकमविरोधेन भुङ्क्ष्व । एकः स्वादु न भुञ्जीतेति स्मृतेः ) मा गृधः कस्य स्विद्धनम्-(कस्य चिदन्यस्यान्यायतो धनादिपदार्थं मा काङ्क्षीः । यद्वा तेनेशा जगदुत्पत्त्यादि कर्म कुर्वताऽपि त्यक्तेन तन्नित्यत्वादिधर्मापेतेन जगता त्वं भुञ्जीथाः । कार्यं कर्म कुर्वन्नपि तत्फलानि मा गृधः तत्फलेष्वासक्तिं मा कुरु । इदं च मुक्तेः परमं साधनम् । कुतः धनं कस्यस्वित् न कस्यापि किन्तु यस्य यस्य सनीड आगच्छति स स मुधैव स्वत्वेनाभिमन्यते । यद्वा तेन त्यक्तेन व्याप्तेनापि नश्वरत्वादिजगद्धर्मालिप्तेनार्थाद्दुःखाद्यात्मके जगति वर्तमानेनापि दुःखविमुक्तेनेशा सह तदभिमुखस्त्वं भुञ्जीथाः कार्यं कर्म पालयेथाः मा गृधः तृष्णाविशेषं मा कुरु । कस्य स्विद्धनं सर्वाध्यक्षस्य कस्य चिदेकस्य ईश्वरस्यैव धनमस्ति न तु सर्वस्य अतस्त्वं धनादिविषयां संसारसुखभोगतृष्णां विहायेश्वरज्ञानोपासनादिकर्माणि द्वन्द्वमोहराहित्येन कुर्वन् निःश्रेयसमाप्नुहीत्याशयः ॥ १ ॥

दिसणाऱ्या घटाप्रमाणें प्रत्यक्ष किंवा अनुमानानें निश्चित होणाऱ्या परमाणु, आकाश, मन, बुद्धि यांप्रमाणें जें कांहीं या पृथ्वीमध्यें स्वरूपतः न्यून अधिक प्रमाणानें अवस्थित असतें, तें हें सर्व कार्यकारणरूप दृश्य पदार्थजात हें षड्गुणैश्वर्यसंपन्न आणि अद्वितीय अशा परमेश्वरानें आच्छादिलेलें आहे. हे सर्व दृश्य पदार्थ परमेश्वराच्याच स्वरूपांत राहतात; कारण परमेश्वर हा अनंत व अमर्याद आहे. आपण प्रत्यक्ष पाहतों कीं, आच्छादक वस्तु ही आच्छाद्य वस्तूपेक्षां मोठी असते. आतां ईश्वराच्या दृष्टीनें किंवा तुलनेनें तन्निर्मित सर्व पदार्थ अत्यंत न्यून असतात, परमेश्वराच्या पासंगालाही पुरत नाहींत, म्हणून हे सर्व आच्छादित पदार्थ परमेश्वरामध्यें अंतर्भूत होतात. स्मृतिही हेंच म्हणते.—'सर्व पदार्थ आत्म्यामध्यें असतात.'

किंवा सर्व प्राण्यांस स्वकर्मानुसार परमेश्वरच निराळ्या योनीमध्यें जन्मास घालतो असाही अर्थ होईल. अर्थात्, त्याचें ही हें वसतिस्थान झालें.

किंवा ईश्वर सर्वव्यापी आहे म्हणून तोच एक सर्व चराचरात्मक विश्वपदार्थांना व्यापून राहिला आहे, असा अर्थही प्रमाण आहे. श्रुतिही हेंच म्हणते. सर्व भूतांच्या अंतर्यामीं एकच एक असणारा परमेश्वर सर्वत्र वास्तव्य करितो. त्या परमेश्वरानें जीवादिकांस आपल्या प्रारब्ध कर्माप्रमाणें जें काय दिलें असेल अथवा सत्कर्मानें प्राप्त झालें असेल, त्याचा मात्र न्यायपद्धतीनें उपभोग घ्यावा. म्हणजे पुत्र, मित्र, कलत्र, भृत्य, इत्यादिकांस त्यांचे त्यांचे भाग देऊन मग आपण उपभोग घ्यावा. 'एकट्यानेंच एखाद्या गोड किंवा सुखदायी पदार्थाचा उपभोग घेऊं नये.' अशी स्मृति आहे. याचप्रमाणें अन्यायानें कोणाचेंही धनादि पदार्थ घेण्याची इच्छा करूं नये. सारांश, या मंत्राचा अर्थ असा कीं, अखिल विश्वांतील सर्वव्यापी पदार्थांमध्यें वास्तव्य करून त्यांचें नियमन करणाऱ्या महेश्वरानें आपल्या प्रारब्धकर्मानुसार जें कांहीं आपल्यास दिलें असेल त्याचा आपल्या कुटुंबांतील सर्व मनुष्यांस यथायोग्य भाग दिल्यानंतर प्रत्येक जीवानें आपल्या भागाचा निर्मलमनानें उपभोग घ्यावा.

अथवा, जगताची उत्पत्ति–स्थिति–संहार करणाऱ्या परमेश्वरानें अनित्य धर्मी जगताचा जसा त्याग केला आहे, तसाच तूं आपलें कर्तव्यकर्म करून केलेल्या कर्माच्या फलाची आसक्ति धरूं नकोस. म्हणजे फलाचा त्याग कर. अशा प्रकारचें आचरण मुक्तीचें श्रेष्ठ साधन आहे, पहा कीं खरें म्हटलें असतां येथें कोणालाही 'हें माझें आहे' असें म्हणतां येत नाहीं. कांहीं कालपर्यंत मात्र एखादी वस्तू एखाद्याच्या स्वाधीन असते. पण आपण मात्र ती माझी आहे असा व्यर्थ अभिमान धरीत असतों !

अथवा, ह्या स्वव्याप्त जगाच्या अनित्यत्वादि धर्मांचा स्पर्शही अंगास लागूं न देतां या दुःखात्मक जगतांत स्वकार्य करणाऱ्या दुःखशून्य परमेश्वराच्या

साक्षीनें आपलें स्वकर्म करीत जा. कोणत्याही गोष्टीची तृष्णा धरूं नकोस. कारण, हे सर्व दृश्य पदार्थ ज्ञानरूपी व सर्वसाक्षी परमेश्वराचे आहेत, इतर कोणाचेंही स्वामित्व या जगतावर व तद्गत पदार्थांवर नाहीं. म्हणून तूं धनाविषयींची व संसारसुखभोगाविषयींची तृष्णा सोडून देऊन ईश्वराचें ज्ञान मिळविणें, ईश्वराची उपासना करणें इत्यादि कर्मे मात्र करित जा. सुखदुःखाची व शीतोष्णाची भावना सोडून देऊन व मोहाचा त्याग करून जर तूं स्वकर्म करित राहिलास तर मात्र तुला मोक्षप्राप्ति होईल.

तात्पर्य, 'निष्कामवृत्तीनें स्वकर्तव्य कर' असा या मंत्राचा सारांश आहे. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

इह ( अस्मिन् संसारे मनुष्यजन्मनि वा ) कर्माणि ( कर्तुं योग्यानि कर्माण्यग्निहोत्रादीनि नित्यनैमित्तिकभेदभिन्नानि वेदादिसच्छास्त्रप्रतिपादितानि विधिनिषेधमुखपराणि निःश्रेयसहेतूनि ) कुर्वन्नेव शतं समाः ( जीवेम शरदः शतमित्यादि वेदप्रामाण्यान्मनुष्यस्यायुषः शतं वर्षाण्यवधिः । अतः शतं वर्षाणि ) जिजीविषेत् ( जीवितुमिच्छेत् ) एवम् ( उक्तप्रकारेण निष्कामं कर्म कुर्वन् जिजीविषति ) त्वयि नरे ( मनुष्ये ) कर्म न लिप्यते ( असारसंसारसागरसंसरणहेतुकं न भवतीति भावः ) इतः ( उक्तप्रकारात् ) अन्यथा ( अन्यः प्रकारः कर्मालेपस्य ) न ( नास्ति ) ( अर्थाल्लौकिकफलभोगाकाङ्क्षया कर्माणि कुर्वंस्तु लिप्यत एव । यथा यावज्जीवं स्वभावसिद्धानि प्राणयात्रापराणि कर्माणि ज्ञानिभिरपि क्रियन्त एव । एवं तैर्यथाधिकारं यथाकालं यथादेशं यथावेषं यथावस्थं च कार्यं कर्म कर्तव्यमेव । स्मृतं च "कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन" इति । "कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादय इति च" संन्यासिनां च स एव संन्यासो यत्कर्मफलानां समन्ताद्दृष्टानुश्रविकविषयभेदेन त्यागः । उक्तञ्च–"अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः । स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः" अतोऽत्रात्मज्ञानाशक्तस्य कर्मोपदेशं वदन्तः प्रत्युक्ताः । तस्मात्कर्माणि कुर्वन्नेव जिजीविषेत् न त्वालस्याश्वारूढो नैष्कर्म्यमापन्नो जिजीविषेदिति मन्त्राशयः ॥ २ ॥

म्हणजे या संसारांत अग्निहोत्रादि विधि-निषेधपर व वेदशास्त्रविहित आणि मोक्षाला कारण असणारीं नित्यनैमित्तिक योग्य कर्में जों पर्यंत आयुष्य आहे तों पर्यंत करण्याची इच्छा धरावी. 'मनुष्याच्या आयुष्याची मर्यादा शंभर वर्षें आहे.' असें वेद म्हणतात. 'शंभर वर्षें आम्हीं जगूं किंवा आम्हांस जगूं दे.' असें वेदांत प्रत्यक्ष म्हटलें आहे. असो; वरील प्रकारचें निष्कामकर्म जीवांनीं यावज्जन्म केलें तर त्यांना ह्या कर्मांचा लेप होत नाहीं. कारण हें त्यांचें कर्म त्यांस या सारशून्य व दुःखात्मक संसारांत घालणारें नसतें. पण यांहून इतर प्रकारचें कर्म म्हणजे काम्य कर्म ( ऐहिक किंवा पारमार्थिक कर्म, फलाच्या आशेनें केलेलें कर्म ) संसाराचें जनक होतें. या काम्य कर्मांचा लेप आपल्या अंगावर चढतो. सारांश, आपण कर्मलिप्त होतों.

याप्रमाणें काम्य कर्म, संसारजनक, आणि निष्काम्य कर्म संसाराचा बाध करणारें असतें. या निष्काम्य कर्मांतच स्नान-भोजनादि जीव-यात्रा चालविणारीं स्वाभाविक कर्में येतात आणि हीं ज्ञानी लोकांना सुद्धां करावीं लागतात, त्यांच्या हातून हीं कर्में सहजच होत असतात. सारांश, आपल्या अधिकाराप्रमाणें व काल, देश, वेष, वर्तमान पाहून वर्णाश्रमास योग्य अशीं नित्य कर्में जीवानें केलींच पाहिजेत. सारांश, परिस्थितीस आवश्यक असणारीं कर्में जीवानें केलींच पाहिजेत. गीतेमध्येंही असाच उपदेश आहे.

"तुझा कर्म करण्याचा मात्र अधिकार आहे; पण कर्म-फलावर तुझी यत्किंतही सत्ता नाहीं." व कर्मांच्या साहाय्यानें मात्र जनकादि राजे जन्म-सार्थक्य करिते झाले." असा अर्जुनास श्रीकृष्णानें उपदेश केला आहे. जे लोक संन्यासी असतील, त्यांचा तोच कर्मसंन्यास होय कीं, ज्याच्या योगानें दृष्ट किंवा श्रुत फल देणाऱ्या काम्यकर्मांचा फलासह सर्वथा त्याग होत असतो. म्हटलें आहे—

"कर्मफलावर कोणत्याही प्रकारची आसक्ति न ठेवितां जो सर्वथा अवश्य असलेलें निष्काम्य कर्म करितो, नित्य कर्म करितो, तोच खरा संन्यासी व तोच योगी होय. जो कोणत्याही प्रकारचें नित्य असणारें लौकिक किंवा वैदिक कर्तव्यकर्म करीत नाहीं, तो सन्यासीही नव्हे व योगीहि नव्हे." असाही गीतेचा सिद्धान्त आहे.

म्हणून "येथें या मंत्रांत आत्मज्ञान करून घेण्याला जे समर्थ नसतात, त्यानांच मात्र कर्मांचा उपदेश आहे, ज्ञानी लोकांना कर्म करण्याचें मुळींच कारण नाहीं." असें जे लोक ( अद्वैतवेदान्ती ) म्हणतात, त्यांचा श्रुतीनें निषेध केला आहे. सारांश, श्रुतीचें तात्पर्य असें आहे कीं आयुष्य आहे तोंपर्यंत जीवानें अवश्य कर्में केलींच पाहिजेत. "आपण नैष्कर्म्य स्थितीस म्हणजे ज्ञानस्थितीस प्राप्त झालों." असें म्हणून "केवळ आलस्यरूपी अश्वावर

बसून राहूं, आम्हीं कर्म करणार नाहीं.' असा ज्ञानीं जीवांनीं सुद्धां अभिमान न धरितां नित्य नैमित्तिक कर्में करण्याचा अभ्यास रात्रंदिवस ठेवावा. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

इदानीमस्मात्स्त्र्यन्नपानैश्वर्ययौवनप्रभुत्वराज्यादिजन्यदृष्टसुखात्परं पारमार्थिकमात्मज्ञानानुभूतमव्याहतं सुखं न मन्यन्ते न वा जानन्ति तदर्थं वा न प्रयतन्ते तेषामनिष्टफलवादरूपा निन्दोच्यते। उक्तं च भगवद्गीतासु—

भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम्।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥

ये के च ( ये के चित् ) आत्महनः ( कामक्रोधादिवशानुगतयाऽविद्यादिदोषेण वा तिरस्करणात् सर्वाध्यक्षं पितृवदुत्पाद्यपालकं शुद्धं सनातनमात्मानं घ्नन्ति तद्विमुखा भवन्त्यत एव कृतघ्नत्वादिदोषदूषिताः सन्तः ) अन्धेन तमसाऽऽवृताः ( अदर्शनात्मकेनाज्ञानेन तमसा ग्लानिकारकेणानन्दबाधकेनावृता आच्छादिताः ) ते नाम ( प्रसिद्धौ ) जना असुर्या असुषु प्राणेषु तत्पोषणादिव्यवहारे रममाणास्तेषामिमे स्वे सम्बन्धिनस्तदन्तर्गताः ) लोकाः ( कर्मफलानि लोकमानाः फलभोगोत्सुकाः ) सन्ति। ते च प्रेत्य ( शरीरं त्यक्त्वा ) तान् ( असुरसम्बन्धिनः स्थावरान्तान् देहान् ) अपि गच्छन्ति ( निश्चयेन प्राप्नुवन्ति सर्वासु योनिषु जन्ममरणादिप्रवाहेण भ्रमन्ति ) आत्मज्ञानप्लवेनैकेनैव साधनेन सन्तरन्तीति मत्वाऽऽत्मज्ञानोपायः कर्तव्य इत्याशयः ॥ ३ ॥

ह्या मंत्रांत असें सांगितलें आहे कीं, 'स्त्रिया अन्न, पान, ऐश्वर्य, यौवन, प्रभुत्व, राज्य, इत्यादिकांपासून उत्पन्न होणाऱ्या सुखांपेक्षां कोणतेंच सुख जास्ती श्रेष्ठ नाहीं. व आत्मज्ञानापासून उत्पन्न होणाऱ्या शुद्ध व नित्य सुखाचीही मातब्बरी ह्या ऐहिक सुखापुढें कांहींच नाहीं.' असें जे लोक म्हणतात व आत्मसुखासाठीं जे लोक कोणत्याही प्रकारचा प्रयत्न करीत नाहींत, त्या लोकांस अत्यंत अनिष्ट अथवा दुःखदायक फल मिळतें. असें सांगून त्या लोकांची निंदाही ह्या मंत्रांत केली आहे. गीतेमध्येंही म्हटलें आहे कीं भोगांच्या ऐश्वर्याला आसक्त झालेले, भोगाला लुब्ध होऊन वेडे झालेले लोकांच्या बुद्धीला केव्हांही निश्चितपणा येत नाहीं. आणि त्यांना केव्हांही समाधिसुखाचें समाधान प्राप्त होत नाहीं.

काम–क्रोधादिकांना वश झाल्यामुळें किंवा अविद्येच्या पाशांत सांपडल्यामुळें दोषयुक्त झालेले लोक, आपला आत्मघात करूं इच्छिणारे, आपला, सर्वसाक्षी व पित्याप्रमाणें उत्पन्न करून पालन करणारा, शुद्ध व सनातन जो आत्मा त्याचा घात करणारे लोक काय करितात ? याला उत्तर असें कीं ते लोक आत्मविन्मुख होऊन आपल्या पदरीं कृतघ्नता, मूर्खता, इत्यादि अनेक दोष स्वाभाविक रीतीनें पाडून घेतात. यांच्या पदरीं आत्मारामविषयक अंधकारी अज्ञानाचें मोठें थोरलें गांटोडें पडलें असल्यामुळें ते लोक सर्वदा ग्लानि उत्पन्न करणाऱ्या आणि आनंदाचा नाश करणाऱ्या दुःखानें व्याप्त झालेले असतात. ह्या लोकांस सत्य कोणतें, व असत्य कोणतें, हें कांहींच कळत नाहीं. अर्थातच हे लोक आपल्या प्राणमात्र रक्षण करणाऱ्या अन्नपानाच्या भोगांमध्यें रममाण होत असल्यामुळें ते कर्मफलांचा मात्र म्हणजे सुखदुःखाचा मात्र उपभोग घेणारे आहेत, अशी स्थिति प्राप्त होते व ते मेल्यावर म्हणजे त्यांचा देहपात झाल्यावर त्यांस जन्म-मरणाचा प्रवाह उत्पन्न करून भ्रमण करावयास लावणाऱ्या दुखःदायक जड शरीरांमध्यें वास्तव्य करावें लागतें. ते लोक संसारसागराच्या प्रचंड प्रवाहामध्यें सांपडल्यामुळें अनंत दुःखद जन्मांमध्यें इकडे तिकडे वेड्यासारखे भ्रमण करित असतात.

सारांश, या श्रुतीचें तात्पर्य असें आहे कीं जीवानें ज्ञानरूप नौकेचा मात्र आश्रय करून ह्या संसारसागरांतून तरून जावें. प्रत्येक जीवानें हा निश्चय करावा, असा श्रुतीचा उपदेश आहे. तात्पर्य, प्रत्येकानें ज्ञानाचा आश्रय करावा, अशी श्रुतिमाउलीची इच्छा आहे ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

अतः पूर्वस्मिन् मन्त्रे ये के चात्महनो जना इत्युक्तम् । तदात्मतत्त्वं कीदृशमित्युच्यते—

यद् ब्रह्म मनसो जवीयः (भौतिकेन्द्रियाणामधिष्ठातृ मनो विषयावधि गतिमत्—ब्रह्म तु विषयातिक्रान्तं यत्र मनसो गतिरपि नास्ति तत्रापि विद्यत एवेति भावः । कस्यचिद्विषयस्य सुसमूर्षया सहस्रं क्रोशान् मनः सद्यस्तरां गच्छति यावता कालेन मनस्तत्र गच्छति ततः परमपि ब्रह्म पूर्वत एव स्थितं सर्वव्यापित्वादिति मनसो जवीयस्त्वं ब्रह्मणः) तत्—एकं (अद्वितीयम्) अत एवानेजत् (एजनं कम्पः स तु साकारस्य धर्मो यस्तु कम्परहितो निराकारः स इति निश्चीयते। अथवाऽनेजन्निर्भयम् । द्वितीयाद्वै भयं भवतीति श्रुतेर्न तादृशोऽन्यः कश्चिदस्ति तस्यैकत्वादिति लोके

यदतिवेगवद्वस्तु तस्य क्रियावत्त्वादकम्पनं विरुद्धम् । ब्रह्म तु जवीयस्त्वेऽप्यकम्पं कूटस्थमिति । अनेजज्जवीयश्चेति विशेषणद्वयेन विरोधालङ्कारो भासत इति । एनत् ( मनोगतिमतिक्रान्तमत एव ) देवाः ( विषयद्योतकानीन्द्रियाणि ) नाप्नुवन् ( न प्राप्नुवन्ति स्वस्वविषयग्राहकत्वं तत्तदिन्द्रियत्वं न कश्चिद्भौतिको विषय आत्मा यमिन्द्रियाण्याप्नुयुरिति ) यद्यपि पूर्वमर्षत्—( इन्द्रियविषयादिषु पूर्वत एव व्योमवद् व्याप्त आत्मा तथापीन्द्रियाविषयोऽतः श्रोत्रेण रूपग्रहणवत्तैर्न गृह्यते ) तत् तिष्ठत् ( गतिनिवृत्तम् ) धावतोऽन्यान् ( स्वस्वविषयान् प्रतिपतत इन्द्रियादीन् ) अत्येति—( उल्लङ्घ्य परस्परं गच्छतीव न कश्चिदिन्द्रियादिसाधनैर्ब्रह्म प्राप्तुमर्हतीति भावः ) अथवाऽनित्यैश्वर्यवस्तु जलस्थलादिजडपदार्थेषु ब्रह्मप्राप्त्यर्थं धावतोऽन्यान् विदुष इतरानविदुषोऽत्येति । यतो-यतस्ते धावन्ति ततस्ततः प्राप्तेरसम्भवात् । कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षत् । इहैव निहितो गुहायामिति च प्रतिपादनात्प्रत्यगात्मं धावता प्राप्तेः सम्भवः । तस्मिन्—( ब्रह्मणि सत्येव तस्य सत्तायामेव ) मातरिश्वा ( वायुः ) अपः ( जलानि मेघादिरूपाणि ) दधाति—( धारयति—आत्मसत्ताबलीयसी ) अथवा तस्मिन्सत्येव मातरिश्वा वायुर्देहेन्द्रियादिष्वपः कर्माणि दधाति । सूत्रात्मको वायुरपि ब्राह्मीं सत्तामन्तरेण चेष्टाहेतुर्भवितुमशक्त इति । अथवा तस्मिन्सत्येव मातरिश्वा प्राणो नाम वायुरपः कर्माणि—ऊर्ध्वगमनादीनि धारयति । स उ प्राणस्य प्राण इति प्रामाण्यादात्मसत्तामन्तरा प्राणोऽपि स्वचेष्टां कर्तुमक्षम इति । अथवा तस्मिन्परमात्मनि सत्येव मातृस्थ उदरे गर्भाशये श्वयति वर्द्धते श्वसितीति वा मातरिश्वा जीवात्माऽपः कर्माणि दधाति । असति शुभाशुभकर्मफलदातरि ब्रह्मणि प्रयोजनाभावात्कर्मधारणमप्यसम्भवम् । ईश्वरव्यवस्थया कर्मफलं प्राप्स्याम इति मत्वैव जीवात्मभिः शुभं कर्म ध्रियते क्रियते च । अशुभं तु शुभभ्रान्त्या कामक्रोधादिवशेन वा क्रियत इति ॥ ४ ॥

या मंत्रांत ' आत्मतत्त्वाचें स्वरूप काय आहे ? ' तें सांगितलें आहे, पूर्वीच्या मंत्रांत आत्मघाती लोकांचें वर्णन केलें म्हणून येथें आत्मस्वरूप कसें आहे तें सांगण्याची आवश्यकता प्राप्त झाली.

हें ब्रह्मस्वरूप मनापेक्षांही जास्त वेगवान् आहे. कारण आपलीं जीं भौतिक ( जड ) इंद्रियें आहेत, त्यांच्यावर मात्र मनाचें स्वामित्व आहे. मनाची धांव

विषयांपर्यंत मात्र असते. पण ब्रह्मवस्तूची धांव विषयांच्याही पलीकडे जाणारी असते. जेथें मनाची गतिही नसते, मनाला जेथें प्रवेश सुद्धां करितां येत नाहीं, तेथेंही ब्रह्मवस्तूचें वास्तव्य असतें. असें श्रुतीचें तात्पर्य आहे. पहा कीं, आपल्यास एखाद्या विषयाचें स्मरण होऊन आपलें मन हजारों कोस दूर असणाऱ्या विषयापर्यंत एका क्षणामध्यें जाऊन पोहचतें; पण आपल्यास असें आढळतें कीं, आपलें मन त्या स्मरण झालेल्या विषयापर्यंत जाऊन पोंचण्याच्या आधींच ब्रह्मवस्तु तेथें असते व ती आपल्या दृष्टीस पडते ! ब्रह्म हें सर्वव्यापी आहे म्हणून मनापेक्षां ब्रह्मवस्तूचा वेग अनंतपट अधिक आहे, हें उघड आहे.

तें हें ब्रह्म एकच आहे, अद्वितीय आहे; या विश्वांत दुसरी कांहीं वस्तूच नाहीं. म्हणून तें कंपरहित आहे, कंप हा ( हालचालही ) साकार वस्तूचा धर्म आहे. अर्थातच ज्याला कंप नाहीं तें ब्रह्म निराकार असलें पाहिजे. तसेंच तें भीतिशून्यही असलें पाहिजे. ' दोन वस्तु असतील तर परस्परांस एकमेकांपासून भय उत्पन्न होतें ' अशी श्रुति आहे. ब्रह्मासारखी दुसरी वस्तूच नाहीं, तें स्वरूपानें एकच आहे, म्हणून तें निर्भय व निश्चल आहे. या जगामध्यें जी वेगवान् म्हणून वस्तू आहे; ती कर्म करणारी, हालचाल करणारी असल्यामुळें तिच्यामध्यें निष्कंपता हा धर्म असणें अशक्य आहे; पण ब्रह्मही अतिशय वेगवान् वस्तु आहे तरी निष्कंपच ( निश्चलच ) आहे. कारण ही वस्तू सर्वव्यापी असल्यामुळें कूटस्थ ( म्हणजे लोहारांच्या ऐरणी सारखी स्थिर ) असते. अर्थात या मंत्रांत अतिशय वेगवान् वस्तूही अतिशय स्थिर असते असा विरोधाभास नामक मनोहर अलंकार सहज साधला गेला आहे. पण त्याचा परिहार असा आहे कीं तें सर्वव्यापी असल्यामुळें स्थिरही आहे व सर्वगामीही आहे !

मनाची गति पाठीमागें टाकणारे देव सुद्धां ह्या ब्रह्मवस्तूला गांठूं शकत नाहींत. देव म्हणजे विषयाला प्रकाशित करणारीं आपलीं ज्ञानेंद्रियें होत. हीं इंद्रियें आपापल्या भौतिक विषयांचें मात्र ग्रहण करित असतात. आत्मा ही वस्तू कांहीं भौतिक म्हणजे जड नव्हे. म्हणून जड वस्तूंचें ग्रहण करणाऱ्या इंद्रियांना ज्ञानरूपी आत्मवस्तूची प्राप्ति करून घेतां येणें शक्य नाहीं. यद्यपि इंद्रियांच्या विषयांमध्यें, रूपरसादि विषयांमध्यें, आकाशाप्रमाणेंच आत्मस्वरूपही विद्यमान असतें; तथापि आत्मस्वरूप जाणणें हा इंद्रियांचा विषय नव्हे, म्हणून त्यांस आत्मस्वरूप कळत नाहीं. सारांश, इंद्रियांचे सामर्थ्याला आत्मस्वरूप अगोचरच आहे. कानाला जसें पदार्थाचें रूप दिसत नाहीं, तसेंच इंद्रियांस आत्मस्वरूप दिसत नाहीं. हें सर्वव्यापी ब्रह्म गतिशून्य आहे, म्हणून आपापल्या विषयांकडे धांवणाऱ्या इंद्रियांचें उल्लंघन करून जणूं कांहीं लांब लांब पळत असतें. तात्पर्य, इंद्रियादिसाधनांच्या साहाय्यानें ब्रह्मरूप प्राप्त करून घेतां येत नाहीं. तसेंच, जलस्थलादि अनित्य सुख

देणाऱ्या जड पदार्थांमध्यें आपल्यास ब्रह्म सांपडेल, नित्य सुख मिळेल, असें भ्रांतीनें समजून विषयांमध्यें रमणाऱ्या ज्ञानी व अज्ञानी लोकांस हें ब्रह्म केव्हांही मिळत नाहीं. जिकडे तिकडे ते धांवतात तिकडे तिकडे विषयच असल्यामुळें त्यांना विषयांमध्यें ब्रह्म मिळण्याची जी आशा असते तिची सर्वथा निराशा होते. पण ही ब्रह्मवस्तु एखाद्या शहाण्या माणसाला मात्र प्रत्यक्ष दिसते ! ही वस्तु ' अतिशय गूढ आहे ' असें सांगितलें आहे तरी ब्रह्मप्राप्तीसाठीं जे लोक योग्य प्रयत्न करितात, त्यांना त्यांच्या प्रयत्नांमध्यें यश प्राप्त होतें. हें ठीकच आहे.

या ब्रह्म वस्तूच्या अस्तित्वामध्येंच मातरिश्वा ( वायु ) हा जलरूप मेघादिरूपें, धारण धरितो अथवा जलाला मेघरूप धरावयास लावितो. हें केवळ बलवान् आत्मसत्तेचें सामर्थ्य आहे. अथवा त्या आत्मसत्तेच्या सामर्थ्यानेंच वायु हा देहेंद्रियांमध्यें कर्मांची स्थापना करितो व त्यांच्याकडून स्वस्वव्यापार करवून घेतो. याचें तात्पर्य असें आहे कीं, ब्रह्मसत्तेशिवाय सूत्रात्मक वायूला सुद्धां हालचाल करितां येणें अथवा चेष्टांचें कारण होतां येणें, शक्य नाहीं, आत्मसत्तेनें मात्र प्राणवायूला वर जाणें, खालीं येणें, इत्यादि क्रिया करितां येतात. " आत्मा हा प्राणाचा प्राण आहे " अशी श्रुति प्रमाणच आहे. सारांश, आत्मसत्तेवांचून प्राणालाही आपला व्यापार करितां येत नाहीं. तसेंच, या आत्मसत्तेवांचून मातेच्या गर्भांमध्यें राहणाऱ्या प्राण्याला श्वासोच्छास करितां येणार नाहीं किंवा गर्भस्थ प्राण्याला मोठें होतां येणार नाहीं. मातेच्या उदरामध्यें गर्भस्थ प्राण वाढतो व हालचाल करितो, म्हणून प्राणवायूला मातरिश्वा हें नांव आहे. उघड सारांश हा आहे कीं, शुभाशुभ फलें देणारा परमात्मा विद्यमान नसेल तर कर्म करण्याचा हेतुच नष्ट होऊन कर्मांचें आयुष्य व कर्मव्यापार थांबून जाईल, म्हणजे कर्मच संपेल. ' ईश्वराच्या व्यवस्थेनें मात्र आपल्याला कर्म-फलाची प्राप्ति होत असते, ' हा जीवात्म्याचा निश्चय असतो म्हणून तो शुभकर्मांचा संकल्प धरितो व शुभकर्म करितो. अशुभ कर्म कोणीच करूं इच्छित नाहीं. मात्र कामक्रोधादिकांना वश होऊन तो जीवात्मा अशुभ कर्में करितो; परंतु आपण शुभ कर्मेंच करित आहोंत असा त्याचा निश्चय असतो. ही भ्रांति आहे हें सांगावयास नकोच.

तात्पर्य, परमात्मा निराकार आहे; स्थिर आहे; निर्विकार आहे, इंद्रियांस अगोचर आहे, आणि विश्वांतील सर्व व्यवस्था त्याच्याच सत्तेनें चालते, म्हणून तो सर्वनियंताहि आहे. हेंच ब्रह्मस्वरूप होय. ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

तत्—( प्रकृतत्वात्परमात्मरूपं ब्रह्म ) एजति—(चलतीव, एकत्र दृष्टस्य वस्त्वन्तरेऽपि स्थितिमतो दर्शनादविदुषां मतेऽचलदपि चलतीव ) स्वरूपतस्तु न एजति—( नैव चलति । अनेजदिति विशेषणेन पूर्वमन्त्रे प्रतिपादनात् ) तत्—( ब्रह्म ) दूरे—( विषयासक्तैर्जन्मसहस्रेणाप्यप्राप्यम् ) तत् अन्तिके ( दृष्टानुश्रविकविषयवितृष्णानां तन्निष्ठविदुषां भक्तवत्सलत्वेनातिनिकटेऽस्ति ) तद्ब्रह्म—( अस्य सर्वस्य चराचरस्य जगतः ) अन्तः—( व्याप्तमस्ति ) तदु अस्य सर्वस्य बाह्यतः—( उ इति वितर्के यदान्तरीयां स्थितिमापन्नं भवति न तद् बाह्ये स्थितिमुपलभत इति लोके दृष्टचरमेव ब्रह्म तु तद्विरुद्धमिति उशब्देन द्योत्यते ) व्यापकत्वान्निरवयवत्वान्निराकारत्वात्सर्वस्य बाह्यमाभ्यन्तरं च व्याप्तमिति भावः ॥ ५ ॥

प्रकृत असणारा हा ब्रह्मरूपी परमात्मा, एका वस्तूमध्यें राहिला आहे, असें दिसत असूनही दुसऱ्या, तिसऱ्या, वस्तूंत दिसतो. सारांश, प्रत्येक वस्तूमध्यें हा एक काळींच स्थित आहे, असें दिसतें; म्हणून अविद्वान् लोक 'हा आत्मा चालतो' असें या नित्य अचल परमात्म्याला म्हणतात; पण तो स्वरूपतः सर्वव्यापी आहे, म्हणून कधींही चालत नाहीं. अथवा कोणत्याही प्रकारची हालचाल करीत नाहीं. हें पूर्वमंत्रांत सिद्ध केलेंच आहे. हा परमात्मा विषयासक्त लोकांस हजारों जन्मामध्येंही सांपडणार नाहीं, इतका दूर आहे; तथापि ज्या विद्वानांनीं ऐहिक व पारमार्थिक दृष्टादृष्ट विषयांचा व विषयसुखांचा सर्वथा त्याग केला आहे, त्या ब्रह्मनिष्ठ विद्वानांस सहज सांपडण्या इतका अत्यंत निकट ( जवळ ) असतो. कारण परमात्म्याचें भक्तवत्सलत्व फार विलक्षण आहे. हें ब्रह्म किंवा हा परमात्मा सर्व चराचर जगाला व्यापून टाकितो म्हणून तो त्यांच्या अंतर्यामींही असतो; पण चमत्कार असा आहे कीं, तो सर्व-व्यापक आहे, अवयवशून्य आहे, निराकार आहे, म्हणून सर्व चराचर वस्तूंच्या अंतर्यामाप्रमाणेंच बाह्य प्रदेशींही त्याचें वास्तव्य आहे; आपल्याला सामान्यतः असें दिसतें कीं, जी वस्तू आंत असते ती बाहेर नसते; व बाहेर असते ती आंत नसते; पण ब्रह्म वस्तू आंत असून बाहेर असते व बाहेर असून आंतही असते ! हाच चमत्कार होय, सारांश, सर्व वस्तूंस हा परमात्मा अंतर्बाह्य व्यापून असतो ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

पुनरात्मानं कीदृशं पश्येदित्युच्यते—

यः (शमदमादिसाधितसाधनः) सर्वाणि भूतानि—(उद्भूतानि चराचराणि विश्वानि) आत्मनि एव—(परमात्मन्येव) अनुपश्यति—(अनुगतं पश्यति) सर्वभूतेषु च—(अव्यक्तादिमहास्थूलावधिषु च) आत्मानमीश्वरमनुपश्याति—(सर्वस्य द्रष्टा साक्षीत्यनुजानाति) ततः—(आधारत्वेनेप्सिततमत्वेन वा स्वरक्षकस्य स्वामिनः सर्वत्र दर्शनात्) न विजुगुप्सते—निन्दितं न समाचराति। जुगुप्सनमित्युपलक्षणं पापानां तेन पापाचरणं न करोतीति "सर्वं ह्यात्मनि सम्पश्यन्नाधर्मं कुरुते मनः" इति मनुवचनात्।, स्वस्वामिनो मान्यस्य चाग्रे न कोप्यधर्माचरणं कर्तुमुत्सहत इति लौकिका अपि जानन्ति ब्रुवन्ति च। एवं यः स्वस्वामिनं सर्वत्र व्योमवद्व्याप्तं सर्वस्य द्रष्टारं जानीयात् नैव स स्वामिनोऽग्रे निन्दितमाचरितुमर्हति। यस्य किमप्याचरणं कस्यचिद्भयाद्गुप्तं न भवति एतदेव सर्वत्रात्मानं पश्यतो लिङ्गम्। यश्च शुभाशुभकर्मफलदाता स तु सर्वत्र पश्यति सर्वं, पुनः कस्माच्चित्पुरुषात् किं गोप्यम्॥ यद्वा यो ब्रह्मज्ञानाभिलाषुकः सर्वाणि भूतानि आत्मन्येव स्वस्यान्तःकरण एवानुपश्यति—अनुकूलानि पश्यति सर्वभूतेषु चात्मानं जीवात्मानं स्वात्मवदनुपश्यति तत एवं पश्यतो जानतो मनो न विजुगुप्सते घृणां न करोति स्वतो विपरीतं पश्यतो घृणा भवति। यथा स्वशरीरान्नहि घृणा जायते। एवं तद्वत्पश्यतोऽन्यतो न भविष्यति। विचिकित्सतीति पाठान्तरे संशयापन्नो न भवतीत्यर्थः॥ ६॥

पुन्हा ह्या आत्मस्वरूपाला आपण कसें ओळखावें तें सांगतात. पद्य:—

शमदमादि साधनांनीं सिद्ध झालेला विद्वान् पुरुष असें पाहतो कीं, उत्पन्न झालेलीं हीं चराचर विश्वें परमात्मस्वरूपामध्येंच अनुगत झालेलीं आहेत, जेथें जेथें परमात्मा असेल, तेथें तेथें आपल्यास हीं उत्पन्न झालेलीं विश्वें दिसावयाचींच. याचप्रमाणें मूल प्रकृतीपासून तों अत्यंत स्थूलपदार्थांपर्यंत सर्व सूक्ष्म स्थूलपदार्थांमध्यें परमात्मा आहे; सारांश, परमात्म्यांत विश्वें आहेत व विश्वांच्या अंतरंगांत परमात्मा आहे, असें विद्वान् पुरुषाला दिसतें. म्हणजे तो सर्व विश्वाचा साक्षी आहे, असें त्यास समजतें. सारांश, विश्वाला उत्पन्न करणाराही परमात्मा आहे, व त्याचा साक्षीही तो आहे. असा विद्वानांचा निश्चय झालेला असतो.

११—४८४—२-१०-११,

असो; हा सर्वांस आधार असणारा व सर्वांस ईप्सिततम ( अत्यंत प्रयत्नानें साध्य करून घ्यावयाची अत्यंत इष्ट गोष्ट म्हणजे परमात्मा होय ! ) असल्यामुळें व आपल्या स्वतःचें रक्षण करणाऱ्या स्वामीचें दर्शन वर सांगितल्याप्रमाणें याला नित्य होत असल्यामुळें, हा विद्वान् कोणत्याही प्रकारचें निंद्य अथवा पाप-मूलक आचरण करित नाहीं.

"सर्वत्र आत्मस्वरूपच आहे आणि आत्मस्वरूपांत सर्व आहे असें ज्ञान असणाऱ्या विद्वानाचें मन पापाचरणाकडे ढुंकूनही पहात नाहीं" असें मनूचें वचन आहे. आपल्यास मान्य असणाऱ्या पुरुषाच्या अथवा स्वस्वामीच्या इच्छे-विरुद्ध कोणीही भक्त व सेवक त्यांच्या देखत अधर्माचरण करित नाहीं किंवा करण्याची इच्छाही धरीत नाहीं. हें वृत्त आपणा सर्वांस ठाऊक आहे; आणि आपण ह्याप्रमाणें बोलतों ही. याच न्यायानें आपल्या सर्वज्ञ, सर्वसाक्षी, व आकाशवत् सर्वव्यापी स्वामीच्या ( परमेश्वराच्या ) समक्ष ज्ञानी पुरुष निंद्य आचरण कर-ण्याला योग्यच नसतो किंवा समर्थही असत नाहीं. उघडच आहे कीं, कसल्याही प्रकारचें आचरण कितीही गुप्त ठेवलें तरी परमेश्वरास तें दिसणार, असा ज्या विद्वानाचा निश्चय झाला तो निंद्याचरण करणारच नाहीं.

शिष्य—आपण केव्हां केव्हां गुप्त आचरण करितों; कारण तें पापात्मक असतें म्हणून व पापात्मक आचरण गुप्त ठेवितों; कारण आपल्यास कोणाची तरी भीति असते म्हणून ! सारांश, अनात्मज्ञाला भीतीचें कारण आहे. पण सर्वत्र परमेश्वर पाहणाऱ्याचें मात्र आचरण भीतिशून्य आणि म्हणून स्वच्छ असतें; होयना ? भगवन् !

गुरुजी—उत्तम ! अरे ! ह्या असल्या निंद्य आचरणापासून सदैव निवृत्त होणें हें आत्मज्ञानीपुरुषाचें, सर्व ठिकाणीं ईश्वर पाहणाऱ्या पुरुषाचें, चिन्हच आहे ! शुभाशुभ कर्मांचें फल देणारा परमेश्वर जर सर्व-साक्षी आहे, तर त्या परम पुरुषापासून कोणती गोष्ट लपवून ठेवतां येणार ? अर्थातच कोणतीही नाहीं. म्हणून ब्रह्मज्ञानी पुरुष केव्हांही निंद्याचरण (किंवा त्याचा संकल्प) करितच नाहीं.

शिष्य—या मंत्राचा दुसरा अर्थ होईल काय ? कीं ब्रह्मज्ञानाची इच्छा धारण करणारा विद्वान् सर्व भूतें आपल्या अंतःकरणामध्येंच आहेत असें जाणून घेतो.

गुरुजी—हो हो ? ? अरे ! या रीतीनें सर्व पदार्थ आपल्याला मिळाले आहेत असें जाणून, हा ज्ञानी पुरुष परद्रव्याची अथवा परदारांची इच्छाच करित नाहीं किंवा त्यांचें चिंतनही करित नाहीं. आपल्यास या जगांत कोणी शत्रू आहेत, असें त्यास वाटतच नाहीं. तसेंच सर्व भूतांमध्यें आपला जीवात्मा वास्तव्य करित आहे, असें जाणून तो सर्वांस आपल्याप्रमाणेंच पाहूं लागतो. ही स्थिति प्राप्त झाली म्हणजे त्याला लाजण्याचें कारणच राहत नाहीं. आपण कांहीं तरी विपरीत गोष्ट करीत आहोंत, असें वाटत असलें म्हणजे आपल्यास लज्जा उत्पन्न

होते. पण जो वाईट काम करितच नाहीं, त्याला लाज कसली ? पहा कीं, आपल्या स्वतःच्या शरीराला आपण कधीं लाजत नाहीं. तसेंच, सर्वत्र आत्मस्वरूप भरलें आहे, असें पाहणाऱ्याला इतरांपासून लाजण्याचें कारणच राहत नाहीं किंवा त्याला इतरांचा संशय येण्याचें कारणही उरत नाहीं. हा शेवटील 'संशयवादी' अर्थ ह्या मंत्रांत "विजुगुप्सते" असा पाठ आहे, त्याच्या ऐवजीं "विचिकित्सति" असा पाठ असेल तर करावा ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

***(यस्मिन्) भूतेभ्यो विरागे सम्प्रज्ञातासम्प्रज्ञातसमाधिकाले (विजानतः) विशेषेण ज्ञानवतः पुरुषस्यैहिकसुखभोगात्प्राप्तवैराग्यस्य (सर्वाणि भूतानि) इष्टमित्रादिभेदभिन्नानि सुखदुःखहेतूनि (आत्मैवाभूत्) आत्मैव भवन्ति बाह्येन्द्रियैर्भूतानि पश्यन्नपि न पश्यति मनस आत्मनि लग्नत्वात्। मनःसंयोगानपेक्षस्येन्द्रियार्थसन्निकर्षस्यापि ज्ञानकारणत्वाभावात्। यथा कस्यचिद्विषयस्य प्राप्त्यर्थमुत्सुकः पुरुषस्तद्विषयमेव सर्वत्र पश्यति सर्वाणि वस्तून्यभीष्टविषयरूपाण्येव पश्यति। तथैवात्मज्ञानोत्सुक आत्मरूपमेव सर्वमनुपश्यति नान्यत्पश्यति प्रयोजनाभावात्। उक्तं च व्यासेन- "शय्यासनस्थोऽथ पथि व्रजन्वा स्वस्थः परिक्षीणवितर्कजालः। संसारबीजक्षयमीक्षमाणः स्यान्नित्यमुक्तोऽमृतभोगभागी" एवमेकत्वमनुपश्यतो योगिनः (तत्र) समाधिकाले (को मोहः कः शोकः ?) न कोपीत्यर्थः। शोकमोहौ त्वभीष्टविषयभोगायोत्कण्ठापूर्वकं धावतस्तदप्राप्तौ प्राप्तावपि क्षीणाभिलाषस्य जायेते न तु तत्त्यक्तवत इति शम् ॥ ७ ॥**

ज्या वेळेला ज्ञानी पुरुष ऐहिक सुखभोगांच्यासंबंधानें पूर्ण विरक्त होतो, तेव्हां त्याच्या वैराग्यपूर्ण अशा निर्विकल्प अथवा सविकल्प समाधीमध्यें ( सारांश अखंड ब्रह्मध्यान करणाऱ्या पुरुषाच्या आत्मचिंतनकाळीं-नेहमीं- ) सुखदुःखांस कारण होणारे इष्टमित्रादि निरनिराळे जीव आत्मवत् होतात. त्याला सर्व ठिकाणीं आपलेपणा दिसूं लागतो. बाहेरून जरी निरनिराळे जीव व जड पदार्थ आहेत असें दिसतें, तथापि ज्याच्या अंतःकरणांत सर्वत्र आत्मभाव झाला

---

* या मंत्रापासून पुढें कांहीं मंत्रपर्यंत श्रीभीमशर्मा व्याख्याकारांनीं मंत्रांतील शब्दांस कंसाकृतीनें दर्शविलें आहे. यामागें त्यांनीं अर्थासच कंसाकृतिस्थान दिलें आहे.

आहे, मन सर्वथा परमात्ममय झालें आहे, तो पुरुष पाहत असूनही त्याला विषय विषयरूपानें दिसत नाहींत.

सामान्यतः असा नियम आहे कीं, इंद्रियें आणि त्यांचे विषय हीं एकत्र झालीं असतांही मन तेथें नसेल तर ज्ञान होत नाहीं. म्हणून बाहेरून निरनिराळे दिसणाऱ्या विषयांचें इंद्रियें ग्रहण करित असतांही ज्ञानी पुरुषाचें मन आत्मस्वरूपाचे ठिकाणीं लग्न झालें असल्यामुळें त्याला ह्या बाह्य-भेदांचें ज्ञान होत नाहीं. पुनः; असाही नियम आहे कीं, आपल्याला एखाद्या वस्तूची अत्यंत उत्कट इच्छा उत्पन्न होऊन ती प्राप्त करून घेण्याला आपण परम उत्सुक झालों म्हणजे तीच वस्तू आपल्यास सर्व ठिकाणीं दिसूं लागते आणि सर्व वस्तु इष्ट-वस्तुस्वरूपी दिसूं लागतात. ह्याच प्रक्रियेनें आत्मज्ञानाविषयीं उत्सुक झालेला ज्ञानी सर्व ठिकाणीं आत्मस्वरूप पाहूं लागतो. दुसऱ्या वस्तूचें प्रयोजन नसतें म्हणून त्याला दुसरी वस्तु दिसतच नाहीं. व्यासऋषींनीं म्हटलें आहेः—

'जो नित्यमुक्त आहे, व म्हणून अमृतरसाचें नित्यपान करितो, तो शय्येवर पहुडलेला असो, चालत असो, किंवा गांवाला जावो, तो ज्ञानी पुरुष स्वस्थच म्हणजे नित्यसमाधानांत असतो. कारण त्याचें सर्व तर्क-वितर्क-जाल नाहींसें झालेलें असतें आणि संसारवृक्षाचें बीज भाजून जाऊन क्षयाच्या पंथाला लागलेलें असतें.'

याप्रमाणें सर्वत्र ब्रह्मवस्तू पाहणाऱ्या योग्याचे शोक-मोहादि विकार नष्ट होतात. शोक-मोहादि उत्पन्न होतील; पण केव्हां ? जेव्हां इष्ट विषयाच्या भोगासाठीं आपली उत्कंठापूर्वक धांवाधांव चाललेली असते तेव्हां. आपण ते भोग मिळे-पर्यंत शोकपूर्वक धडपड करीत असतों व ते विषय मिळावयाचे असतां किंवा मिळाले असतां इच्छा-शक्ति क्षीण झाल्यामुळें मुग्ध होतों, वेडे होतों; पण ज्यानें भोगविषयच सोडले त्याला शोकाचें कारण काय ? किंवा मोह तरी कसा उत्पन्न होणार ? ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**(सः) यस्मिन् पूर्वोक्त आत्मनि ज्ञाते सति शोकमोहादयो विनिवर्तन्ते स (पर्यगात्) परितो गतवान् व्योमवद्व्यासः सर्वत्र, किम्भूत आत्मेति विशेषणानि-(शुक्रम्) शुक्रः । लिङ्ग-व्यत्ययः सर्वत्र । आशु करोत्युत्पत्त्यादिकमिति शुक्रः । अथवा शुक्रः शुक्लो दीप्तिमान् (अकायम्) स्थूलसूक्ष्मलिङ्गशरीररहितः । अत एव (अव्रणम्) क्षतादिरहितः। अकायत्वादेवाव्रण इति हेतु-गर्भाविशेषणम्। (अस्नाविरम्) नाड्यादिसम्बन्धवर्जितः। अका-**

यत्वादेवेति हेतुगर्भविशेषणम्। अत एवाकायत्वात् (शुद्धम्) निर्मलम्। शरीरी तु द्वादशभिः शरीरमलैर्युक्तो भवति। उक्तं च व्यासेन योगे—

"स्थानाद्बीजादुपष्टम्भान्निस्यन्दान्निधनादपि।
कायमाधेयशौचत्वात्पण्डिता ह्यशुचिं विदुः॥"

उक्तकारणादेव (अपापविद्धम्) पापफलैः सर्वदा वर्जितः। शरीरेणैव पापानुष्ठानसम्भवात्। (कविः) सर्वदृक् (मनीषी) मनसो ज्ञातुर्जीवात्मनोऽपीशिताऽध्यक्षः (परिभूः) सर्वेषामुपरि भवतीति (स्वयम्भूः) स्वयमेव सत्तात्मको न कस्यचिदाश्रयेणेति। एवम्भूतो नित्यमुक्त ईश्वरः। (समाभ्यः) संवत्सरैः परिमितायुष्काभ्यः स्वदृष्टौ तुल्याभ्यो वा (शाश्वतीभ्यः) जातिरूपेण कल्पकल्पान्तरेषु प्रवाहरूपेण वा निरन्तरं वर्तमानाभ्यः (याथातथ्यतः) यादृशं यस्य कर्म तादृशान् (अर्थान्) फलरूपान् भोग्यान् पदार्थान् (व्यदधात्) विदधाति कर्मानुरूपं फलं सर्वस्मै प्रयच्छतीति॥ ८॥

गुरु०—हा शोक-मोहादिशून्य झालेला व पूर्वोक्त आत्मज्ञान झालेला पुरुष सर्व-व्यापी झाल्यामुळें सर्व ठिकाणीं वास्तव्य करितो.

शिष्य—हें आत्मस्वरूप कसें आहे तें सांगतां काय?

गुरु०—ऐक. तें सर्व-समर्थ असल्यामुळें, सर्व कार्यें शीघ्रत्वानें करणारें आहे, तें स्वयंप्रकाश असून सर्व-प्रकाशी आहे. त्याला स्थूल, सूक्ष्म, किंवा लिंगदेह यांपैकीं कोणताही देह नाहीं. म्हणून त्याला कोठेंही व्रण असण्याचा संभवच नसतो. नाड्या, रक्त, स्नायू, इत्यादिकांशीं त्याचा संबंध नसतो. तो सर्वथा शुद्ध अथवा निर्मळ असतो. आत्मा अशरीरी आहे म्हणून त्याला व्रण-नाड्यादि नसतात; व तो शुद्ध असतो हेंही त्याच्या अशरीरत्वावरूनच सिद्ध होतें. योग शास्त्रामध्यें व्यासाचार्यांनीं सांगितलें आहे कीं,—

'शरीरी ज्ञानी लोकसुद्धां स्थानामुळें, गर्भांत वास्तव्य असल्यामुळें, बीजामुळें, रेतरुधिरापासून उत्पत्ति होत असल्यामुळें, उपष्टंभानें (अशनादिकांनीं शरीरवृद्धि होत असल्यामुळें) निस्यंदामुळें (मलाभिसरण होत असतें म्हणून), मरणामुळें आणि संस्काराच्या अभावामुळें अशुद्ध असतात.' सारांश, वर नमूद केलेल्या कारणांमुळें शरीरी जीव मलिन होत असतात. पण आत्मा अशरीरी आहे म्हणून तो निर्मळ आहे.

या कारणामुळें आत्मस्वरूपांत पापांचा, किंवा पापफलांचा संबंधच नसतो. पापाचा संभव शरीरादिद्वारा मात्र असतो. आत्मा अशरीरी आहे म्हणून पाप-

विद्ध नाहीं. हा आत्मा सर्व–द्रष्टा, ज्ञानी, मनाचा व जीवात्म्याचाही स्वामी, किंवा ज्ञानी जीवात्म्याचा स्वामी, सर्व–श्रेष्ठ, व स्वयंभू (स्वतःच सत्तास्वरूप असल्यामुळें, कोणाचाही आश्रय न घेणारा) हा आत्मा असतो. हा असा नित्यमुक्त ईश्वर आहे. ज्यांचें आयुष्य मर्यादित आहे, त्या जीवांना निष्पक्षपात बुद्धीनें (जसें ज्याचें कर्म असेल, त्याप्रमाणें त्यांना योग्य) फलभोग देत असतो. देवाला सर्वच सारखे आहेत ! हे लोक व्यक्तिशः परमित आयुष्याचे आहेत, तथापि जाति नित्य असते म्हणून, किंवा प्रत्येक जीवाला कल्पकल्पांतरी अनंत जन्माच्या प्रवाहांत पडावें लागतें म्हणून, जीवांना नित्य असें या श्रुतीमध्यें म्हटलें आहे. सारांश, निष्कलंक आत्मा निष्पक्षपात रीतीनें प्राण्यांस त्यांच्या त्यांच्या कर्माप्रमाणें सुखदुःखांचे भोग देऊन, मुक्ति मिळे तोंपर्यंत त्यांचा संसार चालवितो. "उच्च नीच कांहीं नेणें भगवंत" ही साधूक्ति पुष्कळांस विदित आहेच, या मंत्राच्या पूर्वार्धांत सर्व विशेषणें परमात्मपर आहेत; तेव्हां व्याकरणदृष्ट्या लिंगदोष आहेत, ते नाहींत असें समजावयाचें ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**(ये) वेदतत्त्वार्थमजानन्तः (अविद्याम्) केवलं कर्मकाण्डमात्रम्—अनेन कर्मणा—इदं फलमाप्स्याम इति बुद्ध्या कर्मतत्फलेष्वेवाहर्निशं भ्रमन्तः (उपासते) तत्तत्कर्मवन्तस्सन्तो निरन्तरं सेवन्ते ते (अन्धन्तमः, प्रविशन्ति) आत्मज्ञानप्रकाशवर्जितं ब्रह्मादिस्थावरान्तं जन्ममरणप्रवाहमेव प्रविशन्ति न तु ततो मुच्यन्त इति (य उ) ये च (विद्यायां, रताः) ब्रह्मचर्याद्याश्रमत्रयेणानुष्ठेयं वैदिकं कर्मापि त्यक्त्वा ज्ञानकाण्ड एव रमन्ते (ते, ततः) अविद्योपासनादपि (भूय इव) बहुतरमेव (तमः) अन्धकारं (प्रविशन्ति) अयमाशयः—यथैकचक्रं यानं यातुमनर्हं भवति । एवम्पूर्वाश्रमत्रयानुष्ठेयवैदिककर्मान्तरेण ज्ञानाय धावन्नपि न प्राप्नोति । चतुर्थाश्रमे त्यागः प्रधानं येन चाश्रमत्रये कर्मैव नानुष्ठितं स कस्य त्यागं करिष्यति ? । अर्थात् ये लौकिकाः परमार्थविमुखा जना ज्ञानकाण्डं सर्वतो विहाय केवले कर्मणि रमन्ते तेऽन्धकारं प्राप्नुवन्ति । ये च केवले ज्ञाने रताः स्वमूलं गृहाश्रमादिकं च विनिन्दन्ति ते कर्मिभ्योऽप्यधिकतरमन्धकारमाप्नुवन्ति ॥ ९ ॥**

वेदाचा तत्त्वार्थ न जाणणारे आणि केवल कर्मकांडामध्यें मात्र गुंतून राहणारे, जे कर्मठ लोक आहेत; ते अंधन्तम नामक लोकीं जाऊन पडतात. 'मीं हें

कर्म केलें आहे, याचें फल मला अमुक मिळेल' या बुद्धीनें कर्म करून कर्मफलामध्यें निरंतर भ्रमण करणारे जे लोक आहेत, ते केवल कर्म करणारे म्हणजे कर्मठ लोक जन्ममरणाच्या प्रवाहामध्यें (अंधन्तमामध्यें) सांपडतात. ह्या त्यांच्या जन्ममरणांत ब्रह्मज्ञानाचा प्रकाश मुळींच नसतो आणि ब्रह्मदेवापासून तों अत्यंत जडवस्तू पावेतों या लोकांस जन्म घ्यावा लागून ते त्या जन्ममृत्यूच्या ब्रह्मज्ञानशून्य प्रवाहामध्यें भ्रमण करीत राहतात. या ज्ञानशून्य कर्मठ लोकांना तेथून सुटण्याची मुळींच शक्यता नाहीं आणि जे लोक, ब्रह्मचर्यादि तीन आश्रमांमध्यें अवश्य करावें लागणाऱ्या वैदिक कर्मांचा त्याग करून केवल ज्ञानकांडामध्येंच रममाण होतात, त्या लोकांस कर्मठ लोकांच्या वास्तव्यस्थानाहूनही अनंतपट अंधकाराच्या (अज्ञानाच्या) अथांग महासागरामध्यें डुबावें लागतें. सारांश, दुचाकी गाडीला एकच चाक असेल, तर मुळीं प्रवास करितां येत नाहीं, त्याप्रमाणें पूर्वीच्या तीन आश्रमांस अवश्य असणाऱ्या वैदिक कर्मांचें अनुष्ठान न करितां, केवळ ज्ञानाच्या पाठीमागेंच मनुष्य लागेल तर त्याला आत्मज्ञान मिळणार नाहीं; कारण वैदिक कर्म आणि ज्ञान या दोन साधनांच्या अनुष्ठानानें मात्र आत्मज्ञान होतें. असो; कर्मत्याग करणें हें 'संन्याशी' आश्रमामध्यें, मात्र योग्य आहे. पण ज्यानें पहिल्या तीन आश्रमांमध्यें, विहित कर्मच केलें नाहीं तर तो त्याग (संन्यास) तरी कशाचा करणार? तात्पर्य हें आहे कीं परमार्थाला सर्वथा विमुख असणारे कर्मठ लोक ब्रह्मज्ञानाचा सर्वथा त्याग करून जर केवल कर्मामध्यें मात्र रममाण झाले तर त्यांस जन्ममरणाच्या प्रकाशशून्य चक्रामध्यें पडावें लागतें; पण जे लोक पहिल्या (मूलभूत) तिन्ही आश्रमांची व तेथील कर्मांची निंदा करून त्यांचें विधिपूर्वक अनुष्ठान करित नाहींत व केवळ आत्मविद्येची मात्र उपासना करितात त्यांस ज्ञानफल तर मिळत नाहींच; पण ते कर्मठ लोकांस भवचक्रांत फिरविणाऱ्या ज्ञानशून्य जन्ममरणचक्रापेक्षांही जास्त ज्ञानशून्य स्थितीमध्यें (म्हणजे अव्यक्तामध्यें) जाऊन पडतात. ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा.

**विद्यया (ज्ञानकाण्डानुष्ठानेन) अन्यदेव (ज्ञानसाध्यं शान्त्यादिफलम्) आहुः (वदन्ति) अविद्यया (लौकिककाम्यकर्मानुष्ठानेन) अन्यदेव (स्त्रीपुत्रैश्वर्यादिरूपं फलम्) आहुः। इति (एवम्प्रकारेण) वयं धीराणाम् (धीमतां गुरुजनानाम्) वचः शुश्रुम (श्रृणुमः) ये (आचार्याः) नः (अस्मभ्यम्) तत् (वचः) विचचक्षिरे (व्याचक्षते) ज्ञानिभिराचार्यैः शिष्येभ्यो विद्याऽविद्ययोः फले विभज्य श्रावणीये शिष्यैश्च गुरुसेवाशुश्रूषाभ्यां गुरुभ्यो विद्याऽविद्ययोः फले ज्ञातव्ये इत्याशयः॥ १०॥**

केवल ज्ञानकांडाच्या अनुष्ठानानें ज्ञानसाध्य जें शांत्यादि फल तें मात्र मिळतें, मोक्ष मिळत नाहीं व केवल लौकिक व वैदिक काम्य कर्मांच्या अनुष्ठानानें पुत्र-कलत्रादि ऐश्वर्यरूप फल मात्र मिळतें पण मोक्ष मिळत नाहीं, असें आम्हांस आमच्या विद्वान् व बुद्धिमान् गुरूजींनीं सांगितलें आहे. सारांश, नुसत्या ज्ञानानें मोक्ष मिळत नाहीं, दुसरेंच अल्पमोली फल मिळतें. नुसत्या काम्य कर्मांनींही मोक्ष न मिळतां भलतेंच फल मिळतें, असें आम्हांस सद्गुरूंनीं सांगितलें आहे. असो; ज्ञानी सद्गुरूंनीं विद्या आणि अविद्या यांचीं फलें निरनिराळीं स्पष्ट करून शिष्यांस प्रेमानें सांगावीं आणि शिष्यांनीं एकनिष्ठतेनें गुरुसेवा करून त्यांपासून विद्या व अविद्या ( ज्ञान आणि कर्म ) यांचीं निरनिराळी फलें समजून घ्यावीं, असाही एक या मंत्राचा तात्पर्यार्थ आहे. ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा.

**विद्याऽविद्ययोः फलभेदस्तयोः पृथक्पृथगुपासनयाऽकल्याणप्राप्तिश्चोक्ता । इदानीं तयोः सहोपासनेन शुभफलप्राप्तिमाह—**

विद्या आणि अविद्या यांचीं स्वरूपें आणि त्यांच्या अनुष्ठानांपासून प्राप्त होणारीं अनिष्ट व अकल्याणकारी ( नाशकारक ) फलेंही सांगितलीं. आतां या मंत्रांत उभयतांचेंही एकदम अनुष्ठान केलें तर कोणत्या प्रकारचें कल्याणकारी फल प्राप्त होतें तें सांगतात.

**यः ( वेदतत्त्वार्थवित् ) पूर्वोक्तां विद्यां चाविद्यां च तदुभयं सह ( एकेनैव पुरुषेणानुष्ठेयं ) वेद ( जानाति ) सः अविद्यया ( कर्मणा शुद्धान्तःकरणः सन् ) मृत्युम् ( पुनःपुनर्जन्ममरणप्रवाहम् ) तीर्त्वा ( पारमुत्तीर्य ) विद्यया ( ज्ञानकाण्डानुष्ठानेन ) अमृतम् ( मरणधर्मरहितं मोक्षम् ) अश्नुते ( प्राप्नोति ) उक्तं च भगवद्गीतासु—**

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृदिति ॥**

**अर्थात् ज्ञाने कर्म, कर्मणि च ज्ञानं पश्यत एव परमार्थः सिध्यति नत्वेकारूढ एकचक्रेण रथेनेव कल्याणमवाप्नोतीत्यभिप्रायः ॥ ११ ॥**

जो वेदतत्त्वाचा अर्थ जाणतो, त्यानें आतांच सांगितलेलें कर्म व ज्ञान यांचें रहस्य समजून घेऊन त्या विद्या व अविद्यांचें एककालींच अनुष्ठान करितो, तो कर्माच्या साहाय्यानें अंतःकरण शुद्ध करून घेतो व जन्ममरणरूपी मृत्युसागरांतून पार तरून जातो आणि आत्मविद्येच्या अनुष्ठानानें मृत्युधर्म जेथें

नाहीं अशा अतमृरूपी मोक्षनगरीमध्यें जाऊन तेथें चिरकाल राहतो. गीतेमध्यें सांगितलेंच आहे—

'जो कर्मांमध्यें अकर्म पाहतो आणि अकर्मांमध्यें कर्म पाहतो, तो सर्व मनुष्यांमध्यें जास्त बुद्धिमान् आहे, असें ठरतें. तोच योगी होय. तोच सर्व–कर्म करणारा अथवा कृतकृत्य असतो.' सारांश, ज्ञानामध्यें कर्म आणि कर्मांमध्यें ज्ञान आहे अशी ज्ञानदृष्टि ठेवणारा पुरुष मात्र परमार्थ साध्य करून घेतो; पण केवल कर्मांची किंवा केवल ज्ञानाची मात्र आराधना करणारे लोक जणूं कांहीं एकचाकी मोडलेल्या रथावर बसून आपलें सर्वथा अकल्याण मात्र करून घेतात. हा तात्पर्यार्थ आहे. ॥ ११ ॥

---

## मंत्र बारावा.

(ये) अविद्वांसः (असम्भूतिम्) सम्भूयते या सा सम्भूतिः कार्यरूपं जगत् सा यत्र न विद्यते साऽसम्भूतिः कारणं प्रकृतिर्जडात्मिका ताम्–ईश्वरभावेन (उपासते) भजन्ते ते (अन्धन्तमः प्रविशन्ति) अज्ञानात्मकमन्धकारम् प्राप्नुवन्ति (ततः) तस्मात्प्रकृत्युपासनस्य प्रकृतिलीनत्वादिफलम् (भूय इव) बहुतरमेव (तमः) अन्धकारम् (ते) प्राप्नुवन्ति (य उ) ये च (सम्भूत्याम्) कार्ये जडे जगति (रताः) उपासनातत्पराः । अर्थात् ये प्रकृत्यादिकारणात्मकं जगत् ईश्वरभावेनोपासते। ये च पृथिव्यादिपञ्चभूतात्मकं तद्विकारावयवभूतं वा पाषाणादिजडमुपासते ते सर्वेऽपि–अज्ञानान्धकारमाप्नुवन्ति नैव कदाचित्कल्याणं लभन्ते किन्तु एकस्यैवाद्वितीयस्याव्याहतशक्तेर्ब्रह्मण उपासकाः सुखं लभन्ते ॥ १२ ॥

जे अज्ञानी लोक–कार्यरूपी जगत् जेथें असत नाहीं अशा–जडात्मक मूल–प्रकृतीचें ईश्वरभावानें आराधन करितात ते अज्ञानात्मक अंधकारामध्यें प्रवेश करितात. म्हणजे श्रुतीला हें सांगावयाचें आहे कीं, केवल प्रकृतीचें मात्र जे लोक आराधन करितात, ते अज्ञानी प्रकृतीमध्येंच लीन होऊन जातात. पण जे लोक कार्यरूप जगतामध्यें मात्र रममाण होतात, विषयांचीच जे आराधना करितात, ते अधिक अज्ञानाच्या गाढ अंधकारामध्यें जाऊन पडतात. तात्पर्य, जे लोक मूलप्रकृतीचीं कार्यें असणाऱ्या जड विषयांची मात्र ईश्वरभावानें उपासना करितात व पृथिव्यादि पंचमहाभूतांची अथवा त्यांचे जड पाषाणादि विकारांची उपासना करितात, (मूर्तिपूजा करितात) ते सर्व महाअज्ञानरूपी गाढ अंधकारामध्यें जाऊन पडतात. त्यांना कल्याणाची प्राप्ति केव्हांही होत नाहीं.

**शिष्य**—मग कल्याण तरी होतें कोणाचें ?

गुरु—एक अद्वितीय आणि अनंतशक्ति ब्रह्माची मात्र जे लोक ज्ञानपूर्वक उपासना करितात व ईश्वरार्पण बुद्धीनें स्वकर्तव्य करितात ते लोक आपलें परम कल्याण करून घेतात. ॥ १२ ॥

---

## मंत्र तेरावा.

(सम्भवात्) कार्यजगत उपासनात् (अन्यदेव) आत्मज्ञानोद्भवं नित्यसुखरहितं मन्दबुद्ध्याद्यात्मकमसारसंसारसागरे निमज्जनरूपं फलम् (आहुः) कथयन्ति (असम्भवात्) जडकारणोपासनात् (अन्यत्) प्रकृतिलीनत्वादिकं फलम् (आहुः) कथयन्ति। (इति) एवंप्रकारकम् (धीराणाम्) विदुषां वचो वयम् (शुश्रुम) शृणुमः (ये) विद्वांसः (नः) अस्मभ्यम् (तत्) उपदेशरूपं वचः (विचचक्षिरे) व्याचक्षते ॥ १३ ॥

कार्य जगताची मात्र उपासना करणाऱ्या मंदबुद्धी लोकांस मोक्षफल न मिळतां असार असा जो संसार–सागर (दुःखमय भवसागर) आहे त्यामध्यें बुडून जाणें हेंच जड फल मिळतें, असें सांगितलें. आतां येथें आत्मज्ञानापासून उत्पन्न होणाऱ्या नित्य सुखाचा लवलेशही नसतो, असें म्हणतात. आणि जे लोक अचेतन असणाऱ्या मूल प्रकृतीचें मात्र उपासन करितात, त्यांनाही मोक्षाचें निरतिशय ज्ञानपूर्ण सुख न मिळतां जड प्रकृतीमध्यें लीन होऊन जाणें हेंच फल मिळतें असेंही म्हणतात. या दोन्ही स्पष्ट गोष्टी आम्हीं आमच्या विद्वान् व यथार्थवादी गुरूंकडून उपदेशरूपानें ऐकल्या आहेत. ॥ १३ ॥

---

## मंत्र चवदावा.

कार्यकारणयोः फलभेदस्तदुपासनेनाकल्याणप्राप्तिश्चोक्ता। इदानीं कल्याणप्राप्त्युपाय उच्यते। (यः) पुरुषः (सम्भूतिम्) कार्यं शरीरादिजगत् (च) तन्नियमान् (विनाशम्) अदर्शनात्मकं शरीरादेर्जगत उत्पत्तिकारणम् (च) वासनादिरूपेण स्थितिनियमान् (तत्, उभयम्) एतद् द्वयम् (सह) (वेद) जानाति सः (विनाशेन) अदृष्टकारणस्य तत्त्वविज्ञानेन (मृत्युम्) उपलक्षणमिदं जन्मनोपि तेनागामिनी ये जन्ममरणे तज्जं मृत्युसदृशं दुःखसागरं (तीर्त्वा) उत्तीर्य (सम्भूत्या) उत्पन्नेन शरीरादिना सहैव (अमृतम्) मरणादिशोकमोहरहितं शान्तिरूपं सुखम् (अश्नुते) प्राप्नोति। जीवन्मुक्तो भवतीत्याशयः। उक्तं च व्यासेन योगशास्त्र-

भाष्ये—'प्रज्ञाप्रासादमारुह्य अशोच्यः शोचतो जनान् । भूमिष्ठानिव शैलस्थः सर्वान् प्राज्ञोऽनुपश्यति' तथा च भगवद्गीतायामपि—"यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः । यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणाऽपि विचाल्यते ॥ १४ ॥"

कार्य जगत् आणि कारण प्रकृति यांची वेगळी वेगळी उपासना केली असतां ( कार्याची मात्र अथवा कारणाची मात्र उपासना केली असतां ) अनिष्ट अशीं भिन्न फलें उत्पन्न होऊन अकल्याण होतें हें सांगितलें. आतां या मंत्रांत कल्याणाचें साधन कोणतें आहे तें सांगतातः—

शरीरादि जगत् व त्यांचे नियम म्हणजे उत्पत्तिस्थित्यादि विकार पावणाऱ्या जड जगताचें व त्याच्या नियमांचें मात्र ज्ञान व शरीरादि जगताची उत्पत्ति जिच्यापासून होते त्या अदृश्य मूलप्रकृतीचें ( जगताच्या मूळ कारणाचें ) व वासनादिकांचे ज्ञान हीं दोन्हींही ज्याला एकदम समजतात, तो या अदृष्ट कारणाचें तत्त्वज्ञान साक्षात् करून घेऊन मृत्युरूपी जन्ममरणांचा व त्यापासून उत्पन्न होणाऱ्या व मरणतुल्य अप्रिय असणाऱ्या भविष्यत्कालीन दुःखसागराचा अंत करून आपल्या शरीरासह ( शरीरी असतांही, शरीरांमध्यें राहूनच ) मरणादिजन्य जे शोकमोह तद्युक्त जी शांति, तिचा सुखरूप अनुभव घेतो. या ज्ञान्याला शोकमोहशून्य शांति मिळते. सारांश, तो जीवन्मुक्त होतो. योगशास्त्रावर भाष्य लिहितानां व्यास मुनींनीं म्हटलें आहेः—

"शोकरहित झालेला ज्ञानी पुरुष श्रेष्ठ बुद्धीच्या उच्च प्रासादशिखरावर उभा राहून, आरूढ होऊन, संसारी म्हणजे शोकमोहादिकांनीं होरपळून गेलेल्या लोकांची तडफड पाहात राहतो. पर्वतशिखरावर उभें राहणाऱ्या पुरुषास भूमीवर असलेले लोक लहानच दिसतात. त्याचप्रमाणें स्थितप्रज्ञाला शोकाकुल जीव अनुकंपनीय मात्र वाटतात.

भगवद्गीतेमध्येंही म्हटलें आहेः—आत्मज्ञान झाल्यावर योगी पुरुषाला आत्मज्ञानापेक्षां दुसरी कोणतीही अधिक लाभ देणारी वस्तू आहे, असें वाटतच नाहीं. या समाधि स्थितीमध्यें हा योगी पुरुष असला म्हणजे मोठमोठालींही दुःखें त्याच्या समाधीचा भंग करण्यास असमर्थ असतात. ॥ १४ ॥

---

## मंत्र पंधरावा.

योगी प्रयाणकाल एवं प्रार्थयेत । मम ( वायुः ) प्राणादिवायुः ( अमृतम् ) मरणधर्मरहितम् । ( अनिलम् ) सूत्रात्मानं व्यापकं वायुम् । प्राप्नोत्विति वाक्यशेषः । यद्वा नास्तीला पृथिवी तद्विकारः शरीरादिर्वा यत्र तममृतं मोक्षं मे वायुर्देहान्तरगमनशीलो

जीवात्मा प्राप्नुयादित्यर्थः । ( अथ ) अनन्तरम् ( इदम् ) प्रत्यक्षम् ( शरीरम् ) ( भस्मान्तम् ) अन्ते भस्म यस्य तदेवंभूतं भूयादिति शेषः । योगिनं प्रति वेदोपदेशः—हे ( क्रतो ) सङ्कल्पात्मक योगिन् त्वम् ( ॐ ) ओमित्युच्चार्य तद्वाच्यं परमात्मानम् ( स्मर ) तस्य ध्यानं कुरु ( क्लिबे ) सामर्थ्याय । इष्टाधिगमाय समर्थो भवेयमिति ( स्मर ) ( कृतम् ) पूर्वाचरितं कर्मेदानीं सहायतार्थम् ( स्मर ) क्लिप्इति क्लृप् धातोः क्विबन्तं रूपं पृषोदरादित्वादिष्टसिद्धिः । "ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन् मामनुस्मरन् । यः प्रयाति त्यजन् देहं स याति परमां गतिमिति भगवद्गीतासु । अतो मुमुक्षुणा योगिनाऽवश्यमन्तकाले परमात्मनो ध्यानं कर्तव्यं तदाकारवृत्त्या शरीरं त्यक्तव्यमिति भावः ॥ १५ ॥

प्रत्येक योग्यानें मरणकालाचे वेळीं ही खालीं सांगितल्याप्रमाणें प्रार्थना करावीः—

मृत्युशून्य जो सूत्रात्मक आणि सर्वव्यापक वायु त्याची प्राप्ति माझ्या प्राणादिवायूंस होवो किंवा पृथिव्यादि किंवा शरीरादि विकार जेथें नाहींत तो अमृतरूपी मोक्ष माझ्या जीवात्म्याला ( हा देह सोडून दुसऱ्या देहांत प्रवेश करण्याचा ज्याचा धर्म आहे अशा माझ्या वायुरूपी जीवात्म्याला )—अमृतरूपी मोक्ष मिळो; आणि मग हें माझें शरीर भस्मीभूत होऊन जावो. जीवात्म्याला अमृतरूपी मोक्ष मिळाल्यावर माझ्या शरीराची कांहीं जरी स्थिति झाली तरी त्याची मला काळजी नाहीं. माझ्या जीवात्म्याला इष्टतम वस्तु मिळाल्यावर माझ्या देहाचें काय वाटेल तें झालें तरी मला त्याची क्षति नाहीं.

आतां यापुढें योगी पुरुषाला उपदेश करितातः—

हे संकल्पात्मक योगिन् ! तूं ॐकाराचा उच्चार करून तद्वाच्य जो परमात्मा ॐकारानें, ॐकार जपानें, प्रकट होणारा जो परमात्मा त्याचें ध्यान कर, आणि अशी प्रार्थना कर कीं "मी असमर्थ आहें म्हणून इष्ट देशाप्रत जाण्याला मला सामर्थ्य दे.*" तसेंच पूर्वी जीं जीं काय कर्में केलीं असशील त्यांचीही साहाय्यासाठीं स्मरणपूर्वक प्रार्थना कर.

भगवद्गीतेमध्यें म्हटलें आहे ॐ या एकाक्षरी ब्रह्मवाचक शब्दाचा घोष करून माझें अखंड स्मरण करीत असतां जो पुरुष देहाचा त्याग करितो, तो उत्तम गतीप्रत प्राप्त होतो. म्हणून मुमुक्षु योग्यानें आपल्या अंतकालीं परमात्म्याचें ध्यान करावें आणि आपल्या मनोवृत्तीला ब्रह्माकार करून देह सोडावा, हा भावार्थ आहे. ॥ १५ ॥

---

* सर्वत्र ह्या मंत्राचा दुसरा चरण "ॐ क्रतो स्मर कृतं स्मर क्रतो स्मर कृतं स्मर" असा प्रसिद्ध आहे. या भाष्यकारांचा पाठ "ॐ क्रतो स्मर क्लिबे स्मर कृतं स्मर" असा आहे.

## मंत्र सोळावा.

हे (अग्ने) प्रकाशरूप (देव) कान्तियुक्तेश्वर त्वम् (विश्वानि) सर्वाणि (वयुनानि) कर्माणि (विद्वान्) जानन् (अस्मान्) (राये) ऐश्वर्याय तत्प्राप्तये (सुपथा) शोभनेन सरलेन मार्गेण (नय) चालय। भवदन्तर्यामिप्रेरणया सुमार्गेण गच्छेमेति भावः। (जुहुराणम्) कुटिलम् (एनः) पापम् (अस्मत्) अस्मत्तः (युयोधि) पृथक् कुरु (ते) तुभ्यम् (भूयिष्ठाम्) बहुतराम् (नमउक्तिम्) नमोवचनानि वयम् (विधेम) कुर्याम। नमस्कारैस्त्वां परिचरेम त्वमस्मान् सुमार्गेण गमयेति प्रार्थयामहे ॥ १६ ॥

हे प्रकाशरूपी अग्निदेवा! सुंदर परमेश्वरा! मीं जीं काय कर्में केलीं आहेत, तीं तुला विदितच आहेत. देवा, ऐश्वर्याची प्राप्ति होण्यासाठीं आम्हांस सुरेख सरळ आणि सुखकारक मार्गानें तूं घेऊन जा. तूं आमचा चित्तप्रेरक असलास म्हणजे आम्ही ह्या चांगल्या मार्गानें जाऊं शकूं, हा भावार्थ आहे. देवा! मीं व माझ्या आप्तइष्टांनीं जीं कुटिल पापें केलीं असतील, तीं आमच्यापासून निराळीं कर. तात्पर्य, तीं नाहींशीं करून टाक. देवा, तुला आम्ही सर्वजण पुष्कळ वेळ नमस्कार करून तुझी सेवा करितों. आणि प्रार्थना करितों कीं, आम्हांस चांगल्या मार्गानें घेऊन जा. ॥ १६ ॥

---

## मंत्र सत्तरावा.

(हिरण्मयेन) स्वर्णमयेन। उपलक्षणमेतद्रजतादीनाम्। (पात्रेण) दारिद्र्यजन्यदुःखाद्रक्षकेण (सत्यस्य) यथार्थस्वरूपस्य मोक्षस्य (मुखम्) द्वारम् (अपिहितम्) अन्तर्हितम्। अत्र जगति सुवर्णाद्यैश्वर्यं प्रायशो विषयभोगसाधनं विषयाश्च मुक्तेर्बाधका इत्यतः परम्परया हिरण्याद्यैश्वर्यं मोक्षद्वारस्य कपाटवदस्तीत्याशयः। तद्वैराग्येण मोक्षः प्राप्तुं शक्य इति। (यः) (असौ) व्यापकत्वादिन्द्रियागोचर (आदित्ये) प्रकाशमये प्रलयावसरे सर्वस्यादातरि स्वस्वरूपे स्थिरः (पुरुषः) पूर्णः परमात्मास्ति (सः असौ) (अहम्) तदाकारवृत्तित्वात्तदभिन्नवृत्तिरहमपि भवेयमिति वाक्यशेषः। ओमिति नामवाच्यम् (खम्) निराकारम् (ब्रह्म) अस्ति तदेव ध्यायेदिति ॥ १७ ॥

दारिद्र्यापासून उत्पन्न होणाऱ्या दुःखांचें विनाशन करण्याचा आव घालणाऱ्या विषयांनीं (सोनें रुपें इत्यादिकांनीं) आमचें अंतिम कल्याण करणाऱ्या यथार्थ-

स्वरूपी मोक्षाचें द्वारच झांकून टाकलें आहे. म्हणजे या जगामध्यें सुवर्णादि ऐश्वर्य देणारीं आणि प्राय: विषयभोगांचीं साधनें असणारीं जीं धनादिक द्रव्यें आहेत व विषय आहेत, तें हें द्रव्यादि ऐश्वर्य मुक्तिमार्गातील वाटमारें झालें आहे. अर्थातच परंपरेनें सुवर्णादि ऐश्वर्य मोक्षद्वाराला झांकणारें कपाटरूपच होतें. म्हणून या ऐहिक ऐश्वर्याविषयीं जेव्हां विरक्ति उत्पन्न करून घ्यावी तेव्हां मोक्षाचें कपाट म्हणजे द्वार उघडतें व मोक्षप्राप्ति होऊं शकते.

परमात्मा सर्व–व्यापक असल्यामुळें इंद्रियादिकांस अगोचर असणारा तो आहे; तो प्रकाशरूपी आदित्यामध्यें राहून प्रलयकालाच्या वेळीं सर्वांचा स्वरूपामध्यें अंतर्भाव करितो व त्यांस लीन करितो म्हणून तो सदैव स्वस्वरूपानें पूर्णच असतो त्याचें स्वरूप मला प्राप्त व्हावें. कारण माझी चित्तवृत्ति एकाग्रतेनें बाह्याकार झाली असल्यामुळें मीं तदभिन्नच ( त्याच्याशीं भेद नसणारा ) असा झालों आहें 'ॐ' हें परमात्म्याचें नांव आहे. तो स्वरूपतः निराकार आहे, म्हणून त्याला 'ख' म्हणतात. या ॐकारवाच्य निराकार परमात्म्याचें, नित्य–ध्यान करावें. आदित्य शब्दाचा अर्थ प्रकाशमय गोल तर आहेच, पण दुसराही अर्थ असा आहे कीं प्रयलकालाचे वेळीं तो सर्वांचीं आयुष्यें घेऊन जातो. सर्वांच्या आयुष्याचें तो आकर्षण करितो. अर्थातच आदित्याप्रमाणेंच ब्रह्माचे धर्म आहेत म्हणून ब्रह्मालाही आदित्य असा शब्द उपयोजिला आहे. ॥ १७ ॥

---

अयं मन्त्रः शाङ्करभाष्ये सङ्ख्यया पञ्चदशोऽस्ति । अन्येपि मन्त्रास्तत्र विपर्यस्ता दृश्यन्ते । अस्य मन्त्रस्योत्तरार्द्धं च शाङ्करभाष्य इत्थमस्ति ( तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ) अस्यायमर्थः–हे पूषन् सर्वेभ्यो वृद्धतर तन्मुखं द्वारं त्वम् । भवदुपासनादिः सत्यो धर्मो यस्य तस्मै सत्यधर्माय मह्यं दृष्टये दर्शनाय ज्ञानाय अपावृणु उद्घाटय । योऽसावादित्ये० इत्याद्यस्योत्तरार्द्धं चान्यमन्त्रस्योत्तरार्धमस्ति तस्य पूर्वार्द्धं चेत्थमस्ति ( पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजापत्य व्यूह रश्मीन् समूह । तेजो यत्ते कल्याणतमं रूपं तत्ते पश्यामि ) हे ( पूषन् ) सर्वपोषक ( एकर्षे ) एकश्चासावृषिश्च मुख्यर्षे ऋषीणामृषे ( यम ) न्यायकर्तः ( सूर्य ) प्रेरकान्तर्यामिन् ( प्राजापत्य ) प्रजापतेः प्रजापालकस्यायं राजा राज्ञां राजन् ( रश्मीन् ) तापकानि स्वतेजांसि ( व्यूह ) असमन्तः पृथक् कुरु ( तेजः ) प्रकाशकं दर्शकं ज्ञानात्मकं ज्योतिः ( समूह ) सम्यक् प्रापय । यत् ते तव कल्याणतमं रूपं तत् ते

पश्यामि पश्येयम् । लेट्प्रयोगः । एवमुत्तरार्द्धपूर्वार्धभेदेनैको मन्त्रः शाङ्करभाष्येऽधिकोऽस्ति । यजुर्वेदस्य वाजसनेय्याः संहितायाश्चत्वारिंशत्तमोऽध्यायः सप्तदशमन्त्रात्मकः सर्वेषु वेदपुस्तकेषूपलभ्यते। एतयैव सङ्ख्यया सर्वमन्त्रसङ्ख्या ( १९७५ या चरणव्यूहे श्रीमत्स्वामिदयानन्दसरस्वतीभिश्च प्रतिपादिता ) पूर्णा भवति । एकमन्त्राधिक्ये नियता सङ्ख्या भिद्येत। अतो ज्ञायतेऽस्यां वाजसनेयोपनिषदि सप्तदशैव वेदमन्त्राः सन्तीति । अष्टादशसंख्या तु कथं कदा च जाता इति निर्णेतुमशक्यम् । श्रीमच्छङ्करस्वामिसमयात्पूर्वमेव संख्याधिक्यं कथंचिज्जातमिति तु तेषां भाष्यकरणादेव निश्चीयते ॥

॥ इति श्रीभीमसेनशर्मकृतं वाजसनेयोपनिषद्भाष्यं संपूर्णम् ॥

हा मंत्र शंकराचार्यांच्या भाष्यामध्यें १५ वा लेखिला आहे. दुसऱ्याही अनेक मंत्रांची त्या भाष्यांत उलटा पालट झालेली आहे. तसेंच मंत्राचा या उत्तरार्ध—

" तत्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये "

असा दिला आहे.

याचा अर्थ असा दिला आहे कीं, हे पूषा ! तूं सर्वांहून वडील आहेस. वयोवृद्ध आहेस, ब्रह्माचें द्वारही तूंच आहेस. तुझी उपासना व तुझीं पूजन-वंदनादि कर्मे करणें हाच खरा धर्म आहे. या स्वधर्माचें ज्ञान होण्यासाठीं तूं हें द्वार उघड.

आम्ही दिलेल्या सत्राव्या मंत्राचा उत्तरार्ध दुसऱ्याच एका मंत्राचा उत्तरार्ध केला आहे त्याचा पूर्वार्ध असा दिला आहे.

" पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजापत्य व्यूह रश्मीन् समूह।
तेजो यत्ते कल्याणतमं रूपं तत्ते पश्यामि "

याचा अर्थ असा आहे कीं, सर्वांचें पोषण करणाऱ्या देवा ! तूं मुख्य ऋषि आहेस, ऋषींचा ऋषि आहेस. तूं न्यायकर्ता, सर्वांच्या अंतर्यामीं राहून प्रेरणा करणारा, प्रजापालकांचा राजा ( राजांचा राजा ) आहेस. तुझे जे संताप देणारे किरण आहेत ते आमच्यापासून पृथक् कर. ( ते आमच्याकडे येऊं देऊं नकोस. ) आणि तुझे जे ज्ञान देणारे किरण आहेत ते एकत्र करून मजजवळ चांगल्या रीतीनें आण म्हणजे तुझें जें मंगलस्वरूप आहे तें मला बघतां येईल. ' बघतों ' याचा अर्थ ' बघतां येईल ' असा करावयाचा आहे.

याप्रमाणें उत्तरार्ध आणि पूर्वार्ध भेदानें शांकरभाष्यामध्यें एक मंत्र अधिक होतो हें कळतें, यजुर्वेदाच्या वाजसनेयी संहितेमध्यें चौऱ्याशींव्या अध्यायांत हा सत्रावा मंत्र आहे, असें सर्व वेदपुस्तकांमध्यें दिसून येतें. सर्व मंत्रांची एकोणीसशें पंच्याहत्तर संख्या आहे, हें या अध्यायाचे सत्राच मंत्र आहेत असें धरून स्वामी दयानंदसरस्वतींनीं आपल्या "चरणव्यूहामध्यें" म्हटलें आहे. सर्व मंत्र १९७५ असें खरें असेल तर या अध्यायांत १७ मंत्र मूळचे असले पाहिजेत; या मंत्रसंख्येंत कमीजास्ती होणें शक्य नाहीं.

पण शंकराचार्यांनीं या उपनिषदामध्यें वर दिलेला अठरावा मंत्र आपण घेतला तर सर्व मंत्रसंख्या एकोणिसशें शहात्तर होते, पण या संहितेची संख्या एकोणिसशें पंचाहत्तरच आहे हें ठरलें आहे. म्हणून या ईशावास्योपनिषदामध्यें सत्राच मंत्र असले पाहिजेत असें सिद्ध होतें. ह्या उपनिषदाच्या मंत्रांची अठरा ही संख्या केव्हां झाली व कोणी केली हें सांगणें आज मित्तीला अशक्य आहे. श्रीमत् शंकरस्वामीच्या कालापूर्वींच ही मंत्र–संख्या कशी तरी अठरा झाली होती हें त्यांनीं या मंत्रावर भाष्य केलें आहे त्यावरून स्पष्टच होतें.

॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

# ईशोपनिषत्

## ( अन्वय अर्थ व सरळ विवरण )

### शान्तिपाठाचा मंत्र.

**ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥**

॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

**अन्वय व अर्थः—अदः** ( तें ब्रह्म ) **पूर्ण** ( पूर्ण आहे. ) **इदं** ( हें दृश्य, विश्व ) **पूर्ण** ( पूर्ण आहे. ) **पूर्णात् पूर्ण** ( पूर्णापासून पूर्ण ) **उदच्यते** ( उदय पावतें. ) **पूर्णस्य पूर्ण आदाय** ( पूर्णांतून पूर्ण काढून घेतलें तर ) **पूर्ण एव अवशिष्यते** ( पूर्ण हेंच अवशेष, शिल्लक, राहतें. )

सारांश, ब्रह्म हें पूर्ण आहे. दृश्य जगही पूर्ण आहे. पूर्ण ब्रह्मापासूनच पूर्ण जगताची उत्पत्ति होते आणि पूर्णांतून पूर्ण वजा केलें तर म्हणजे ब्रह्मांतून या दृश्य जगताची वजाबाकी केली तर अवशेष पूर्ण म्हणजे ब्रह्मच राहतें. ज्याला अनंत असें म्हणतात, ज्याला पाश्चात्य लोक Infinity ( अनंत ) म्हणतात, त्या अनंताचे एक दोन धर्म येथें सहज लीलेनें सांगितले आहेत. पूर्णापासून पूर्णाचाच उदय होणें, हा म्हणजे अनंतांत कितीही गोष्टी मिळविल्या तरी बेरीज अनंतच असते, हा एक अनंताचा धर्म झाला. तसेंच, पूर्णांतून पूर्ण काढून घेतलें तर बाकी पूर्णच उरतें. या उपदेशानें अनंतांतून अनंत काढून घेतलें; तरी शिलक अनंतच उरतें, हें सांगितलें. हे दोन धर्म या शांत्यात्मक मंत्रानें सांगितले आहेत. अनंताचे कांहीं धर्म अलीकडे समजूं लागले आहेत, हें जसें आधुनिक गणितशास्त्रवेत्त्यांस भूषणास्पद आहे, त्याचप्रमाणें उपनिषत्कालीं अनंताच्या दोन धर्मांचें तरी ज्ञान येथील लोकांस होतें, असें प्रस्तुतचा मंत्र स्पष्ट सांगतो. हें आमच्या पूर्व-पूर्वजांस किती भूषणास्पद आहे बरें.!

या मंत्रापासून असाही बोध उत्पन्न होतो कीं, या अनंतविश्वांचें निमित्त-कारण व उपादानकारण पूर्ण ब्रह्ममात्र आहे आणि ब्रह्मापासून विश्वाची उत्पत्ति होते. तसेंच, विश्व लयाला गेल्यानंतरही ब्रह्मच शिलक राहतें. म्हणजे सृष्टीच्या आधीं ब्रह्म पूर्णत्वानें असतें व सृष्टीचा लय झाल्यानंतरही ब्रह्माचें पूर्णत्व विकृत होत नाहीं. ब्रह्म स्वरूपानें पूर्ण आहे, अविकारी आहे, असें झालें. ब्रह्म हेंच सृष्टीची उत्पत्ति करितें व तिचा लयही तेंच करितें. हा भावार्थ आहे.

हा शांति सार्थ समजून घेऊन या उपनिषदाचे प्रारंभीं म्हणावी, असा संप्रदायसिद्ध नियम आहे. उपनिषद्गत ब्रह्मस्वरूप समजण्यास या शांतीचा पुष्कळच उपयोग होतो.

---

**ईशा वास्यमिदꣳ सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत् ॥**
**तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्य स्विद्धनम् ॥१॥**

**अन्वय व अर्थः—जगत्यां** (या विश्वामध्यें) **यत्किंच जगत्** (जें कांहीं अनित्य अशा स्थावर अथवा जंगम पदार्थांचें सर्वस्व आहे.)—तें—**इदं सर्वं** (हें सर्व) **ईशा वास्यम्** (ईश्वरानें वसण्यास, राहण्यास, योग्य आहे.) **तेन त्यक्तेन भुञ्जीथाः** (तें सर्व पदार्थजात टाकून दिलेल्या स्वरूपानें उपभोग कर.) **कस्य स्विद्धनम् मा गृधः** (कोणाच्याही धनाचा अभिलाष धरूं नकोस.)

सारांश हा आहे कीं या विश्वामध्यें जे अनंत, पण अनित्य स्थावर-जंगम पदार्थ आहेत ते सर्व ईश्वराचें वास्तव्य-स्थान आहेत. ईश्वराच्या आश्रयानें राहणारे हे पदार्थ आहेत. ईश्वराचें मात्र स्वामित्व त्यांच्यावर आहे. ईश्वरेच्छेनें मात्र पदार्थ प्रवृत्ति करितात. सारांश, ते ईश्वराच्या मात्र मालकीचे आहेत, असें ज्ञान प्रत्येक जीवानें करून घेतलें पाहिजे. 'कोणत्याही पदार्थांवर जीवाची सत्ता नाहीं परमेश्वराची मात्र आहे.' हें ज्ञान प्रत्येक जीवास अवश्य आहे. तेव्हां आपण जीवांनीं विषयांचा जो उपभोग घ्यावयाचा तो, ते विषय आपल्या मालकीचे आहेत अशा जाणीवेनें नव्हे तर ते ईश्वराचे पदार्थ आहेत, ईश्वराचें वास्तव्यस्थान आहेत, असा भाव धरून आपण उपभोग घ्यावयाचा आहे. विषयांपासून जें सुख होतें त्या सुखाकरितां विषयांचा उपभोग घ्यावयाचा नाहीं; तर त्या विषयांचे ठिकाणीं ईश्वर आहे अशी भावना धरून मात्र विषयांचें सेवन करावयाचें आहे. येथें सुख-दुःखाचा किंवा आपल्या मालकीचा प्रश्नच नाहीं. हें तत्त्व प्रत्येक मुमुक्षूनें ध्यानांत ठेविलें पाहिजे, अर्थातच 'दुसऱ्या कोणाच्याही धनाचा अपहार करूं नको' हें स्पष्टच झालें. पण हें सांगण्याचें कारण असें आहे कीं, सामान्य लोकांची अशी एक भलती समजूत होण्याचा संभव आहे ती हीः—ज्याप्रमाणें जगांतील पदार्थांवर माझी सत्ता नाहीं, त्याचप्रमाणें इतर कोणाचीही नाहीं. तेव्हां वाटेल त्या वस्तूचा अभिलाष धरण्याला किंवा उपभोग घेण्याला आपल्यास काय प्रत्यवाय आहे? ह्या शंकेचा निरास करण्यासाठीं "कोणाच्याही धनाचा अभिलाष करूं नको" हें वाक्य श्रुतीनें समजूनच घातलें आहे. म्हणजे उपभोगाच्या संबंधानें स्वार्थी भाग मुळींच ठेवावयाचा नाहीं. निरंतर परमेश्वराच्या सर्वव्यापित्वाची व सर्वस्वामित्वाची भावना दृढ करावयाची असा उप-

देश या मंत्रांत आहे, असें मला वाटतें. सर्वत्र ईश्वर आहे, ' मी,' ' माझेपणा,' ' भोग,' विषय, इत्यादि सर्व शुद्ध अज्ञान आहे, हाही उपदेश येथें मिळतो.॥ १॥

---

या उपदेशावरून सामान्यतः अशी भ्रांति उत्पन्न होईल कीं जर आपल्याला उपभोग घ्यावयाचाच नाहीं, तर मग कर्म करण्याचें कारण नाहीं. हा भाव नाहींसा करण्यासाठीं दुसऱ्या मंत्राचा अवतार आहे:—

**कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतँ समाः ।**
**एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः**—**इह** ( ह्या विश्वामध्यें ) **कर्माणि कुर्वन् एव** ( कर्म, श्रुतिविहित कर्म करीत असतांना मात्र ) **शतं समाः** ( शंभर वर्षें ) **जिजीविषेत्** ( जगण्याची इच्छा धरावी ) **एवं त्वयि नरे कर्म न लिप्यते** ( याप्रमाणें विहित कर्म केलेंस तर तुला म्हणजे जीवाला कर्माचा लेप होणार नाहीं. जीवाला कर्माचें बंधन प्राप्त होणार नाहीं.) **इतः अन्यथा न अस्ति** ( या शिवाय दुसरा कोणताही कर्मबंधन न होण्याचा मार्ग नाहीं.

सारांश, जोंपर्यंत आपला आयुर्दाय आहे, तोंपर्यंत आपण विहित कर्म अवश्य केलें पाहिजे. तो कर्म करण्याचा प्रकार वरच्या मंत्रांत सांगितलाच आहे. कर्माचे ठिकाणीं अभिमान नाहीं. आणि कर्मफलावर आसक्ति नाहीं अशाच स्वरूपाचें आपलें विहित कर्म असलें पाहिजे. हें असलें कर्म मात्र बद्धक होत नाहीं. इतर सर्व कर्म बद्धक होतात. म्हणजे जीवांस हीं कर्में परतंत्र करितात.

या मंत्रांत पहिल्या मंत्राचाच अनुवाद करून कर्म करणें हेंच जीवाचें कर्तव्य आहे, कर्म न करणें हें नाहीं, असें अधिक सांगितलें आहे. सामान्यतः सुखासाठीं आपण विषयाच्या प्राप्तीची इच्छा करितों. सुखच प्राप्त होणार नसेल, अथवा सुखासाठीं उपभोग घ्यावयाचे नसतील तर विषयांची इच्छा कोणीही करणार नाहीं. हा सर्व–सामान्य लोक–भ्रम आहे, असें श्रुतीस सांगावयाचें आहे. सुखाकरितां जगावयाचें नाहीं, सुखाप्रीत्यर्थ मात्र आपल्या आयुष्याचा विनियोग करावयाचा नाहीं, बाह्य सुख हें जीवाचें किंवा जीवाच्या जीवनाचें अंतिमसाध्य नव्हे, तर कर्म करणें, विहित कर्म करणें, कर्मफलाची इच्छा न धरितां व कर्मफलावरील अभिमान सर्वथा सोडून देऊन श्रुतीनें किंवा शास्त्रानें व समाज-दृष्टीनें विहित झालेलें वैदिक या लौकिक कर्म आपल्यास करावयाचें आहे. सर्व-व्यापी ईश्वराची भावना अंतःकरणामध्यें दृढ ठेवून त्याच्या साक्षित्वानें मात्र मुमुक्षु जीवानें कर्म करावयाचें आहे. विहित कर्म करावयाचें नाहीं, अशी वृत्ति

ठेवावयाची नाहीं. हें अशा स्वरूपाचें कर्म निष्काम असतें. हें कर्म म्हणजे खरें नैष्कर्म्य होय., हें कर्म जीवाला कोणत्याही तऱ्हेनें बद्धक होत नाहीं.

या पुस्तकाच्या वाचकांस हें माहित आहे कीं "माझ्या कर्माचें फल मला मिळालें पाहिजे, म्हणजे मला सुख होईल." हा प्रत्येक जीवाचा 'पंचवीस अक्षरी' मंत्र आहे. या मंत्राचेंच ध्यान–पठन आपण सर्व जीव करीत असतों, आणि सुखदुःखाचे भागीदार होतों, म्हणजे बद्ध होतों. सुखाच्या आशेनें केलेलें कर्म केव्हांही चांगलें होत नाहीं, हा अनुभव प्रसिद्ध गीता दैवीस्वरानें गाणारा भगवान् श्रीकृष्ण यासच काय, पण सर्व पौरस्त्य आणि पाश्चात्य, प्राचीन आणि अर्वाचीन, विद्वान् आणि अविद्वान् यांस आला आहे. फलाच्या आशेनें केलेल्या कर्मांत कर्त्याचें लक्ष फलाकडे असतें, कर्माकडे नसतें म्हणून कर्म चांगलें होत नाहीं व त्या कर्माचरणानें मनही संस्कृत होत नाहीं. तसेंच, अभिमानानें केलेलें कर्म मनाला नेहमीं दूषित करितें 'माझें कर्म' हें चिंतन नित्य असेल तर मनामध्यें काम क्रोध, लोभ, मत्सर, इत्यादि विकार जागृत राहून ते कर्मकर्त्यांच्या शुद्ध मनाला दूषित करितात व त्याच्या सुखदुःखाला कारण होतात. तेव्हां, 'हें कर्म माझें म्हणून मी करीत नाहीं, तर समाजाच्या कल्याणासाठीं, शास्त्रें सांगतात म्हणून, आणि श्रुतीनें विहित केलें आहे एतदर्थ, मीं कर्म केलें पाहिजे. कर्म न करितां स्वस्थ बसलों तर स्वतःचें व समाजाचें स्वास्थ्य मोडेल, अशी निष्काम भावना जीवांची असणें हें श्रुतीला इष्ट आहे. निष्काम कर्म चित्ताची शुद्धि करितें. असें कर्म समाजामध्यें प्रेम उत्पन्न करितें. असें कर्म समाजांत जे राजकीय, आर्थिक किंवा धार्मिक भेदाभेद असतील, उच्चनीचभाव असेल तो नाहींसा करितें. या मंत्रांत सांगितलेलें कर्म, निष्काम कर्म, अखंड चालू राहील, तर तें व्यक्तीचा व समाजाचा उद्धार करितें. जितका निष्काम सत्कर्माचा संग्रह ज्यास्त, तितकें प्रत्येक राष्ट्र जास्त सुसंस्कृत असतें. ॥ २ ॥

---

निष्कामकर्मपुराण संपलें, आतां सकाम कर्माचा परिणाम या मंत्रांत सांगितला आहे.

**असुर्या नाम ते लोका अन्धेन तमसाऽऽवृताः ।**
**तांस्ते प्रेत्याभिगच्छन्ति ये के चाऽऽत्महनो जनाः ॥३॥**

**अन्वय व अर्थः—अन्धेन तमसा आवृताः** ( अत्यन्त गाढ अंधकारानें पूर्ण भरलेलीं कोठेंही कसलेंही दर्शन होण्याचा संभव नसणारीं ) **ते लोकाः** ( तीं भुवनें ) **असुर्याः नाम** ( असुर्य "अप्रकाशी," प्रकाशशून्य या नांवानें प्रसिद्ध आहेत ) **ये केच आत्महनो जनाः** ( जे कोणी आत्म्याचा

घात करणारे लोक आहेत.) **ते प्रेत्य तान् अभिगच्छन्ति** (ते लोक मेल्यावर वरील ' असुर्य ' नामक लोकांप्रत जातात.)

सारांश, जे लोक सकाम व साभिमान कर्म करून देहाचें व विषयांचें मात्र चिंतन करितात, आत्म्याचें चिंतन मुळींच करीत नाहींत, ते लोक आत्मघाती होतात, आणि त्यांचा देहपात झाल्यावर ते लोक जेथें पूर्ण अज्ञान आहे, अशा लोकांमध्यें जाऊन अज्ञानामध्यें लोळत पडतात.

याचा भावार्थ स्पष्टच आहे. संसारामध्यें पडलेले जीव आपल्या या क्षणभंगुर देहाचें व विषयांचें मात्र चिंतन करीत असतात. त्यांना असें वाटत असतें कीं, आपल्याला सुख मिळावयाचें तें बाह्य विषयांपासून मात्र मिळेल. असो; विषयांकरितां जीवांची जी तळमळ आहे ती, विषयांपासून सुख मिळतें, या भ्रमानें उत्पन्न झाली आहे. विषयांचें चिंतन, त्यांचें ध्यान, त्यांचा निदिध्यास, त्यासाठीं लागणारी तळमळ, इत्यादि सर्व मनुष्याचें चित्त बिघडवून टाकितात. हे राक्षसी विकार त्याला स्वरूपाचें ज्ञान किंवा आपल्या कर्तव्याचें ज्ञान मुळींच होऊं देत नाहींत. असा स्वरूपाचें अज्ञान असलेला आणि स्वकर्तव्याचें भान नसलेला पुरुष आपल्या जीवाचें मातेरें करितो, आपल्या कुटुंबाचा, समाजाचा, राष्ट्राचा आणि जगताचा घात करितो. या आत्मघाती पुरुषासारखेच पुरुष कुटुंबांत, समाजांत, राष्ट्रांत, किंवा पृथ्वींत जास्त झाले तर त्या कुटुंबाचा, समाजाचा, राष्ट्राचा, सारांश, सर्वांचा ऐहिक व पारमार्थिक घात होतो. हें श्रुतीस सांगावयाचें आहे. गीतेनें अयाज्ञिक कर्म करणाराला " चोर " असें म्हटलें आहे. येथें श्रुति असल्या पुरुषांस आत्म–घाती असें म्हणते. हे पुरुष अथवा पुरुषाधम स्वकर्मानें स्वतःला दुःख देतात, इतकेंच नव्हे, तर हे इतर जीवांसही दुःखी करितात. तेव्हां असले दुष्ट कर्म करणारे, फलाची इच्छा ठेवून कर्म करणारे, किंवा कर्माचा अभिमान धरून कर्म करणारे लोकांची निंदा श्रुतीस करावयाची आहे. पहिल्या मंत्रांत शुद्ध ज्ञान काय आहे तें सांगितलें. दुसऱ्या मंत्रांत निर्लेप कर्म करावें, कर्मशून्य असूं नये, म्हणून सांगितलें आणि तिसऱ्या मंत्रांत सकाम आणि साभिमान कर्म करूं नये, असें आत्मघात्यांची निंदा करून सांगितलें. सारांश, स्वतःचा आणि स्वेतरांचा उद्धार करण्याविषयीं इच्छा धारण करणारा मुमुक्षु कसा असावा आणि कसा असूं नये, त्यानें कोणती मनोवृत्ति ठेवावी आणि कोणती ठेवूं नये, हें वरील तीन मंत्रांत सांगितलें आहे. हाच भगवंतास इष्ट असणारा कर्मबोध, अकर्मबोध आणि विकर्मबोध होय.

पुढील दोन मंत्र सर्व–नियामक, सर्व–व्यापी, सर्वश्रेष्ठ आणि सर्वज्ञ जो परमेश्वर त्याचें स्वरूप स्पष्ट सांगतात. ॥ ३ ॥

या व पुढील मंत्रांत आत्मस्वरूपाचें लक्षण दिलें आहे:—

**अनेजदेकं मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्षत् ।**
**तद्धावतोऽन्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति ॥**

**अन्वय व अर्थ:—अनेजत्** ( हालचाल न करणारें ) **एकं** ( एकच एक, ज्याच्याशिवाय दुसरें नाहीं, असें ब्रह्म ) **मनसो जवीयः** ( मनाहून अत्यंत चपल )—आहे. **देवाः पूर्वं अर्षत् एनत् न आप्नुवन्** ( देवांना म्हणजे इंद्रियांना पूर्वी प्राप्त झालेलें हें—आत्मतत्त्व—केव्हांही मिळत नाहीं. ) **तत् तिष्ठत् धावतः अन्यान् अत्येति** ( एका ठिकाणीं स्थिर राहणारें तें ब्रह्म अति वेगवान् धावणारांच्या पुढें जातें. ) **तस्मिन् मातरिश्वा अपः दधाति** ( त्यामध्येंच मातरिश्वा, वायु अथवा आईच्या उदरांतून जन्मास येणारा प्रत्येक प्राणी कर्म करित असतो.

सारांश, हें अद्वितीय ब्रह्म सर्वगामी असल्यामुळें अत्यंत जलद चालणाऱ्या मनालाही पाठीमागें टाकतें. स्वर्गातील देव किंवा जीवांच्या इंद्रियांवर स्वामित्व चालविणारे देव, यांना जरी ब्रह्माची सत्ता पहिल्यापासूनच प्राप्त झालेली असते तथापि हें ब्रह्मतत्त्व देवांना किंवा आमच्या ज्ञानेंद्रियांना गोचर होत नाहीं. तें सर्वव्यापी ब्रह्म अतिशय जलद धांवणाऱ्या सामर्थ्यांहून ( Forces ) वेगवत्तर असतें. या एकरूपी ब्रह्मामध्येंच वायु आदि महाभूतें आणि सर्व जीवजात आपापलीं कर्में करित असतात.

या मंत्रांत ब्रह्माच्या स्वरूपाचा एकच भाग मुख्यत्वानें सांगितला आहे. तो भाग म्हणजे त्याचें सर्व-व्यापित्व होय. आकाश सर्वव्यापी आहे असें वेदांत-कालीं आमचे पूर्व पूर्वज ऋषी म्हणत असत व आधुनिक पाश्चात्य पंडितही असें म्हणतात कीं आकाशामध्यें (Ether) सर्व विश्व अंतर्बाह्य बुडून राहिलें आहे. असो; या सर्व—गामी आकाशालाही एकरूपानें व एकरसानें व्यापून टाकणारें ब्रह्मतत्त्व आहे. अर्थातच मन आदि परिच्छिन्न (मर्यादित) वस्तु केव्हांही त्याच्याशीं तुलना करावयास योग्य नव्हेत. हीच कथा देवांची, आमच्या इंद्रियांची व सर्व गतिमान् विद्युत् प्रकाश, इत्यादिकांची आहे. वीज व प्रकाश लाख दोन लाख मैल प्रत्येक सेकंदांत प्रवास करितात, असें हल्लींच्या शास्त्रानें ठरलें आहे. या सर्व वस्तूंच्या गति अनंतपट वाढल्या तरी त्यांस ब्रह्माची सर येणार नाहीं. कारण तें एक समयावच्छेदेंकरून ( एका वेळींच, एकदम, ) सर्व विश्वास व्यापून राहिलें आहे. दुसरा असाही एक विचार आहे, कीं अत्यंत गतिमान् वस्तु स्थिर आहेत असाही भास आपल्यास होत असतो. लहान मुलें काठीला प्रकाशी पदार्थ बांधून तो गरगर फिरवूं लागलीं म्हणजे एक स्थिर

तैजसचक्र आपल्यास दिसूं लागतें. अतिशय जलद फिरणारा भोंवरा स्थिर आहे असाही भास आपल्यास होतो. तेव्हां अत्यंत गतिमान् वस्तु व अत्यंत स्थिर-वस्तु एकाच कक्षेंत येऊं शकतील. तात्पर्य, ह्या मंत्रांत जो कांहीं विरोधाचा भाग आहे, असें वाटतें तो केवळ आभास आहे. परमेश्वर सर्वव्यापी आहे, म्हणून एकचकाळीं तो सर्वत्र दिसतो. अर्थातच त्याची गति मनोगतीच्या अनंतपट असते. असो, येथें परमेश्वर सर्वव्यापी आहे हें विशेषत्वानें सांगून पहिल्या मंत्रांतील अर्थ स्पष्ट करावयाचा आहे. तसेंच, तो सर्वज्ञ आहे, सर्वसाक्षी आहे, हेंही स्पष्टपणानें सांगण्याचा श्रुतीचा उद्देश आहे. सर्व देवांच्या, मनादि इंद्रियांच्या, व पदार्थांच्या अंतर्यामीं व बाह्य प्रदेशीं हा परमात्मा ओतप्रोत भरलेला असतो. अर्थात् तो सर्वसाक्षी असतो व जीं जीं काय कर्में विश्वसामर्थ्यें जीव करितात. तीं त्याला विदित असतात. तो सर्वसाक्षी आहे, पण त्याला मात्र कोणी संसारी पुरुष किंवा देव स्वरूपानें पाहात नाहीं. ॥ ४ ॥

---

याच अर्थाचें पोषण पुढील मंत्र करीत आहे—

**तदेजति तन्नैजति तद् दूरे तद्वन्तिके ॥**
**तदन्तरस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—तत् एजति** ( तें भय पावतें किंवा हालचाल करितें, **तत् न एजति** ( तें मुळींच भय पावत नाहीं, किंवा हालचालही करीत नाहीं ) **तत् दूरे तत् उ अन्तिके** ( तें अतिशय दूर आहे; पण तें अतिशय जवळही आहे. ) **तत् सर्वस्य अस्य अन्तः** ( तें ह्या सर्वांच्या अंतरंगामध्यें आहे. ) **तत् उ अस्य सर्वस्य बाह्यतः** ( पण तें ह्या सर्वांच्या बाहेर आहे.

सारांश, हें भ्यालयासारखें दिसून स्वतः अत्यंत निर्भय असतें. तें सर्वांपासून अतिशय दूर असूनही तें सर्वांच्या अत्यंत समीप असतें. तें सर्वांच्या अंतःप्रदेशीं व बाह्यप्रदेशीं पूर्ण ओतप्रोत भरलेलें आहे.

या मंत्राचा भावार्थ थोडक्यांत असा आहे कीं, आपल्या इंद्रियांस, मनास, व बुद्धीस किंवा बुद्धिजन्य कल्पनेस परमेश्वर मुळींच गोचर होत नाहीं, म्हणून तो भ्याला अथवा लाजला असें वाटण्याचा संभव आहे. पण तो स्वरूपानें निर्भयच असतो; शिवाय जी जी म्हणून हाल-चाल होते, त्या हालचालीमध्यें हा परमेश्वर सत्तारूपानें [ अस्तित्वरूपानें ] सदैव असतो. म्हणून आपल्यास असेंही म्हणतां येईल कीं, हा स्थिर परमेश्वर सदैव हालचालीचा व्यापार करीत

आहे. वास्तविक तो स्थिरच आहे. पण आपल्यास मात्र हाल-चालीचा भास होतो; तसेंच, परमेश्वरावर ज्यांची श्रद्धा नाहीं, श्रुतिवाक्यांवर ज्यांचा विश्वास नाहीं, त्यांनीं आपल्या स्वतःच्या बुद्धीनें; त्याचा शोध लावण्याविषयीं केवढाही भगीरथ प्रयत्न केला, तरी तो त्यांस सांपडावयाचा नाहीं; इतका तो लांब आहे. पण श्रुतिवाक्यावर ज्यांची ज्ञानपूर्वक निष्ठा आहे, त्यांस तो अत्यंत निकटवर्ती असतो. अशा भक्तांस हा परमेश्वर सर्वत्र अन्तर्बाह्य दिसत असतो; म्हणून त्यांचें कर्म, त्यांचें शोल, त्यांची बुद्धि; आणि त्यांचे पुरुषार्थ हे सर्व विश्वोपकारकच होतात. ॥ ५ ॥

---

या ज्ञानी भगवद्भक्तांची किंवा भक्तिपूर्ण विद्वानांची मनःस्थिति पुढील दोन मंत्रांत सांगितली आहे, ती संसारी लोकांच्या अपेक्षेनें पाहिली असतां, मोठी मनोरंजक आहे. संसारी लोकांत परमेश्वर हा भ्यालेला, दूर असणारा, आंत किंवा बाहेर कोठें तरी एका ठिकाणीं सांपडणारा आहे, असें वाटत असतें! ही दृष्टि लक्षांत घेऊन पुढील मंत्रांचें व्याख्यान करावयाचें आहे.

**यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ॥**
**सर्वभूतेषु चाऽऽत्मानं ततो न विजुगुप्सते ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—तु** ( पण ) **यः सर्वाणि भूतानि आत्मनि एव च आत्मानं सर्वभूतेषु अनुपश्यति** ( जो सर्व भूतें आत्मस्वरूपामध्यें व आत्मस्वरूप सर्व भूतांमध्यें विचारपूर्वक पहातो ) **ततः न विजुगुप्सते** ( म्हणून ज्याला कोणत्याही प्रकारची शंका किंवा द्वेष, किंवा क्रोध, उत्पन्न होत नाहीं )

तसेंच—

**यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः ॥**
**तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः—सर्वाणि भूतानि यस्मिन् आत्मा एव अभूत्** ( आणि सर्व भूतें ज्या ज्ञानी पुरुषामध्यें आत्मस्वरूपच होतात. ) **विजानतः एकत्वं अनुपश्यतः तत्र कः मोहः कः शोकः** ( सर्वत्र ज्ञानदृष्टीनें एकत्व पाहणाऱ्या साक्षात्कारी पुरुषाच्या अंतःकरणामध्यें मोह किंवा शोक हे कसे उत्पन्न होणार ? )

दोन्ही श्लोकांचा सारांश असा आहे–कीं, ज्ञानानें आणि भक्तीनें ज्याचें दृढ अनुसंधान परमेश्वराच्या ठिकाणीं लागलेलें असतें व ज्याचें कर्म सर्वसंरक्षक परमेश्वराला संतोषित करतें, तो पुरुष 'सर्व भूतें आत्मस्वरूपांत आहेत, सर्व भूतांमध्यें आत्मस्वरूप आहे, सर्वत्रच आनंद आहे, काम-क्रोधाला कोठेंही जागा नाहीं,' असें पाहूं लागतो; आणि ज्याची अशी दृष्टि होते कीं 'सर्वभूतें परमेश्वर स्वरूपानें माझ्यामध्येंच आहेत आणि मी परमेश्वर स्वरूपानें सर्वभूतांमध्यें आहें' त्या ज्ञानी व साक्षात्कारी पुरुषाला अर्थातच शोक–मोहादिकांचे कारण उरत नाहीं. या दोन श्लोकांचा भावार्थ अगदीं स्पष्ट आहे. ज्ञानी पुरुषाला सर्वत्र आत्मस्वरूप दिसतें आणि सर्व वस्तू आत्मस्वरूपामध्यें दिसूं लागतात, इतकेंच काय! पण तो सर्वभूतें आत्मभावानें लेखूं लागतो. त्याचा आपपर भाव नाहींसा होतो. अर्थात् अशा पुरुषाच्या हातून केव्हांही श्रुतिनिषिद्ध कर्म व्हावयाचेंच नाहीं. हा ज्ञानी पुरुष परमेश्वर–साक्षित्वानें जी जी उपासना करील, ती जगताचा उद्धार करणारीच असावयाची; तो जें जें कर्म परमेश्वर-साक्षित्वानें करील, तें सदैव जगताचें ऐहिक व पारमार्थिक कल्याण करणारेंच असावयाचें; आणि त्याचें ज्ञानही जगताचें ज्ञान वाढविणारें असतें. असे महापुरुष ज्या राष्ट्रांत अवतीर्ण होतात, ते महापुरुष व तीं राष्ट्रें ऐश्वर्यवंत, शीलवंत, विजयशाली, आणि धर्मपर असतात हें भगवंतानीं गीतेमध्येंच सांगितलें आहे ॥ ६ ॥

---

पुढील मंत्र माझ्या समजूतीनें वरील ज्ञानी पुरुषाची शेवटची स्थिति सांगत आहे.

**स पर्यगाच्छुक्रमकायमव्रण-**
**मस्नाविरꣳ शुद्धमपापविद्धम् ॥**
**कविर्मनीषी परिभूः स्वयंभूर्याथा-**
**तथ्यतोऽर्थान्व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥८॥**

**अन्वय व अर्थः—सः शाश्वतीभ्यः समाभ्यः याथातथ्यतः अर्थान् व्यदधात्** (मागील दोन मंत्रांत उल्लेखिलेला तो ज्ञानी पुरुष यावज्जीव पुरुषार्थांची यथार्थ सिद्धि करितो. येथें शाश्वतीभ्यः समाभ्यः–'शाश्वत वर्षांपर्यंत'–याचा अर्थ तो ज्ञानी पुरुष मृत्यु लोकांमध्यें जिवंत आहे, तोंपर्यंत-असा केला आहे.) **सः कविः** (तो कवि प्रतिभासंपन्न असणारा व दुसऱ्यास ज्या गोष्टी दिसत नाहींत त्या पाहणारा.) **मनीषी** (मनावर सत्ता चालविणारा) **परिभूः** (सर्व विषयांचा पराभव करून

त्यांची निवृत्ति करणारा.) **स्वयंभूः** (स्वतंत्र; आपल्या स्वतः मध्येच रममाण होणारा)—ज्ञानी पुरुष **शुक्रं** (तेजस्वी) **अकायं** (शरीर-शून्य) **अव्रणं** (क्षररहित, अक्षर, अविकार्य) **अस्नाविरं** (स्नायु-शून्य) **शुद्धं** (निर्मळ) **अपापविद्धं** (पापशून्य)—अशा स्वरूपाप्रत **पर्यगात्** (जाऊन पोहचला—जाऊन पोहचतो.)

सारांश, वर दोन मंत्रांमध्यें निर्दिष्ट केलेल्या ज्ञानी पुरुषाची बुद्धि अत्यंत तीव्र व कुशाग्र असते. त्यानें मनोनाश आणि वासनानाश सिद्ध केले असल्यामुळें तो सदैव आत्मसुख घेत असतो; आमरण आपल्या गुण-कर्मांनीं मात्र सिद्ध झालेल्या वर्णाश्रमांस विहित, योग्य, आणि इष्ट अशीं कर्मे करून ह्या लोकीं चारी पुरुषार्थ यथार्थत्वानें साध्य करून घेतो, आणि शेवटीं असें स्वरूप प्राप्त करून घेतो, कीं जेथें पापाचा स्पर्श नाहीं उपाधीचें नांव नाहीं, जेथें ज्ञान आणि पवित्रता यांचें निरंतर वास्तव्य आहे. हेंच परमेश्वराचें अथवा परब्रह्माचें स्वरूप आहे. अर्थात् हा पुरुष परमेश्वरस्वरूप होतो.

हा सारांश मागें ज्या चार भाष्यांचा अवतार केला आहे त्यांच्याहून अगदीं निराळा आहे. माझी स्वतःची अशी समजूत झाली आहे कीं सहा, सात व आठ हे मंत्र ज्ञानी पुरुषाची ज्ञानमर्यादा, त्याची मनोवृत्ति, त्यानें संपादन केलेली योग्यता, त्यानें केलेलें कर्म, त्याला येथें प्राप्त झालेली स्थित-प्रज्ञता आणि देहपातानंतर त्याला प्राप्त होणारें स्वरूप या विषयांचें—सारांश ज्ञानी पुरुषाच्या स्थितीचें—स्वरूप वर्णन करितात. म्हणून आतांच सांगितल्या-प्रमाणें मला वाटतें कीं, आठव्या मंत्रासह सहावा व सातवा हे मंत्र ज्ञानी पुरुषाची स्थिति सांगतात. माझ्या समजूतीनें क्रमही वरपासून असाच आला आहे. पहिल्या तीन मंत्रांत ज्ञान, कर्म, अकर्म आणि विकर्म यांचा विचार करून असें ठरविलें आहे कीं, मुमूक्षूनें जन्मभर कर्म केलेंच पाहिजे. मात्र ह्या कर्मांचें कर्तृत्व आपल्याकडे घ्यावयाचें नाहीं. ह्या कर्मांचें फल परमेश्वरालाच समर्पण करावयाचें. नित्य "परमेश्वर सर्वत्र भरला आहे" ही ज्ञानदृष्टि अखंड ठेवून व आपल्यास हें स्वरूप गांठावयाचें आहे, हें ठरवून श्रुतिविहितमात्र कर्म करा-वयाचें हें ज्ञानी पुरुषाचें निष्काम कर्तव्य आहे. त्यानें हातपाय जोडून स्वस्थ बसावें हें श्रुतीला केव्हांही मान्य नाहीं; आणि मुमुक्षूनें श्रुति-निषिद्ध कर्म, तसेंच श्रुतिविहित पण स्वार्थी कर्म, केव्हांही करूं नये. हेंही श्रुतीनें सांगितलें आहे. पहिल्या मंत्रांत ज्ञानी पुरुषाचें निवृत्तिपर कर्म म्हणजे श्रुतिमान्य कर्म, दुसऱ्या मंत्रांत कर्म करूनही व्यापारशून्यत्व म्हणजे अकर्म आणि तिसऱ्या मंत्रांत सकाम कर्म म्हणजे विकर्म, असा भगवद्गीत कर्म, अकर्म, आणि विकर्म यांचा अनुवाद श्रीकृष्णाच्या पूर्वी कित्येक शतकें श्रुतीनें प्रसिद्ध केला आहे. असो; ज्ञानी पुरुषाचें कर्म पहिल्या तीन मंत्रांत सांगितलें

आहे. त्यापुढील दोन ५ व ६ हे मंत्र परमेश्वराचें स्वरूप सांगणारे आहेत. ज्ञानी पुरुषानें परमेश्वराचें सर्व-व्यापित्व कसें आकलन करावें हें या मंत्रांत सांगून त्याची निवृत्तिमूलक कर्मपरता पुष्ट व्हावी, हें श्रुतीस इष्ट आहे, असें मला वाटतें. सहा, सात व आठ हे मंत्र ज्ञानी पुरुषाच्या ऐहिक व पारमार्थिक स्थितीचें वर्णन करितात. सारांश, श्रीमत् शंकराचार्यांनीं म्हटल्याप्रमाणें हें उपनिषद् ज्ञानपरच आहे असें मला वाटतें. येथें ब्रह्माची व ज्ञानी पुरुषाची कथा सांगितली आहे. उत्तम ज्ञान झालें असतां ज्ञानी पुरुष निवृत्ति उत्पन्न करणारें कर्म कसें करितो व करवितो, याचें उत्तम वर्णन ह्या उपनिषदांत आहे. सारांश, आधुनिक आर्यांनीं कर्म-शून्यतेचा जो घोष घेतला आहे, तो सर्वांशानें खरा नाहीं, असा श्रुतीचा अभि-प्राय मला दिसतो. सारांश, ज्ञानी पुरुषानें कर्म करितांच उपयोगी नाहीं, असा आग्रह कित्येक अद्वैती वेदान्ती करित असतात, त्या आग्रहाचा निरास श्रुतीनें या उपनिषदांत केला आहे. आणि सर्वथा स्वार्थत्याग केलेल्या ज्ञानी पुरुषानें लोक-संग्राहक कर्म निष्कामी कर्तव्य-दृष्टीनें केलें पाहिजे, असें श्रुति कंठरवानें येथें सांगत आहे, हा भाग विसरला गेल्यामुळें व कर्म करणें हें स्वभावतःच अप्रिय असल्यामुळें कर्म न करणें हेंच खरें ज्ञान, हाच खरा, वेदान्त, हेंच खरें सात्त्विक व्रत, असा–माझ्या समजुतीनें अवास्तविक–आग्रह अद्वैती पंडितांत प्रविष्ट झाला. हा अमंगल प्रकार केव्हां झाला हें जरी सांगतां येत नाहीं, तथापि त्याच्या योगानें आमच्या समाजाची एक मोठी हानि झाली, ती मात्र विसरतां येत नाहीं. पहा कीं, "सर्वत्र अद्वैताचें साम्राज्य आहे. आपपरभाव मुळींच नाहीं. शोक मोह असण्याचें कारण नाहीं. सर्वत्र आनंद आहे." इत्यादि प्रकारचें मंगलकारी ज्ञान प्राप्त झाल्यामुळें ज्याची स्वार्थबुद्धि सर्वात्मना नष्ट झाली तो जगत्कल्याण करण्यास सर्वस्वी योग्य असणारा महापुरुष कर्मशून्य झाला, स्वार्थीकर्माबरोबरच लोक-संग्राहक कर्मांचा त्यानें त्याग केला! 'मी कोणतेंही कर्म करणारच नाहीं' अशा आग्रही मनोवृत्तीचा स्वीकार त्यानें केला, ही केवढी दुर्दैवाची गोष्ट झाली? असो. झाल्या गोष्टी त्या होऊन गेल्या. आतां तरी कर्मांचा त्याग म्हणजे स्वार्थी कर्मांचा त्याग, मर्यादित कल्याण करणाऱ्या कर्मांचा त्याग, एवढाच वरील शब्दाचा अर्थ व्हावा. कर्मत्याग म्हणजे सर्व कर्मांचा सर्वथा त्याग असा अनर्थकारी अर्थ होऊं नये. पूर्ण योग्याचें कर्म शममूलक असतें असें गीताकारांचें यथार्थ म्हणणें आहे. तसेंच स्वतःचा व स्वेतरांचा बंधमोक्ष करणाऱ्या मुमुक्षूचें असावें. तेव्हां, ज्ञान मिळविण्याची, वेदान्तज्ञान मिळविण्याची, ज्यांना हौस आहे, (यथार्थ ज्ञान–विज्ञान झालें म्हणजे कर्म संपतें, मोक्ष मिळतो. कृतकृत्यता प्राप्त होते व जीव कृतार्थ होतो असा ज्यांचा निश्चय आहे,) त्यांनीं–लोक–संग्रहासाठीं येथें अवतीर्ण झालेले महान् साधुसंत यांनीं, अनाथांचें संरक्षण करणारें कर्म केलें आहे, असें आपल्यास दिसतें म्हणून,–' परमेश्वरही साधूंचें रक्षण करण्यासाठीं

व धर्माची संस्थापना करण्यासाठीं अवतार घेऊन कर्म करित असतो.'—हें सर्व-संमत आहे म्हणून, सत्कर्माचा त्याग केव्हांही करूं नये, अशी माझी त्यांस करद्वय जोडून विनंति आहे. असो. ॥ ८ ॥

---

या पुढील तीन मंत्रांत विद्या व अविद्या यांचें फल काय असतें तें सांगितलें आहे.

**अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते ॥**
**ततो भूय इव ते तमो य उ विद्याया ँ रताः ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थः—ये अविद्यां उपासते** (जे लोक अविद्येची मात्र उपासना करितात. )—ते लोक—**अन्धं तमः प्रविशन्ति** ( अतिशय गाढ अंधकारामध्यें प्रवेश करितात. ) **उ ये विद्यायां रताः** ( पण जे विद्ये-मध्येंच रममाण होतात ) **ते ततः भूयः इव तमः** ( ते लोक याच्या-पेक्षांही अधिक निबिड अंधकारामध्यें जणुं प्रवेश करितात. )

सारांश, जे अविद्येच्या मात्र पाठीमागें लागले, जे अविद्येचें मात्र आराधन करितात. ते लोक जेथें कोणत्याही प्रकारचा प्रकाश नाहीं, ज्ञान नाहीं, व आनंद नाहीं, अशा लोकांमध्यें हे अविद्योपासक जाऊन पडतात; पण केवळ विद्येमध्येंच रंगून गेलेल्या पंडितंमन्यांची स्थिति याहूनही फारच भयंकर असते. ते लोक कल्पनेलाही अगोचर अशा अज्ञानी अंधकारामध्यें जाऊन पडतात. ॥ ९ ॥

---

**अन्यदेवाहुर्विद्ययाऽन्यदाहुरविद्यया ॥**
**इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥ १० ॥**

**अन्वय व अर्थः—विद्यया अन्यत् एव आहुः** ( विद्येच्या मात्र योगानें निराळें—फल मिळतें—असें म्हणतात. ) **अविद्यया अन्यत् आहुः** ( अविद्येनेंही निराळें—फल मिळतें—असें म्हणतात. ) **ये तत् नः विचचक्षिरे** ( ज्यांनीं आम्हांस परमार्थ—ज्ञान नीट समजावून दिलें )—त्या—**इति** ( त्याप्रमाणें ) **धीराणां शुश्रुम** ( बुद्धिमान् पुरुषांपासून आम्हीं ऐकलें आहे. )

सारांश, केवळ विद्येचें फल निराळें व स्वतंत्र आहे. केवळ अविद्येचें फलही त्याप्रमाणेंच निराळें आणि स्वतंत्र असतें. ज्या महापुरुषांनीं आम्हांस

ब्रह्मज्ञानाचा स्पष्ट उपदेश केला, त्या बुद्धिमान् गुरुजींनीं आम्हांस विद्या व अविद्या यांचीं फलें निराळीं व स्वतंत्र असतात असें सांगितलें आहे. ॥ १० ॥

---

**विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयꣳ सह ॥**
**अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते ॥ ११ ॥**

**अन्वय अर्थः—यः विद्यां च अविद्यां च उभयं सह तद् वेद स ह अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्यया अमृतं अश्नुते** ( ज्या पुरुषाला विद्या आणि अविद्या व उभयतांमध्यें संबंध जोडणारें तत्त्वज्ञान त्यांचें ज्ञान झालें, तो अविद्येच्या साहाय्यानें मृत्यूला ओलांडून जातो आणि विद्येनें अमृताचा आस्वाद घेतो. )

याप्रमाणें विद्या आणि अविद्या, यांचा स्वतंत्र विचार करणारे हे तीन मंत्र आहेत. अविद्या म्हणजे काय? असें पाहिलें असतां, 'अविद्या म्हणजे सकाम कर्म' असा अर्थ श्रुतीला मान्य आहे असें दिसतें. बृहदारण्यक, काठक, इत्यादि उपनिषदांत अविद्या हा शब्द आला आहे; आणि तेथें सकाम कर्म, बंध उत्पन्न करणारें कर्म, असाच अर्थ आहे; हें मागील पुढील संदर्भावरून स्पष्ट दिसतें. विद्या या शब्दाचा अर्थ उपासना किंवा ज्ञान असा इतरत्र आढळतो. येथेंही तिसऱ्या मंत्रांत आत्मघाती लोकांस, अन्धन्तम लोकांप्रत जावें लागतें व या मंत्रांत अविद्येच्या उपासकांस अन्धन्तमाची प्राप्ति होते, असें म्हटलें आहे. यावरून अविद्येचे उपासक, तेच आत्मघाती लोक होत असें दिसतें. आत्मस्वरूप न समजणारे, ते आत्मघाती होतात. निवळ सकामकर्मांची उपासना करणारे लोक, आत्मस्वरूपाच्या ज्ञानासंबंधानें उदासीन असतात; इतकेंच नव्हे, तर ते आत्मज्ञानाचा तिरस्कारही करितात. अर्थातच तेही आत्मघाती झाले; याप्रमाणें सकामकर्म मात्र करून, आयुष्याचें 'सार्थक्य!' करणाऱ्या लोकांस असुर्यलोकाप्रत किंवा अज्ञानदशेप्रत जाऊन पोंहोचावें लागतें. म्हणजे जेथें ज्ञानाचें नांव नाहीं अशी जडस्थिति त्यांस प्राप्त होते. असुर्यलोकासच 'अनंद' म्हणजे 'आनंदशून्यप्रदेश' असें इतर ठिकाणीं म्हटलें आहे. सारांश, सकामकर्म करणारे लोकांस ज्ञान–शून्य, व आनंदशून्यस्थिति—केवल जडावस्था प्राप्त होते. याचप्रमाणें नुसत्या ज्ञानामध्यें किंवा उपासनेमध्यें मात्र जे रममाण होऊं लागले; ज्यांचें चित्त ज्ञानाच्या किंवा उपासनेच्या आनंदांतच रत होऊन, 'आपणच ज्ञानी, आपणच आनंदी, आपणच कृतकृत्य' असें भान झालें; आणि या मर्यादित, संकुचित अथवा परिच्छिन्न सुखीपणाचा ज्यांस अभिमान प्राप्त झाला; त्या लोकांची स्थिति शुद्ध

अज्ञानी, आत्मघाती अथवा सकामकर्म करणाऱ्या लोकांपेक्षांही ज्यास्त भयंकर होते. उपभोगाकरितां मात्र ज्ञान नाहीं, उपभोगाकरितां मात्र जन्म नाहीं, उपभोगाकरितां मात्र कर्म नाहीं, हें श्रुतीस एककंठानें सांगावयाचें आहे. यावरून एक वेळ सकामकर्मांचा उपासकही बरा, असें म्हणावें लागेल ! कारण, त्याला प्राप्त होणारी गति ज्ञानानंदशून्यत्वाची अथवा जडपणाची तरी असते. पण विद्येमध्यें म्हणजे ज्ञानामध्यें, अथवा उपासनेमध्यें मात्र ज्यांना सुख वाटूं लागलें, सारांश, ज्ञान असूनही जे बाह्य विषयांपासून सुख होतें, असें मानूं लागले, व ह्या सुखाचा ज्यांस अभिमान उत्पन्न झाला, त्यांची गति फारच भयंकर असते. कारण, त्यांची बाह्यविषयांची जाणीव कायम राहून, बाह्यविषयांचा म्हणजे सुख–दुःखाचा, अथवा संसाराचा त्यांस अनुभव घ्यावा लागतो; व ते अनन्तकालपर्यंन्त तळमळतच राहतात.

श्रुतीला इष्ट गोष्ट ही आहे कीं प्रत्येक जीवानें आपलें चित्त आधीं शुद्ध करून घ्यावें. ही चित्तशुद्धि निष्काम कर्मानें व निष्काम उपासनेनें मात्र साध्य आहे. चित्तशुद्धि झाल्यावर ब्रह्मज्ञान संपादून ब्रह्म व्हावें जीवानें कोठेंही, कसलाही, अभिमान धरतां उपयोगी नाहीं. आत्मेतर विषयाचा व आत्म्याचा सुद्धां अभिमान धरितां उपयोगी नाहीं. हाच जीवाचा महाघातक शत्रु आहे. तसेंच जीवानें भोगदृष्टीनें कोठेंही रममाण होतां उपयोगी नाहीं. सुखोपभोग हाही घातक शत्रु आहे. हा श्रुतीचा उपदेश आहे.

हा माझा अर्थ बरोबर असेल तर वरील तीन मंत्रांचा अर्थ माझ्या समजुतीनें असा होतो. अविद्येचे उपासक घोर यातना भोगतात तर विद्येचे भोक्ते घोरतर अनर्थामध्यें सांपडतात. विद्या आणि अविद्या यांचें प्रत्येकीं फल फार निराळें आहे. या दोहोंची संगति झाली, विद्या आणि अविद्या या उभयतांचें स्वरूप जीवांस समजून त्यांनीं तत्त्वज्ञान अभ्यासिलें, तर अविद्येच्या योगानें म्हणजे सकाम कर्माच्या योगानें प्राप्त होणारा संसार किंवा जड स्थिति यांचे स्वरूपज्ञान जीवाला होऊन तो जीव मृत्युसागर तरून जातो म्हणजे आपल्या सकाम कर्माला निष्कामत्व देऊन चित्तशुद्धि करून घेतो. ही झाल्यावर म्हणजे वासना आणि अभिमान नाहींशीं झाल्यावर जीवाच्या हातून जें कर्म होतें तें त्याला बद्धक होत नाहीं, एवढेंच नव्हे, तर तें स्वतःचा व इतरांचा उद्धार करणारें असें होतें. विद्येसह अविद्येची ( उपासनाज्ञानासह कर्मज्ञानाची ) संगति असली व उभयतांचा संगम तत्त्वज्ञानाचे घरीं झाला म्हणजे कर्मालाही ज्ञानस्वरूप प्राप्त होतें. याप्रमाणें स्वतःच्या विषयसुखाविषयीं, स्वतःच्या ज्ञानाविषयीं, आणि स्वतःच्या जीवित्वाविषयीं उदासीन झालेला निर्मल मनाचा पुरुष तत्त्वज्ञानाचा ( आत्मविद्येचा अथवा ब्रह्मविद्येचा ) अभ्यास करूं लागला म्हणजे त्याचें अस्तित्व, त्याचें ज्ञान आणि त्याचा आनंद हीं सर्व समाजाच्या, राष्ट्रांच्या व विश्वाच्या

अस्तित्वास, ज्ञानास आणि आनंदास उत्तेजित करितात म्हणूनच येथील अकराव्या मंत्रांत श्रुतीनें सांगितलें आहे कीं विद्येनें, अविद्येच्या स्वरूपज्ञानासह स्थित असणाऱ्या विद्येनें, ( उपासनाज्ञानानें ) जीवाला अमृतत्व प्राप्त होतें. म्हणून मला असें वाटतें कीं निवळ अविद्या किंवा केवळ विद्या या एकेकीच्या ज्ञानाचा बिलकुल उपयोग नाहीं; किंबहुना, हें एकदेशी ज्ञान अनर्थाला मात्र कारण होतें. म्हणून प्रत्येकानें सकाम कर्मज्ञानांतच लिप्त न होतां किंवा नुसत्या ज्ञानांत, चित्तशुद्धि झाल्याशिवाय व ज्ञानाच्या शब्दावडंबरांत गुंतून न पडतां उभयतांचा, ही म्हणजे विद्या व अविद्या यांचा अधिगम करून घ्यावा आणि तत्त्वज्ञानानें उभयतांचा संधि करावा. कर्म-प्रेरक वासना आणि अभिमान यांचा त्याग करून निर्मलचित्त व्हावें, म्हणजे त्याच्या हातून सहज वृत्तीनें परोपकारी कर्म, परोपकारी उपासना तसेंच परोपकारी ज्ञानार्जन आणि कार्यकारी ब्रह्मज्ञान यांचा संगम होऊन स्वतःच्या बरोबरच स्वतःच्या राष्ट्राचा व स्वतःच्या विश्वाचा बंधमोक्ष होण्याचें कार्य हा पुरुष सौकर्यानें करील. ॥ ११ ॥

---

या पुढील तीन मंत्रांत संभूति व असंभूति या द्वयीचा वरील मंत्रत्रयींत केलेल्या विचाराप्रमाणेंच उपदेश आहे.

**अन्धं तमः प्रविशन्ति येऽसंभूतिमुपासते ॥**
**ततो भूय इव ते तमो य उ संभूत्याꣳ रताः ॥ १२ ॥**

**अन्वय व अर्थः—ये असंभूतिं उपासते** ( जे असंभूतीची—जी केव्हांही उत्पन्नच झाली नाहीं त्या मूळप्रकृतीची म्हणजे अस्तित्वांत नसणाऱ्या आदिमायेची—उपासना करितात. )—ते लोक—**अंधंतमः प्रविशन्ति** ( गाढ अंधकारी प्रदेशामध्यें जाऊन पडतात. ) **उ ये संभूत्यां रताः ते भूयः इव तमः** ( पण जे लोक संभूतीमध्यें मात्र—या उत्पन्न होऊन दृश्य असणाऱ्या सृष्टीमध्यें मात्र—रममाण होतात. ते पूर्वोक्त अंध प्रदेशापेक्षांही जास्त निबिड, अप्रकाशितप्रदेशांत जाऊन पडतात.

सारांश, जे लोक मूळ प्रकृतीची अथवा आदि मायेची उपासना करितात, ते ज्ञानशून्य व आनंदशून्य स्थिति प्राप्त करून घेतात; पण जे या दृश्य सृष्टीमध्यें रममाण होतात, ते वरीलपेक्षांही जास्त भयंकर स्थितीमध्यें जातात. ॥ १२ ॥

---

**अन्यदेवाहुः संभवादन्यदाहुरसंभवात् ॥**
**इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥ १३ ॥**

**अन्वय व अर्थः—संभवात् अन्यत् एव आहुः** ( संभवाहून निराळेंच आहे असें म्हणतात. ) **असंभवात् अन्यत् आहुः** ( असंभवाहून ही निराळें आहे असें म्हणतात. ) **ये नः तत् विचचक्षिरे** ( ज्यानीं आम्हांस तत्त्वज्ञान समजून दिलें ) **इति धीराणां शुश्रुम** (याप्रमाणें आम्हीं त्या विद्वान् गुरूजींकडून ऐकलें आहे. )

सारांश, मुख्य तत्त्वज्ञान हें दृश्य सृष्टीहून निराळें आहे, तसेंच मूलप्रकृतीच्या ज्ञानाहून किंवा आदिमायेच्या ज्ञानाहूनही निराळें आहे, असें आम्हीं विद्वान् व अविकारी तत्त्वोपदेशकांकडून ऐकलें आहे. त्यांचा उपदेश हा आहे कीं तत्त्वज्ञान हवें असेल तर तें नुसत्या दृश्य सृष्टीच्या आनंदामध्यें किंवा मूलप्रकृतीच्या उपासनेमध्यें सांपडावयाचें नाहीं. ॥ १३ ॥

---

**संभूतिं च विनाशं च यस्तद्वेदोभयं सह ॥**
**विनाशेन मृत्युं तीर्त्वा संभूत्याऽमृतमश्नुते ॥ १४ ॥**

**अन्वय व अर्थः—यें संभूतिं च विनाशं च उभयं सह तत् वेद** ( ज्याला संभूति–सृष्टि–व विनाश–सर्वांचे नाशकारण जी आदिमाया ती–या उभयतांच्या ज्ञानासह तत्त्व–ज्ञान झालें.)–तो–**विनाशेन मृत्युं तीर्त्वा** ( विनाशाच्या, नाशकारणाच्या ज्ञानानें मृत्यूचें अतिक्रमण करून ) **संभूत्या अमृतं अश्नुते** ( सृष्टीच्या ज्ञानानें अमृत स्वरूप होतो. )

सारांश उघड आहे कीं मूल प्रकृतीचें व दृश्य सृष्टीचे ( विराट् स्वरूपाचें ) ज्ञान होऊन ब्रह्मज्ञान झालेला मनुष्य मृत्यूला मारून आपण ब्रह्मस्वरूप होतो.

हे तीन मंत्र ज्ञानासंबंधानें आहेत असें मला वाटतें. केवळ प्रकृतीचीच उपासना केली म्हणजे ह्या दृश्य सृष्टीचें मूळ कारण काय आहे, हें स्वतःच्याच बुद्धीनें शोधित गेलें म्हणजे ब्रह्मस्वरूपाचा शोध लागतो असें होत नाहीं. फार काय ! पण या असल्या अव्यक्ताची उपासना करणाऱ्या श्रुतिबाह्य कल्पनांनीं जीवास महान् संकटें मात्र भोगावीं लागतात. पण जे लोक या दृश्य जगाचाच शोध करीत राहून त्यामध्येंच आपल्यास धन्य मानून घेतात, त्या लोकांची स्थिति जास्तच भयंकर होते. अव्यक्ताचा शोध

करणारे लोक निदान 'आम्हांस कांहीं समजत नाहीं.' अशी भावना धरून विनयशील तरी राहण्याचा संभव आहे; पण 'जें दिसतें आहे; जी सृष्टि आपल्या इंद्रियादिकांस गोचर आहे, तेवढेंच काय तें विश्व आहे; या विश्वाचें ज्ञान आम्हांस झालें. आम्ही धन्य आहों.' असा ज्ञानाचा अभिमान धरून जे लोक उन्मत्त होतात व या दृश्य सृष्टीच्या उपभोगामध्येंच जे रममाण होतात, त्यांची स्थिति अर्थातच अत्यंत भयप्रद असते. आपल्या मानवी बुद्धीच्या कुशाग्रतेवर श्रद्धा ठेवून अव्यक्ताचा शोध कितीही दीर्घ प्रयत्न करून केला तरी, त्याला श्रुतीचें साहाय्य नसेल तर ते शोध व या शोधांपासून निर्माण झालेलें निश्चित ज्ञान हीं नेहमीं मर्यादित म्हणून अनिश्चितच राहणार; पण दृश्य सृष्टीच्या पलीकडे कांहीं नाहीं, अशी समजूत करून घेणारा जीव अभिमानानें घेरून टाकला म्हणजे त्याच्या ज्ञानाची मर्यादा अत्यंतच संकुचित होते. या उन्मत्त लोकांस अव्यक्तोपासकांपेक्षां जास्त अज्ञान असतें आणि शिवाय अभिमानासह अज्ञान मात्र पदरीं पडतें. श्रुतीस असें सांगावयाचें आहे कीं, अव्यक्ताचें ज्ञान म्हणजे ब्रह्मज्ञान नव्हे, तसेंच व्यक्त सृष्टीचें ज्ञानही ब्रह्मज्ञान नव्हे; तें या उभय ज्ञानांहून अतिशय निराळें आहे. ब्रह्मज्ञान होण्याला श्रुतीचें बल तर अवश्य हवेंच, पण श्रुतिज्ञानाबरोबरच अव्यक्त व व्यक्त सृष्टींचेंही ज्ञान जीवांनीं करून घेतलें पाहिजे.

हा असा बोध आपल्या पूर्वपूर्वजांस होता, म्हणून ऋषिकालांत अव्यक्त सृष्टीसंबंधीं व व्यक्त सृष्टीसंबंधीं अनेक शास्त्रें श्रुतिबलानें त्यांस निर्माण करितां आलीं. त्यांस श्रुतिबलाचें साहाय्य होतें म्हणून 'सृष्टीच्या बाल्यावस्थेमध्येंही' त्यांचें शील अति उत्तम होतें, त्यांचें कर्म परोपकारी असे आणि त्यांचें ज्ञान ब्रह्मस्वरूप उघड करणारें असे.

प्रस्तुत काळीं पाश्चात्य देशांत अव्यक्ताची उपासना करणारे मोठमोठे तपस्वी आहेत, व्यक्त सृष्टीच्या पलीकडे कोणकोणतीं सामर्थ्यें आहेत, यांचा त्यांनीं झपाट्यानें शोध चालविला आहे, हें खरें. ही गोष्ट वरील लोकांस भूषणास्पद आहे यांत शंका नाहीं. तसेंच, दृश्य सृष्टीमध्यें काय काय चमत्कार आहेत त्यांचाही शोध लावणारे पुष्कळ विद्वान् आज मित्तीला विद्यमान आहेत. यांच्याही शोधांनीं जगांतील लोकांची जीवनयात्रा सुखकर होण्याचा संभव आहे. मात्र माझ्या दृष्टीला एक उणीव दिसत आहे. ती ही कीं ब्रह्मज्ञानाचा (श्रुतीचा अनुवाद करणाऱ्या ब्रह्मज्ञान-विज्ञानाचा) जसा तिकडील लोकांस परिचय असणें अवश्य आहे, तसा तो नाहीं, असें मला वाटतें. म्हणून हल्लीं पाश्चात्य देशांत अव्यक्तासंबंधानें व व्यक्तासंबंधानें जें नवीन नवीन ज्ञान प्राप्त होत आहे, या जगांतील विषय-सुखाच्या नवीन कल्पना व नवीन साधनें निर्माण होत आहेत, त्या नवीन शोधांनीं, नवीन कल्पनांनीं आणि नवीन साधनांनीं सुख वाढूनही तृप्ति आणि समाधान यांचें वास्तव्य नाहींसें झालें आहे ! सर्वत्र सर्व समाज ऐहिक सुखाच्या व कांहीं अंशीं मात्र पारमार्थिक सुखाच्या पाठीमागें एकसारखा धांवत असल्यामुळें

त्याला स्वरूपाची आणि जीवाच्या अत्यंत इष्टतम पुरुषार्थाची कल्पनाच नाहींशी, निदान विसरलीशी, झाली आहे. सारांश, माझ्या समजुतीनें हा एकदेशी प्रकार आहे. आमच्या इकडे म्हणजे पौरस्त्य राष्ट्रांत उलट प्रकार झाला आहे. म्हणजे तत्त्वज्ञानाचा, ह्या मंत्रांतील संभूति व असंभूतींच्या ( अव्यक्त–शोधक आणि व्यक्त–प्रबोधक शास्त्रांच्या ) ज्ञानांचा विचार न करणाऱ्या तत्त्वज्ञानाचा मात्र परिपोष झाल्यामुळें आमचें सृष्टिज्ञान-विज्ञान हजार पांचशें वर्षांपाठीमागील काळांतील असल्यासारखें झालें आहे. आमच्या कल्पना, आमची राहणी, आमचें शील, हीं सर्व साधीं भोळीं, कोठेंही फारशी गुंतागुंत नसणारीं अशीं आहेत खरीं; पण जीवनकलहाच्या दारुण संग्रामांत यांचा काय उपयोग होणार ? इष्ट परिणाम हा असावा कीं, समाजामध्यें विचाराचा दम पाहिजे; संकटाशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य पाहिजे; कठिण प्रसंगीं आपलें शील निर्मल ठेवण्याचें धैर्य पाहिजे. सारांश, ज्ञानपोषक, समाजसंरक्षक आणि शील–सुधारक अशा कल्पनांचा व साधनांच्या ज्ञानाचा आमच्या इकडे प्रायः अभाव असल्यामुळें आमची समाज–रचना विस्कळितच आहे असें म्हटलें पाहिजे. शिवाय, पाश्चात्य लोकांस जीं ज्ञानसाधनें व सुखसाधनें उपलब्ध झालीं आहेत तीं आपल्या येथें नाहींत म्हणून असंतुष्टता आणि असमाधान यांचेंही बिऱ्हाड आमच्या येथें आलें आहे! हा परिणाम अव्यक्त आणि व्यक्त शास्त्रांकडे दुर्लक्ष केलें म्हणून झाला असें म्हणण्यास मला हरकत वाटत नाहीं.

याप्रमाणें पाश्चात्य राष्ट्रांत व्यक्ताव्यक्त ज्ञानाचें प्रस्थ प्रामाणिक तत्त्वज्ञानाशिवाय वाढलें, म्हणून तिकडे अतृप्ति व असमाधान आहेत. आणि आमच्याइकडे व्यक्ताव्यक्त शास्त्रांच्या ज्ञानाशिवाय केवळ तत्त्वज्ञानाची "पोपटपंची" झाली म्हणून ज्ञानाचें दारिद्र्य, संपत्तीचें दारिद्र्य व कर्म–दारिद्र्य प्राप्त होऊन असंतोष आणि असमाधान यांचें साम्राज्य झालें आहे. श्रुतीला दोन्हींही प्रकार अनिष्ट आहेत. तिचें आग्रहपूर्वक सांगणें हें आहे कीं, मृत्यूचें अतिक्रमण करून अमरत्व संपादन करावयाचें असेल तर व्यक्तीनें आणि राष्ट्रानें तत्त्वज्ञानाच्या प्रबोधासह विद्या आणि अविद्या ( कर्म आणि उपासना ) यांचें संपादन केलें पाहिजे आणि ह्याचप्रमाणें तत्वज्ञानाच्या प्रबोधासह व्यक्ताव्यक्त शास्त्रांचा अभ्यास केला पाहिजे. याचप्रमाणें श्रद्धा आणि विचार यांचेंही समीकरण योग्य रितीनें घडवून आणलें पाहिजे. श्रद्धेविरहित असणारा विचार नास्तिकवृत्तीनें असमाधान उत्पन्न करितो, तर विचारशून्य भोळी श्रद्धा, अतृप्ति उत्पन्न करिते. उपासनेनें श्रद्धा वाढते व व्यक्ताव्यक्तांच्या ज्ञानानें विचारबल वाढतें. असो, अशा या दोन जोड्यांचा लाभ सर्वांनीं करून घेतला तर सर्वांचेंच सर्व रीतीनें कल्याण होणार आहे. ॥ १४ ॥

यापुढील सर्व मंत्र प्रार्थनापर आहेत. हेंच प्रार्थनापर मंत्रचतुष्टय बृहदारण्यकाच्या पांचव्या अध्यायांत पंधराव्या ब्राह्मणामध्येंही आहे. या प्रार्थनेंतही श्रद्धा आणि विचार यांचें प्रबल समीकरण दृश्य होतें. हें कसें तें आपण पाहूं.

**हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ॥**
**तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥ १५ ॥**

**अन्वय व अर्थ—हिरण्मयेन पात्रेण सत्यस्य मुखं अपिहितं** ( सुवर्णाच्या पात्रानें सत्यस्वरूपाचें मुख अपिहित म्हणजे आवृत, आच्छादित झालें आहे. ) **पूषन्** ( हे सर्वपोषक ईश्वरा! ) **सत्यधर्माय दृष्टये** ( सत्य असा जो धर्म याचें ज्ञान स्पष्ट होण्यासाठीं ) **तत् त्वं अपावृणु** ( तें मुख तूं उघडें कर, प्रकट कर. )

सारांश, सर्वांचें पोषण करणाऱ्या व सर्व ज्ञान–शास्त्राचें व पुरुषार्थसाधनांचें पोषण करणाऱ्या देवा ! सत्याचें स्वरूप हें सुंदर आणि रमणीय अशा असत्यानें (मायेनें, अज्ञानानें.) झांकून टाकिलें आहे. हे देवा ! तें झांकण तूं काढून टाक आणि सत्य व धर्म यांचें ज्ञान मला पूर्णतर होईल, असें आपलें सत्स्वरूप तूं प्रकट कर.

या मंत्रांतील प्रार्थना खऱ्या ज्ञानाविषयींची आहे. अज्ञानाचा व अधर्माचा नाश व्हावा आणि ज्ञानाचा व धर्माचा विस्तार व्हावा एतदर्थ ही प्रार्थना आहे. ॥ १५ ॥

---

**पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजा-**
**पत्य व्यूह रश्मीन्समूह ।**
**तेजो यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते**
**पश्यामि योऽसावसौ पुरुषः सोऽहमस्मि ॥ १६ ॥**

**अन्वय व अर्थ—पूषन् एकर्षे यम सूर्य प्राजापत्य रश्मीन्व्यूह तेजः समूह** ( हे पूषन् ! एकर्षे !–सर्वज्ञा ! यम !–सर्व नियामक देवा ! सूर्य !–सर्व–प्रवर्तक ईश्वरा ! प्राजापत्य !–प्रजांचें पालन करणाऱ्या परमेश्वरा !–आपले ज्ञानकिरण व प्रसादकिरण आपण व्यवस्थित करा आणि आपलें तेज एकवट करा. ) **यत् ते कल्याणतमं रूपं** ( जें आपलें अत्यंत कल्याण करणारें सत्यस्वरूप आहे. ) **ते तत् पश्यामि** ( तें तुझें स्वरूप मी पाहतों, पाहणार आहें. ) **यः असौ पुरुषः सः अहं अस्मि** ( जो तो पुरुष आहे तो मी आहें. )

सारांश, हे सर्वपोषक, सर्वज्ञ, सर्वनियामक, सर्वप्रवर्तक आणि सर्व–पालक परमेश्वरा! आपले ज्ञानकिरण आणि प्रसादकिरण अशा रीतीनें व्यवस्थित करा. तसेंच, आपलें तेज अशा रीतीनें एकवट करा कीं, ज्याच्या योगानें आपलें जें अतिमंगल सत्स्वरूप आहे, त्याचें मला यथार्थ दर्शन होईल. माझा असा निश्चय आहे, माझी अशी श्रद्धा आहे कीं, आपण परमात्म–स्वरूपानें माझ्या अंतर्यामीं वास्तव्य करीत आहांत. माझें आत्मस्वरूप व आपलें आत्मस्वरूप परमार्थतः एकच आहे. तो अत्यंत दूरसा दिसणारा परमात्मा माझा अत्यंत निकटवर्ती आहे, म्हणजे तोच मी आहें!

येथें अद्वैत सिद्धान्ताचा पूर्ण व स्पष्ट उच्चार आहे, असें मला वाटतें. अज्ञानाचा पडदा नाहींसा झाल्यावर परमेश्वराचें जें सत्स्वरूप, निर्मलचित्त झालेल्या पुरुषांस श्रुतिज्ञानानें समजतें व उमजतें, तेंच जीवाचेंही सत्स्वरूप आहे असा त्याचा निश्चय होतो, हें येथें सांगितलें आहे. तसेंच ज्ञान झालें तरी विज्ञान होण्याला परमेश्वरी प्रसादाची आवश्यकता आहे, असें मागील मंत्राप्रमाणें येथेंही सांगितलें आहे. ॥ १६ ॥

---

**वायुरनिलममृतमथेदं भस्मान्तꣳ शरीरम् ॥**
**ॐ क्रतो स्मर कृतꣳ स्मर क्रतो स्मर कृतꣳ स्मर ॥ १७ ॥**

अन्वय व अर्थ—**वायुः अनिलं अमृतं** ( प्राण वायु हा कधींही नाश न पावणारा महावायु आहे. ) **अथ इदं शरीरं भस्मान्तं** ( आणि हें शरीर भस्म होऊन जाणारें आहे. ) **ॐ क्रतो स्मर** ( हे यज्ञस्वरूपी ॐ परमेश्वरा! असें स्मरण आपल्यास असूं द्या. ) **कृतं स्मर** ( मी जें काय केलें आहे त्याचें स्मरण असूं द्या. )—ह्याच शब्दाचा उच्चार पुनः एकदां आदरपूर्वक केला आहे.

सारांश, भक्ताचें म्हणणें असें आहे कीं, प्राणरूप वायु म्हणजे चैतन्य अविनाशी आहे. आणि शरीर म्हणजे दृश्य जगत् विनाशी आहे. म्हणून तो यज्ञस्वरूपी परमेश्वराची प्रार्थना करितो कीं, 'माझें स्मरण आपल्यास असूं द्या आणि मी काय जीं सत्कृत्यें केलीं असतील यांचेंही स्मरण असूं द्या, माझें शरीर व मीं ईश्वरार्पण केलेलें सदसत्कर्म यांचा तर नाश होणारच आहे. पण ज्या ज्ञानानें व चित्तवृत्तीनें अथवा ज्या आत्मिक वृत्तीनें मी वागलों आहें, त्याचें स्मरण ठेवून माझ्यावर अनुग्रह करा आणि माझी आत्मिक वृत्ति जास्त संस्कृत होत जाईल, असें मला दान द्या. ॥ १७ ॥

---

**अग्ने नय सुपथा राये अस्मान्वि-**
**श्वानि देव वयुनानि विद्वान् ॥**
**युयोध्यस्मज्जुहुराणमेनो**
**भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम ॥ १८ ॥**

**अन्वय व अर्थ—अग्ने देव विश्वानि वयुनानि विद्वान्** (हे अग्ने, हे प्रकाशस्वरूपी देवा! आमचीं कर्मे आणि आमचें ज्ञान, जाणणारा तूं आहेस.) **सुपथा राये अस्मान् नय** (सुखकर मार्गानें आम्हांस सत्स्वरूपाकडे घेऊन जा.) **अस्मत् जुहुराणं एनः युयोधि** (आमची आत्मिक योग्यता कमी करणारें जें पातक आहे, त्याचा नाश कर.) "**ते नमः**"—**इति—भूयिष्ठां उक्तिं विधेम** ("आपल्याला नमस्कार करितों" असा पुष्कळ वेळ उच्चार मी करीत आहें.)

सारांश, आमच्या पातकांचा नाश करून हे सर्वज्ञ देवा! तूं आम्हांस सन्मार्गानें नेऊन सत्स्वरूप दाखीव; पण अगोदर आमची योग्यता कमी करणारीं जीं काय कर्मे आम्हीं केलीं असतील, त्यांचा नाश हे सर्वज्ञ व दयाघन परमेश्वरा! आपण करावा. आम्ही आपल्यास नमस्कार करून वरील प्रार्थना मोठ्या आनंदानें अनेक वेळ करितों. ॥ १८ ॥

---

या मंत्रचतुष्टयांतील प्रार्थना अंतकालच्या समयीं, मुमुक्षूनें केली आहे असें दिसतें. हें दृश्य शरीर आणि दृश्य विश्व हीं सत्स्वरूपाचें आवरण करितात, म्हणून यांचा नाश व्हावा अशी अग्निआदिरूपानें परमेश्वरस्वरूपाची ही प्रार्थना आहे. ही प्रार्थना करतेवेळीं मुमुक्षूस विदित असतें कीं, परलोकास जाण्याचें देवयान आणि पितृयान असे दोन मार्ग आहेत. देवयानानें गेलें असतां सूर्य लोकाची प्राप्ति होऊन पुढें ईश्वरानुग्रह होतो, मुक्ति मिळते आणि जन्ममरण संपतें. आणि पितृयान मार्गानें गेलें असतां पितृलोकाची व चंद्रलोकाची प्राप्ति होते पण जन्ममरण संपत नाहीं; अशी जाणीव मुमूर्षु (मरणाची इच्छा करणाऱ्या) भक्तास आहे. असें 'सुपथा' 'जुहुराणं' इत्यादि शब्दांवरून समजतें. सुपथ म्हणजे चांगला मार्ग, शोभिवंत मार्ग, प्रकाश आहे असा मार्ग होय. देवयान मार्ग हा सुप्रकाशित असतो असा वैदिक सिद्धान्त आहे. यावरून सुपथ म्हणजे देवयान मार्गच अभिप्रेत असावा. तसेंच, 'जुहुराण' या शब्दाचा अर्थ 'चंद्र' असा आहे. चंद्र हा क्षय—वृद्धि पावणारा तेजो—गोल आहे आणि पितृलोकास गेल्यानंतर चंद्रलोकाची प्राप्ति होते, असाही वैदिक सिद्धान्त आहे. तसेंच, निष्काम कर्म करणारा जीव देवयानमार्गानें जातो आणि सकाम

कर्म करणारा जीव पितृयान मार्गानें जातो, असाही सिद्धान्त आहे. 'अठराव्या मंत्रांत 'एनः' हा शब्द 'जुहुराणं' या विशेषणानें अन्वित झाला आहे. योग्यता कमी करणारें पाप असा या दोन शब्दांचा अर्थ होतो. कर्म पुण्यप्रद असो वा पापप्रद असो, तें सकाम असेल तर जीवाची आत्मिक योग्यता कमी करणारें असतें. यावरूनच ' जुहुराणं एनः ' हे शब्द पितृयान मार्गाचे दर्शक आहेत, असा स्पष्ट बोध होतो. असो, ही प्रार्थना मरणाऱ्या भक्ताची आहे—आणि ' मला देवयान मार्गानें न्या ' असें त्याचें मागणें आहे. सारांश, श्रद्धापूर्वक व विचार-पूर्वक उपासना केली म्हणजे आत्मज्ञानाचा साक्षात्कार होतो, असा आशय आहे. श्रद्धा व विचार यांचें समीकरण असणें सर्वथा उपपन्नच आहे.

या उपनिषदांत तत्त्वज्ञान हा मुख्य विषय आहे, तथापि या विषयाच्या परिपोषासाठीं निष्काम कर्म, सकाम कर्म, हीं कर्में करणाऱ्या पुरुषांची स्थिति, ब्रह्मस्वरूप, निवळ कर्माची, निवळ उपासनेची, तसेंच निवळ अव्यक्त ज्ञानाची व निवळ दृश्य पदार्थविज्ञानाची निंदा, तत्त्वज्ञानाची आवश्यकता आणि परमेश्वरी प्रसादाची तीव्र अपेक्षा इत्यादि गोष्टींचा सिद्धान्तरूपानें विचार करून विषयाची पूर्तता केली आहे.

ह्या उपनिषदाचा भावार्थ मी होतांहोईल तितक्या पूर्वग्रहशून्यत्वानें लिहिला आहे. विश्वज्ञान व अव्यक्तज्ञान वाढवून निष्काम कर्म व उपासना हीं अमर्याद पुष्ट करावयाचीं आणि या उभयतांस तत्त्वज्ञानाचें नियमन लावून सर्वत्र ज्ञान, शांति, सच्छील आणि सत्सुख यांची वृद्धि करणारें ज्ञान मुमुक्षूंस द्यावयाचें, असा ' ईशावास्यादि '* मंत्रांचा अभिप्राय आहे, असें मला दिसतें.

॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐतत्सत्.

* ' ईश, केन व कठ हीं उपनिषदें भाष्यभाषान्तरांसह सिद्ध झालीं म्हणजे प्राचीन ग्रीक व अर्वाचीन कँट आदि तत्त्वज्ञांचे विचार देणार आहें. हे विचार समजले म्हणजे उपनिषत्कालीन तत्त्वविचार किती प्रगल्भ व सत्यरूप होते, आहेत व असतील, याचें तारतम्य अधिकारी वाचकांस सहज कळेल.

# उपसंहार.

मागें जीं चार निरनिराळ्या पंथांचीं भाष्यें उद्धृत केलीं आहेत, त्यांवरून वाचकांच्या सहज लक्षांत येईल कीं, या उपनिषदांत ब्रह्म वस्तु काय आहे, तिचा जीवाशीं आणि जडाशीं संबंध काय, योग्य कर्म, योग्य उपासना आणि योग्य ज्ञान यांची सिद्धि झाली तर फल काय मिळतें, जीवानें अंतकालीं कोणत्या गोष्टींचें ध्यान करावें, इत्यादि प्रश्नांचा या अल्प-विस्तृत पण बहूमोली उपनिषदामध्यें सिद्धान्तरूपानें उलगडा केला आहे, म्हणजे हा उलगडा सिद्धान्तपर आहे, विवेचनपर नाहीं, हें मी विशेष प्रस्तावनेंत सांगितलेंच आहे. पूर्वोक्त प्रश्नासंबंधानें भिन्न आचार्यांमध्यें वाद नाहीं. ब्रह्मस्वरूप आणि जीवस्वरूप यांच्या संबंधानें वाद आहे. या वादाचें स्वरूप प्रत्येक आचार्यांच्या भाष्यांत विशद झालें आहे, तथापि एकंदर उपनिषदाचा सारांश काय आहे तो, प्रत्येक मंत्र निराळा घेऊन, सांगण्याचा प्रयत्न करितों.

या मासिक पुस्तकाच्या वाचकांस बहुधा विदित आहे कीं, माझा निश्चय अद्वैत-सिद्धान्तपर आहे. तत्वज्ञानाचें अति उत्कट स्वरूप अद्वैतात्मक आहे, असा माझा निश्चय आहे. तथापि इतर मतें आणि त्यांतील सिद्धान्त, विशेष कालीं आणि विशेष प्रसंगीं मला सर्वथा आदरणीय वाटतात. परमेश्वराची प्राप्ति करून देणारें व पुरुषार्थ साध्य करण्यास साहाय्य करणारें प्रत्येक मत व प्रत्येक सिद्धान्त अत्यंत उपयोगी आहे, हें कोणासही असंमत असणें शक्य नाहीं.

असो, विचारश्रद्धेनें, आचारश्रद्धेनें किंवा उभयद्वारा, जीवाची जशी आत्मिक योग्यता झाली असेल, त्या मानानें त्याला तत्त्वज्ञानासंबंधाचे सिद्धान्त मान्य किंवा अमान्य होत असतात. उदाहरणार्थ ज्या जीवांना ह्या भूलोकांतील विषय-भोग आणि त्यांपासून उत्पन्न होणारें सुख यांतच आनंद वाटत असतो, ते जीव चार्वाक पंथाचे भक्त असतात. जन्मास यावें, भोग भोगावे आणि येथून निघून जावें, हा या जीवांचा नित्यक्रम असतो. 'देह तोचि देव, भुक्ति तेची भक्ति । मरण ते मुक्ति । अभाग्याची ॥' असें तुकोबा महाराज म्हणतात, या अन्वयेंच या लोकांचें वर्तन असतें. अर्थातच बाह्य विषयांपासून आपल्याला जें सुखोपभोग मिळवून देईल तें चांगलें आणि बाकीचें सर्व वाईट, ही या लोकांची नीति आणि "आहे तोंपर्यंत चैन करून घ्यावी, पुढचें कोणी काय पाहिलें आहे ?" हें त्यांचें तत्त्वज्ञान होय. असल्या लोकांस प्रत्यक्ष परमेश्वरानें उपदेश केला किंवा अमूर्त ब्रह्मस्वरूप प्रत्यक्ष झालें, तरी त्यांचा कांहीं एक उपयोग होत नाहीं व व्हावयाचाही नाहीं. वस्तुस्थिति ही अशी आहे कीं, संसारी पुरुषाचा बहुतेक व्यवहार वरील सारख्या तत्त्वज्ञानानेंच सिद्ध होत असतो. जावत्कालपर्यंत

सर्व ठाकठीक चाललें आहे, जावत्कालपर्यंत संकटाचा इंगा फिरला नाहीं, तावत्कालपर्यंत परमेश्वरभक्तीची व तत्त्वज्ञानाची बहुतेकांस कोणत्याही प्रकारें सामान्यतः आठवण होत नाहीं. आपल्या मनाविरुद्ध गोष्टी होऊं लागल्या, सुख देणाऱ्या गोष्टींपासून दुःख होऊं लागलें, अज्ञानामुळें संकटें व त्यांची परंपरा सुरू झाली म्हणजे मग परमेश्वराचें स्मरण आपल्यास होतें. या वेळीं आपण स्वतंत्र नाहीं, कोणाच्या तरी ( अज्ञात प्रेरकाच्या ) सामर्थ्यानें व इच्छेनें हा जगद्-व्यापार चालला आहे, ज्याला आपण सुख म्हणतों तें सुख नव्हे व ज्याला ज्ञान म्हणतों तें ज्ञान नव्हे, कर्म करणें, फलाशाविरहित कर्म करणें आणि चित्ताची समाधान वृत्ति ठेवणें हेंच खरें सुख आहे, असें सुचावयास लागतें. हाच भक्तीचा आणि तत्त्वज्ञानाचा उदयकाल होय. जगांतील अंतर्बाह्य सौंदर्य आणि रमणीय घटना पाहूनही केव्हां केव्हां भक्तीचा व तत्त्वज्ञानाचा उदय होतो. पण हा उदय केवळ ज्ञानी व जिज्ञासु महापुरुषांमध्यें मात्र दृग्गोचर होतो. असो; ही वृत्ति निरंतर राहिली तर भक्तीचा आणि ज्ञानाचा परिपोष होतो. या परिपोषाला जसजसें स्थैर्य येत जाईल, तसतसें आपल्या धर्मग्रंथांतील व ज्ञानग्रंथांतील विधि आणि विचार आपल्यास पटत जातील. सर्व विश्वाचा चालक एकच परमेश्वर आहे. तो सर्व सद्गुण-संपन्न आहे, मी सर्वथा दुर्बल आहें व अज्ञानी आहें म्हणून त्या सर्व-नियंत्या व सर्व-सद्गुणसंपन्न परमेश्वराची एकनिष्ठेनें आराधना केली तर मात्र मला ज्ञान आणि सुख प्राप्त होईल, तो नित्य सेव्य आणि मी नित्य सेवक आहें, इत्यादि प्रकारची स्थिर भावना होणें, हाच भक्तिपंथ होय. वेदविहित कर्म करावें आणि वेदप्रणीत उपासना करून आत्मानात्म ज्ञान संपादन करावें, भक्तिवृत्ति निरंतर एकनिष्ठ असावी आणि हा देह सोडल्यावर अमर जीवानें परमेश्वरलोकींही परमेश्वर-भक्ति अखंड करावी, ही भक्ति ज्ञानपूर्वक असावी, असा हा भक्ति-मार्ग आहे. हा मार्ग अवश्य आहे. जीवानें या मार्गाचें अवलंबन अवश्य केलें पाहिजे. हें तात्त्विक भक्तीचें सार आहे. श्रीमन्मध्वाचार्य या पंथाचे कट्टे पुरस्कर्ते आहेत. यांनीं अवतार घेऊन भक्तिपंथाला उत्तम व लोकोपकारी वळण दिलें आहे. माझ्या मतानें हें वळण अत्यंत अवश्य आहे. शास्त्रानें सांगितलेलीं नित्य आणि नैमित्तिक कर्में केल्याशिवाय व सर्व सद्गुणांचा आकर ( उदयस्थान ) जो श्रीपरमेश्वर त्याचें एकनिष्ठ भजन करून तद्-गुणांचा अवतार आपल्या विचारांमध्यें आणि व्यवहारामध्यें केल्याशिवाय जीवाला पुढें प्रगति करितांच येत नाहीं. श्रीमन्-मध्वांनीं निश्चित केलेली द्वैत पद्धति शुद्ध रीतीनें सिद्ध झाल्यावर पुढें प्रगति व्हावयाची ती ज्ञानासंबंधानें मात्र होय. भक्तिपूर्वक विचार-प्रगति चालली असतां असा निश्चय होत जातो कीं, परमेश्वरी स्वरूपामध्येंच चराचर विश्वाचा ( जड वस्तूंचा आणि जीवांचा ) अंतर्भाव झाला पाहिजे. या विचाराला आपल्यास परमेश्वरी अनुग्रहानें प्राप्त झालेल्या उपनिषदांचा आधार मिळतो. उपनि-

घडें म्हणजे पूर्ण दैवी विचारांचा अति उत्कृष्ट परिपाक होय. सर्वांभूतीं अवघा परमेश्वर भरला आहे, हें उपनिषदांचें मुख्य सांगणें आहे. ईश्वर सर्व चराचरांचा अंतर्यामी असून सर्व वस्तुजात त्याचें शरीर होतात, तो सर्व सद्गुणसंपन्न आहे, शुद्ध आहे, पापाचा गंधही तेथें नाहीं, तो सर्वांचें कल्याण करणारा आहे, त्याच्यापासूनच सर्व विश्व परिणाम-रूपानें निर्माण होऊन त्याच्या नियामकत्वानें स्थित असतें आणि शेवटीं त्याच्या शरीरामध्येंच लीन होतें, तो सर्वज्ञ आणि सर्व-शक्ति आहे, असा अर्थ सांगणारीं पुष्कळ उपनिषद्वाक्यें आहेत. यांचा आधार घेऊन श्रीमद् रामानुजाचार्यांनीं बौधायन संप्रदायानुसार असा एक पंथ निर्माण केला कीं, ज्याच्या योगानें ज्ञान आणि भक्ति, सत्-कर्म आणि नीति, यांची एकवाक्यता होऊन सर्वांची सारखीच वृद्धि झाली. एकच एक परमेश्वर सर्वव्यापी असून जीव आणि जड हीं मिळून त्याचें शरीर होतें. सर्व जीव शेवटीं परमेश्वरस्वरूपाकडेच जातात, हें या पंथाचें हृद्गत आहे. येथें ज्ञानाचा उत्तम परिपाक होऊन, सद्-भक्तीचा व सदाचरणाचा उत्कृष्ट परिपोष होतो. सर्वत्र एकच ब्रह्मवस्तु आहे, पण तिचें शरीर जड व जीव हीं घटित करितात व या शरीराचा नियंता परमेश्वर आहे; सारांश, तोच एक आहे, हा या आचार्यांचा सिद्धान्त आहे. यांचेच नांव "विशिष्ट अद्वैत" होय; या मार्गांतूनही मुमुक्षु जीवास जाणें अवश्य आहे. ज्ञानाचा परिपोष, एकनिष्ठ भक्ति व परोपकारी सदाचार यांची पराकाष्ठा झाली म्हणजे या पंथाची सिद्धि होते. तथापि जीवाचें अत्यंत समाधान होण्याला अशा प्रकारचें तत्त्वज्ञान हवें असतें कीं, ज्या ज्ञानानें आपल्यासह विश्व आणि विश्वपति तादात्म्य पावतील. जीव, जगत् आणि परमेश्वर यांचें तादात्म्य होऊन, सर्वत्र एकच एक गुणशून्य, विशेषशून्य, विकारशून्य, ज्ञानरूप, सत्तारूप, व आनंदरूप ब्रह्म आहे, दिसणारें जगत् आणि दुःख-शोकामध्यें अथवा सुख-दुःखामध्यें तळमळणारा जीव हीं मिथ्या आहेत, अशा प्रकारचें ज्ञान, शुद्ध-चित्त व भक्तिपरिपूत झालेल्या ज्ञानी जीवाला साक्षात् झालें म्हणजे मात्र खरें समाधान होतें. ही स्थिति शुद्धद्वैत व विशिष्टाद्वैत या पंथांतून यथाविधि जीवानें संक्रमण केलें तरच प्राप्त होते. असो; दिसणारें जगत् खरें नाहीं, असें ज्या उपनिषदांनीं अधिकारानें सांगितलें, त्यांचाच आश्रय घेऊन श्रीमत् शंकराचार्यांनीं मायावादाचा निश्चित विचार केला. विचाराअंतीं 'दिसतें तसें असत नाहीं, व असतें तसें दिसत नाहीं.' हें तत्त्व प्लेटो, कँट, शोपेनहार, डायसन, इत्यादि पाश्चात्य तत्त्वज्ञान्यांनीं अंगीकृत केलें आहे. ज्याला शंकराचार्य आणि त्यांचे अनुयायी 'माया' म्हणतात, आणि मायेमध्यें केवळ व्यावहारिक सत्ता मात्र आहे असें म्हणतात, त्यालाच पाश्चात्य लोक Relativity of knowledge (ज्ञानाची सापेक्षता, सापेक्षज्ञान) असें म्हणतात. इंद्रियें, मन, बुद्धि आणि अहंकार यांच्या द्वारा झालेलें ज्ञान वस्तुस्वरूपाचें नसतें, हें तत्त्व अठराव्या

व एकोणिसाव्या खिस्ती शतकांमध्यें यूरोपांत विद्वन्मान्य झालें; तेंच तत्त्व भारतीय ऋषींनीं खिस्तावतारापूर्वीं हजारों वर्षें येथें प्रणीत केलें होतें आणि त्याच तत्त्वाची मीमांसा शंकराचार्यांनीं शालीवाहनाच्या आठव्या शतकांत येथें केली. असो; अद्वैतापर्यंत मजल पोहोंचवीपर्यंत, विचाराचा प्रगामी प्रवाह थांबत नाहीं. पण हा प्रवाह सागररूपी झाला म्हणजे सर्वच ज्ञानरूप होतें. तात्पर्य, केवलाद्वैत सिद्धान्त हा ज्ञानाचा अंतिम कलश आहे. याच्यापुढें विचाराची प्रगति नाहीं. विश्व आणि विश्वगत पदार्थ हे सर्व विचाररूप झाल्यानंतर (सर्व दृश्य आणि कल्पनीय विश्व सत्तारूप म्हणजे ज्ञानरूप म्हणजे आनंदरूप झाल्यानंतर) विचाराची परिसमाप्ति होते. विचार्य वस्तु विचाररूप झाली, विचार करणारा जीव विचाररूप झाला आणि विचारदाता परमेश्वरही विचाररूप झाला म्हणजे सर्वच एकरूप होऊन ज्ञाता, ज्ञेय, आणि ज्ञान या त्रिपुटीची एकतानता होते आणि जीव मुक्त होतो. या मुक्त स्थितींत कर्तव्य किंवा ज्ञातव्य असें कांहींएक राहत नाहीं. सर्व कर्मांचा, भक्तींचा आणि ज्ञानांचा उलगडा होऊन सद्‌गुरुमुखानें, वेदान्त—श्रवणानें आणि मनन निदिध्यासानें "अहं ब्रह्माऽस्मि (मी ब्रह्म आहें)" असा साक्षात्कार होतो. या साक्षात्काराचें अथवा मुक्तीचें नांव सायुज्यता मुक्ति आहे. असें हें शेवटचें ज्ञान आहे. या सायुज्यता मुक्तीचा निश्चित स्वीकार आमच्या येथील ऋषींनीं, मुनींनीं आणि अलीकडील महाराष्ट्रांतील साधुसंतांनीं निःशंक मनानें केलेला आहे. हा विचार शेवटचा आहे, असा माझाही निश्चय झाला आहे, असें मी पूर्वींच या उपसंहारांत सांगितलें आहे. असो; हा विचाराचा शेवट होय. आतां, अद्वैत पंथ मला उत्तम वाटतो तथापि दुसरे पंथ मला त्याज्य वाटत नाहींत, इतकेंच नव्हे; पण जीवाच्या आत्मिक प्रगतीस ते आवश्यक वाटतात. श्रीगंगाभागीरथीचें स्नान करण्याच्या आधीं कृष्णा, गोदा, तापी, नर्मदा इत्यादि पवित्र नद्यांचें स्नान तीर्थयात्रा यथासांग करणाऱ्यानें जसें अवश्य केलेंच पाहिजे, त्याचप्रमाणें सायुज्यता मुक्तीचें अद्वैतरूपी स्नान करणाऱ्या जीवानें सलोकता, समीपता आणि सरूपता या शुद्धद्वैत, विशिष्टाद्वैत व शुद्धाद्वैत यांनीं विहित केलेल्या ज्ञानभक्तींनें पवित्र झालेल्या नद्यांचें स्नान केलेंच पाहिजे. गच्चीवर नेणाऱ्या पायऱ्यांचा अतिक्रम किंवा उपरोध करून जसें चालत नाहीं, त्याप्रमाणें अद्वैत सिद्धान्ताचा निश्चय करून कृतार्थ होऊं इच्छिणारानें वेदविहित कर्म, वेदविहित भक्ति आणि वेदविहित ज्ञान यांचा अधिकारानुसार स्वीकार केला पाहिजे; गृहस्थाश्रम यथास्थित चालवून व होतां होईल तितकें व त्यापेक्षां अधिक लोककल्याण करून आणि भेदभाव नष्ट करून सर्व जगच्चालक परमेश्वराची अखंड भक्ति केली पाहिजे आणि विश्वज्ञान संपादन करून आपलें ज्ञान व आपलें कर्म विस्तीर्ण केलें पाहिजे. हा वेदप्रणीत मार्ग आहे. येथें कोणी कोणाची निंदा करण्याचें कारण नाहीं. जसा ज्याचा आत्मिक अधिकार असेल, तसा त्याचा पुरुषार्थ असतो हें ध्यानांत ठेवून प्रत्येक विचारी पुरुषानें भारतीय वेदान्त ग्रंथाचा अभ्यास करावा, अशी

प्रत्येक सुज्ञ पुरुषास माझी नम्र विनंति आहे. विपरीत ग्रह होऊं नये म्हणून हा विस्तार मी केला आहे.

आतां मंत्रशः ईशावास्योपनिषदाचा विचार करितों. पहिला मंत्र जीवानें उपभोग (विषयभोग) कोणच्या दृष्टीनें घ्यावा ह्याचें विवरण करितो. सर्व सिद्धान्त्यांमध्यें एकवाक्यता ही आहे कीं, उपभोग घ्यावयाचा तो आपण निर्विकार दृष्टीनें घ्यावा. हें सर्व विश्व परमेश्वराचें आहे, आपण कोणत्याही दृष्टीनें स्वतंत्र नाहीं, परमेश्वरानें आपल्यास आपल्या कर्मानुसार जे भोग दिले आहेत, त्यांचा परतंत्रवृत्तीनें उपभोग घ्यावा, हें चारी भाष्यकारांचें एककंठी म्हणणें आहे आणि तें यथार्थही आहे. जीवाला जे जे विषय उपभोगावे लागतात, त्या त्यांपासून उत्पन्न होणारें सुख दुःख माझें नव्हे, ही वृत्ति जीवानें कायम ठेविली म्हणजे मोठेंच काम होतें. मी भोक्ता नव्हे; भोक्तृत्वाचा आणि माझा कांहीं संबंध नाहीं, असें शंकराचार्यांप्रमाणें म्हणा, किंवा सर्व विश्वाचा स्वामी परमेश्वर आहे आणि तो देईल तितक्याचा आपण समाधानवृत्तीनें व ईश्वरोपासनेसाठीं मात्र उपभोग घ्यावा असें इतर आचार्यांप्रमाणें म्हणा, मुख्य सिद्धान्तांत भेद उत्पन्न होत नाहीं. मुख्य सिद्धान्त हा आहे कीं, जीवाला सुख मिळावयाचें तें त्याला बाह्य विषयांपासून कधींही मिळणार नाहीं. विषयजातापासून जर खरें सुख उत्पन्न होत नाहीं, तर त्यापासून निवृत्त व्हावें आणि सुख देणारा किंवा सुखरूप जो परमेश्वर त्याचें आराधन करून किंवा ज्ञान मिळवून त्याचें एकनिष्ठ चिंतन करावें, हें अज्ञानी जिवाचें पहिलें कर्तव्य आहे. तसेंच विषय जर स्वरूपतः सुख देणारे पदार्थ नव्हेत, तर जीवानें निदान भलत्या विषयांचा लोभ न धरितां व त्यांचा उपभोग न घेतां वेदविहित विषयांचा मात्र वेदोक्तमार्गानें, आत्मिक प्रगतीसाठीं मात्र देहसंरक्षण करण्यापुरताच कायतो उपभोग घ्यावा. विषयज्ञान ( म्हणजे विश्वज्ञान ) वाढवावें आणि विषयोपभोग घ्यावा, पण त्याचें प्रामाणिक पर्यवसान असें असावें कीं, आपल्या, आपल्या कुटुंबाच्या, आपल्या समाजाच्या आणि जीवांच्या आत्मिक प्रगतीची विषयसेवनानें कल्याणकारी पुष्टि होईल. स्वतःचा आणि इतरांचा जीव संरक्षण करण्यासाठीं व ज्ञान वाढविण्यासाठीं विश्वज्ञान आणि परोपकारी कर्म यांची वृद्धि केलीच पाहिजे; पण त्या ज्ञानाचें, कर्माचें, व उपभोगाचें पर्यवसान जीव ब्रह्माकडे किंवा परमेश्वराकडे जाईल असें असावें, हा सिद्धान्त सर्व भाष्यकारांस मान्यच आहे. ईशस्वरूप काय, जीवस्वरूप कसें आहे, हें विश्व सत्य आहे किंवा मिथ्या आहे, इत्यादि प्रश्नासंबंधानें भाष्यकारांत एकवाक्यता, नाहीं हें खरें; तथापि जीवानें कोणत्या विषयांचा किती व कसा उपभोग घ्यावा, या पहिल्या मंत्रांतील मुख्य सिद्धान्तासंबंधानें सर्वत्र सुसंवाद म्हणजे एकवाक्यताच आहे. सारांश हा आहे कीं, विषयांचा उपभोग घ्यावयाचा तो त्यांपासून उत्पन्न होणाऱ्या क्षणिक व आभासिक सुखदुःखांकरितां नव्हे, तर आपण पूर्वीं

केलेल्या कर्माचें फल म्हणून, परमेश्वरानुग्रहानें ते ते भोग आपल्यास प्राप्त होतात म्हणून अथवा यदृच्छेनें आपल्यास हे भोगविषय अधिगत होतात म्हणून, 'आपल्यास ह्या विषयांचा देहसंरक्षणासाठीं किंवा जीव–प्रगतीसाठीं मात्र उपभोग घ्यावयाचा आहे.' हा निश्चय कायम होईल, 'जीवाला भोक्तृत्वाचा अधिकार आहे,' हा भ्रम नाहींसा होईल तर, चित्त–शुद्धीचें एक मोठेंच कार्य होणार आहे. या मंत्राच्या शेवटच्या भागांत "दुसऱ्या कोणाच्याही धनाचा अपहार करूं नको" हा जो उपदेश केला आहे तो अखिल नीतिमीमांसेचें उत्तम सार आहे. दुसऱ्याच्या शरीराचा अथवा मनाचा कोणतेही रीतीनें उपरोध किंवा उपमर्द करूं नये, आणि दुसऱ्याच्या धनासंबंधानें अपहार–बुद्धि ठेवूं नये, हें तत्त्व निश्चयानें आपल्या मनांत बाणलें म्हणजे अपकारक ( उपद्रव करणाऱ्या ) बुद्धीची निवृत्ति होते; त्याचप्रमाणें उपभोगांत सुख नाहीं, हें तत्त्व दृढ झालें म्हणजे उपकारक अथवा परोपकारी बुद्धि जागृत होते. याप्रमाणें अपकाराची निवृत्ति आणि उपकाराची प्रवृत्ति जागृत होऊन, चित्तवृत्ति शुद्ध आणि शुद्धतर होऊं लागते. अथवा सुख–तृष्णा–विरहित सत्कर्म करण्याची प्रवृत्ति होऊन चित्त शुद्ध होतें. हा पहिल्या मंत्राचा इत्यर्थ आहे.

दुसरा मंत्र मुमुक्षूनें वेदविहित कर्म मात्र करावें, हे स्पष्टपणानें सांगतो. येथेंही सर्व भाष्यकारांची एकवाक्यता आहे. वेदानें जीं कर्में विहित म्हणून सांगितलीं, तीं नित्य आणि नैमित्तिक कर्में कर्तृत्वशून्य बुद्धीनें करावीं, असें सांगण्याचा मुख्य हेतु आहे. सामान्यत: सर्व जीव भोक्तृत्वाप्रमाणेंच कर्तृत्वाचा अभिमान बाळगतात. 'मी भोगणारा आहें' या अभिमानाप्रमाणेंच 'मी कर्म करणारा आहें, मी अमुक करीन,' अशा तऱ्हेचा अभिमान सर्व–सामान्य असतो. ही अभिमानाची वृत्ति श्रेयस्कर नाहीं, असें वेदान्तशास्त्र मोठ्या जोरानें सांगत असतें आणि तें सांगणें बरोबरही आहे. भक्तिदर्शनांच्या व न्यायपद्धतीच्या दृष्टीनें पाहिलें तर सर्व–कर्तृत्व परमेश्वराकडे मात्र आहे. सांख्यदृष्टीनें प्रकृति हीच सर्व–कर्त्री आहे. जीवाच्या हातांत कर्तृत्वाचा भाग अतिशय अल्प आहे, अशी आर्य–शास्त्रांची विचारसरणी आहे. उत्पन्न झालेल्या वासनेप्रमाणें कर्म करण्याची ऊर्मि स्वीकारणें किंवा न स्वीकारणें येवढा काय तो भाग जीवाकडे नियत केलेला आहे. पूर्वजन्मीं जशी आपण शुभ अथवा अशुभ कर्म स्वीकारण्याची वृत्ति ठेविली असेल, तदनुसार आपली मनोघटना सिद्ध होते. म्हणजे पूर्वी आपल्यास जो वासनाप्रवाह स्वीकारण्याचें स्वातंत्र्य होतें, त्या स्वातंत्र्यानेंच आपल्या अंत:करणाची रचना घटित होते आणि जीवाचें स्वातंत्र्य कमी कमी होत जाण्याचा संभव असतो.

तथापि आत्मज्ञान जसें जसें वाढत जाईल, तसतसें जीवाचें शुभवासना–स्वीकाराचें स्वातंत्र्य ज्यास्त वाढेल हें खरें; पण आत्मज्ञानाची प्रगति झाली नाहीं,

तर उत्पन्न झालेल्या वासना आपल्यास विषयांकडे ओढून नेतात; आणि जीव सर्वथा वासनातंत्र होतो अथवा परतंत्र होतो. याला सांख्यसिद्धान्ताप्रमाणें कोणी प्रकृतितंत्रता म्हणतील किंवा आस्तिकसिद्धान्ताप्रमाणें परमेश्वर-तंत्रता म्हणतील; पण फलश्रुति एकच आहे. जीव हा पुष्कळसा परतंत्र आहे, असें सांगण्याचा सर्व पौरस्त्य-शास्त्रांचा कटाक्ष आहे. प्लेटो, ॲरिस्टॉटल्, कँट, इत्यादि कित्येक पाश्चात्य तत्त्वज्ञांचें हेंच म्हणणें आहे. सर्व अर्वाचीन व भौतिक शास्त्री हेंच म्हणतात. सारांश, जीवाला वर्तनस्वातंत्र्य फारच थोडें आहे, म्हणून 'मी कर्ता' असा जो जीवाला अभिमान असतो तो त्यानें सर्वथा टाकून द्यावा.

आणखी एका दृष्टीनेंही जीवाचा कर्तृत्वाभिमान घातकारी आहे. 'मी कर्ता' असा अभिमान धरणें म्हणजें जीवानें "मी देह किंवा मी मन किंवा मी बुद्धि व मी अहंकार आहें" असें संतत ध्यान करण्यासारखें आहे. ज्या वस्तूचें आपण एकाग्र चिंतन करितों तीच वस्तु आपण होतों, असा हिंदुस्थानांतील मानसिक शास्त्रांचा एक सिद्धान्त आहे. हा सिद्धान्त अनुभवानें आमच्या लोकांनीं ठरविला. त्यांनीं हा सिद्धान्त ठरविण्यासाठीं जीं उदाहरणें घेतलीं होतीं, तीं बरोबर होतीं कीं नाहीं हें ठरविण्याचें आतां येथें प्रयोजन नाहीं. पण त्यांनीं बांधलेला सिद्धान्त खरा आहे, असें दुसऱ्या अनेक उदाहरणांवरून सिद्ध करून देतां येईल. असो; ज्ञानरूप असणाऱ्या जीवानें "मी देह किंवा मन किंवा बुद्धि आहें" असें अखंड चिंतन करणें म्हणजे जडाचें ध्यान करणें, हें सर्वथा अनिष्ट आहे. कारण यामुळें ज्ञानरूपी जीवाला जडत्व प्राप्त होतें. हें जडत्व अधोगतीस नेणारें आहे म्हणून त्याज्य आहे. यास्तव हें प्राप्त होणारें जडत्व निवृत्त व्हावें म्हणून जीवानें कर्तृत्वाचा व त्याचप्रमाणें देहादिकांचा अभिमान टाकण्याची खटपट पहिल्यापासूनच केली पाहिजे. या प्रयत्नाला यश यावें म्हणूनच शास्त्रकारांनीं नित्य कर्में जीवास लावून दिलीं आहेत. जें कर्म केलें असतां पुण्य लागत नाहीं; पण केलें नाहीं तर पाप लागतें, त्याला नित्यकर्म असें म्हणतात. शास्त्रानें सांगितलें म्हणून हें संध्यावंदनादि कर्म करावयाचें असतें. येथें कर्तृत्वाचा अभिमान जसा हळू हळू सुटतो तसतसें चित्त शुद्ध होत जातें. असो; तेव्हां शास्त्रानें सांगितलीं म्हणून अभिमानशून्य बुद्धीनें कर्में करण्याचा प्रघात ठेविला म्हणजे जीव कर्मांमध्यें लिप्त होत नाहीं. त्याचप्रमाणें अमुक कर्माचें अमुक फल मिळेल हें चिंतनही जीवानें टाकून दिलें पाहिजे. फलाचा ध्यासही जीवाला विषय-लिप्त करितो. सारांश; कर्तृत्वाच्या अभिमानाचा त्याग आणि कर्मफलाच्या वासनेचा त्याग ह्या दोन गोष्टी सिद्ध झाल्या म्हणजे जीवाचें चित्त निर्मल होतें. हा उपदेश स्पष्ट ठसावा म्हणूनच दुसऱ्या मंत्रांत 'एव [मात्र]' या पदाची योजना केली आहे. कर्तव्यकर्म मात्र करावें, त्याचा अभिमान धरू नये व त्याच्या फलाची इच्छा धरूं नये, हें मुख्यतः सांगावयाचें आहे. निष्काम आणि निरभिमान वृत्ति वेदोक्त कर्म करतांना ठेविली म्हणजे केलेल्या कर्मापासून बद्धकता प्राप्त होत नाहीं. कर्मबद्ध न

होण्याला दुसरा मार्ग नाहीं, असें श्रुति ह्या मंत्रांत विशेष जोरानें सांगत आहे, हें वाचकांनीं कृपा करून ध्यानांत ठेवावें.

याप्रमाणें पहिल्या मंत्रांत भोक्तृत्वाभिमानाचा त्याग आणि दुसऱ्या मंत्रांत कर्तृत्वाभिमानचा त्याग ह्या दोन मुख्य मुद्याच्या गोष्टी सांगून जीवानें कर्तृत्व–भोक्तृत्व–शून्य असलें पाहिजे; असें श्रुतीनें ठरविलें आहे. सारांश; जीवाचें स्वरूप भोक्तृत्वाचें व कर्तृत्वाचें नाहीं, हें श्रुतीनें ठरविलें.

तिसरा मंत्र शुद्ध संसारी लोकांची निंदा करण्याकरितां उपयोजिला आहे. कर्तृत्व–भोक्तृत्व स्वीकारून जीवाचें शुद्ध स्वरूप जे लोक अज्ञानानें 'मलीन' करितात, त्यांस श्रुतीनें 'आत्मघातकी' असें विशेषण या मंत्रांत दिलें आहे व त्यांची फार हीन–स्थिति होते असेंही सांगितलें आहे. याही मंत्रासंबंधानें सर्वत्र एकवाक्यता आहे. तथापि 'आत्मघातकी' या पदांतील आत्म शब्दाच्या अर्थासंबंधानें तेवढा द्वैतवादी व अद्वैतवादी यांच्यामध्यें तीव्र विरोध आहे. या विरोधाचा विचार मी येथें करीत नाहीं, कारण विषयान्तर करण्याचें महापातक केल्याचा दोष माझ्या माथ्यावर येणार आहे. मुख्य गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती ही कीं, जे लोक जीवाकडे कर्तृत्वाचा आणि भोक्तृत्वाचा मिथ्या संबंध लावून घेतात, ते लोक व्यवहारदृष्टीनें व परमार्थदृष्टीनें आत्मघातकी असतात आणि त्यांना अधोगति प्राप्त होते. जसें म्हणजे ज्या अज्ञानानें आपण कर्म करितों तसें म्हणजे त्याप्रमाणें आपल्यास फल मिळतें, असें सर्वसामान्य तत्त्व श्रुतीनें या मंत्रांत सांगितलें आहे.

चवथ्या आणि पांचव्या मंत्रांत ब्रह्मस्वरूप (आत्मस्वरूप किंवा परमेश्वरी स्वरूप) सांगितलें आहे. या आत्मस्वरूपाच्या संबंधानें अर्थातच सर्व भाष्यकारांमध्यें विप्रतिपत्ति अथवा विरोध आहे. हा विरोध अत्यंत तीव्र आहे. तथापि एका दृष्टीनें सर्वत्र एकवाक्यताच आहे. आत्मतत्त्व सर्व–व्यापी आहे, तें अज्ञेय आहे आणि त्याच्याच सत्तेनें सर्व चराचर वस्तु व्यवहारांत आपापलीं नियत कर्मे करित असतात, हें सांगण्यामध्यें सर्वत्र एकवाक्यता आहे. आपल्यास बोध घ्यावयाचा तो इतकाच आहे कीं, या मंत्रांत सांगितलेलें ब्रह्मतत्त्व सर्वव्यापी, सर्वनियामक, सर्वज्ञ, सर्वागोचर, सर्वसत्ताधारी, असें असून तें सर्व कर्मांपासून अलिप्त म्हणजे शुद्ध आहे. या शुद्ध ब्रह्मतत्त्वाची भक्ति करून तुम्हीं तत्पदाला जाण्याची तयारी करा किंवा त्याचें स्वरूप समजून घेऊन व त्याची भक्ति करून म्हणजे ज्ञान–कर्मांचा समुच्चय करून तद्रूप व्हा, किंवा त्याचें स्वरूप पूर्णतः समजून घेऊन तादात्म्य स्थितीला जा.' तात्पर्य एकच आहे कीं, परमेश्वराचें नित्य, शुद्ध, बुद्ध, आणि मुक्त स्वरूप यथार्थत्वानें समजून घ्या. जीव स्वरूपतः ब्रह्म आहे कीं नाहीं हा विचार थोडासा एकीकडे ठेवून जीवानें ब्रह्मस्वरूपाचा निश्चय श्रुतिपद्धतीनें समजून घ्यावा, यासाठीं या दोन मंत्रांत ब्रह्म-

स्वरूपाचें वर्णन केलें आहे. हें वर्णन—उपनिषद—विद्यार्थ्यांनीं काळजीपूर्वक समजून घ्यावें. कारण ब्रह्मस्वरूपाचें ध्यान कल्याणकारी आहे.

सहाव्या आणि सातव्या मंत्रांत ज्ञानी जीवाची मनोवृत्ति सांगितली आहे. येथेंही मीं उद्धृत केलेल्या भाष्यकारांमध्यें तीव्र विरोध आहे. उत्तम ज्ञानी कोणास म्हणावयाचें, हा प्रश्न आहे. जीव आणि ब्रह्म हीं दोन्ही स्वरूपतः एकच किंवा हीं दोन निरनिराळीं तत्त्वें आहेत, हा वाद त्या त्या भाष्यकारांच्या ग्रंथामध्येंच पाहणें इष्ट आहे. माझ्या समजुतीनें श्रुतीला येथें जीव आणि ब्रह्म स्वरूपतः एकच आहेत, असें सांगावयाचें आहे. कारण सातव्या मंत्रामध्यें “सर्व भूतें ज्याच्यामध्यें आत्मस्वरूप होतात” असे शब्द आहेत. शिवाय, ‘एकत्व पाहणारा’ असे मंत्राच्या शेवटीं शब्द आहेत. त्यांवरून तर एक परमेश्वर मात्र आहे, असाच ज्याचा सिद्धान्त झाला, तो शोकमोहांच्या पार जातो; असें सांगणें श्रुतीला इष्ट आहे, असें वाटतें. जर सर्व भूतें स्वरूपानें आत्मरूप होतात आणि सर्वत्र एकात्मकता प्राप्त होते, तर बिचाऱ्या जीवानें असें कोणतें पातक केलें आहे कीं, ज्यामुळें त्याला मात्र आत्मरूपाचा लाभ होत नाहीं किंवा ‘मी ब्रह्म आहें’ असें म्हणण्याचा अधिकार प्राप्त होत नाहीं! सेव्य—सेवक दृष्टीनें जीव परमेश्वराचा सेवक आहे आणि परमेश्वरामध्यें उत्तमोत्तम सद्‌गुण आहेत म्हणून मात्र जीवानें परमेश्वराची प्रेमपूर्वक निष्काम भक्ति केली पाहिजे, हें नीट आहे. पण ज्ञानाची आणि भक्तीची पराकाष्ठा झाली, जीवाच्या स्वरूपामध्यें परमेश्वरी सद्‌गुणांचा अंतर्बाह्य संचार झाला, म्हणजे सेव्य-सेवकभाव जाऊन, अंशांशीभाव [ परमेश्वर हा अंशी आणि जीव त्याचा एक अंश, असा भाव ] झाला म्हणजे भक्ति पूर्वीप्रमाणेंच पूर्ण स्वरूपांत रहाते; पण ज्ञानाचा मात्र निर्मर्याद विस्तार होतो. या विस्ताराचीही पराकाष्ठा झाली म्हणजे ज्ञानरूप झाल्याशिवाय ब्रह्मज्ञान पूर्णत्वानें व्हावयाचें नाहीं, असा निश्चय होतो. ह्या विश्वांत दिसणारे अनंत विषय जरी स्वरूपतः ब्रह्मरूप आहेत, तथापि ज्ञेय दृष्टीनें ते आभासिक आहेत, मायिक आहेत, असें ज्ञान होऊन ब्रह्माचें व जीवाचें स्वरूप शुद्ध आणि निर्गुण असें आहे, अशी खात्री होते. माझ्या समजुतीनें श्रुतीला हेंच सांगावयाचें आहे. तसेंच मला असें वाटतें कीं, या उपनिषदांत जें अनेक सिद्धांतांचें विधान केलें आहे, त्यांतील प्रस्तुत मंत्रांतर्गत आत्मस्वरूपाचा सिद्धान्त हा प्रधानतम आहे. येथें माझ्या समजुतीनें जीवाचें आणि ब्रह्माचें ऐक्य सांगितलें आहे. या ऐक्याचा स्वीकार केल्याशिवाय शोक-मोह—कथा केव्हांही संपावयाची नाहीं. पूर्ण ज्ञान होईपर्यंत शोक—मोह जिवंत राहणार आणि एकरूप झाल्याखेरीज पूर्ण ज्ञान होत नाहीं, हे दोन अनुभवानें ठरलले सिद्धान्त खरे असतील, तर जीव व ब्रह्म हे दोन्ही पदार्थ एकरूप आहेत असें पूर्ण ज्ञान—विज्ञान झालें तरच शोक—मोहांचा विनाश होणार आहे.

असो; जीवस्वरूप कोणत्याही प्रकारचें असलें तरी या मंत्रावरून एक गोष्ट निर्विवाद ठरते. ती ही कीं, पूर्ण ज्ञानी पुरुषाला लज्जेचें, शोकाचें व मोहाचें कारण उरत नाहीं.

पूर्णज्ञानी पुरुषाला काय फल-प्राप्ति होते, ती आठव्या मंत्रांत सांगितली आहे. या मंत्रांत ज्ञानी पुरुषाला 'कवि, मनीषी' इत्यादि विशेषणें दिलीं आहेत, त्यांवरून हा ज्ञानी पुरुष, सर्वज्ञ मनोनियंता, सर्वश्रेष्ठ, स्वतंत्र आणि कृतार्थ झाला आहे, असें दिसतें. त्याला जें पद प्राप्त होतें तें शुद्ध, स्थूल–सूक्ष्म–कारण–देह–विरहित म्हणजे सर्वदेहशून्य असें तेजस्वी आणि निर्मल असतें. सारांश, तो ब्रह्मरूप होतो असें म्हणण्याचा भावार्थ आहे. म्हणजे "ब्रह्मवेद ब्रह्मैव भवति (ब्रह्मज्ञ पुरुष ब्रह्मच होतो)" असें श्रुति अन्य ठिकाणीं विधान करते, त्याचाच अनुवाद या उपनिषदाच्या आठव्या मंत्रांत केला आहे. या मंत्राच्या भावार्थावरूनही माझा असा निश्चय होतो कीं, श्रुतीला ब्रह्मात्मैक्य इष्ट आहे, (ब्रह्म आणि आत्मा अभिन्नस्वरूप आहेत हें ज्ञान इष्ट आहे.)

याप्रमाणें मुख्य प्रश्नाचा निकाल झाल्यावर म्हणजे जीवानें कोणती वृत्ति आणि कोणतें ज्ञान प्राप्त करून घेतलें असतां त्याला अत्यंत सुख होईल, ह्या प्रश्नाचा उलगडा केल्यानंतर, या उपनिषदांत विद्या आणि अविद्या (भक्तिज्ञान व भक्ति–ज्ञान–शून्य कर्म) यांचा विचार करण्यास आरंभ केला आहे. हा विचार म्हणजे श्रुतीला इष्ट असणाऱ्या सिद्धान्ताचें कथन होय. तिसऱ्या मंत्रांत सांगितल्याप्रमाणें याही मंत्रत्रयांत (मंत्र ९, १०, ११,) अविद्येनें अधोगति प्राप्त होते, असें सांगून केवळ विद्येनें म्हणजे केवळ विश्वज्ञानानें व नुसत्या देवांच्या कर्मरहित भक्तीनें अधिकच भयंकर अधोगति प्राप्त होते, असें प्रतिपादन नवव्या मंत्रांत केलें आहे. विद्या व अविद्या हे शब्द वेदान्तामध्यें व भगवद्गीतेमध्यें पुष्कळ वेळ उपयोजिलेले आहेत. त्या सर्वांचा उपयोग पाहतां (१) अविद्या म्हणजे ज्ञानशून्य कर्म अथवा सकाम व स्वाभिमानी कर्म आणि (२) शुद्ध अज्ञान किंवा माया, असे अर्थ निष्पन्न होतात. तसेंच विद्या या शब्दाला अनेक अर्थ आहेत. विद्या म्हणजे (१) आत्मविद्या, (२) भक्ति (३) इंद्र, सोम, रुद्र, इत्यादि उपदेवतांचें आराधन, असे निरनिराळे अर्थ प्रतीत होतात. या सर्व अर्थांचा संग्रह करून श्रुति या मंत्रांत स्पष्ट असें सांगते कीं, नित्य नैमित्तिक अशीं जीं वेदोक्त कर्मे तीं न करितां केवळ ब्रह्ममीमांसेची बडबड केली, भक्तीचा आव घातला किंवा देवताप्रीत्यर्थ स्वार्थी यज्ञयाग केले, तथापि जीवाच्या प्रगतीला यांपासून कांहीं एक उपयोग होत नाहीं; जीवास मुक्ति मिळवावयाची असेल तर ती त्याला ज्ञानशून्य कर्मानें किंवा कर्मशून्य ज्ञानानें मिळावयाची नाहीं. ज्ञान, कर्म आणि भक्ति या सर्वांचा संग्रह करून जेव्हां जीवाचें अंतःकरण गंगाजलाप्रमाणें निर्मल होतें अथवा स्फटिकाप्रमाणें स्वच्छ होतें, तेव्हां जीवाला

ब्रह्मस्वरूप समजण्याचा अधिकार प्राप्त होतो. विद्या आणि अविद्या या उभयतांचें ज्ञान यथास्थित होऊन तें ज्ञान ब्रह्मज्ञानानें परिपूर्ण होतें. ब्रह्मज्ञानाच्या शुद्ध तेजानें जेव्हां विद्या आणि अविद्या या उभयतांची नीट व्यवस्था लागते, तेव्हां जीवाला प्राप्त होणारा मृत्यु विनाश पावतो आणि जीवाला अमृतत्व प्राप्त होतें अविद्येच्या ज्ञानानें विषयदृष्टि नाहींशी होऊन मृत्यूचे पाश तुटून जातात. आणि विद्येच्या अभ्यासानें ब्रह्माचें ध्यान निरंतर राहून शेवटीं ब्रह्मज्ञान-विज्ञान होतें आणि जीव मुक्त होतो. हा १० व ११ मंत्रांचा भावार्थ आहे. या मंत्रांच्या अर्थासंबंधींही मत-मतान्तरें आहेत व तीं या पुस्तकाच्या वाचकांस अधिगत झालींच आहेत. तेव्हां या मत-मतान्तरासंबंधानें विशेष चर्चा येथें करण्याचें कारण नाहीं.

अशाच अर्थाची पुढील मंत्रत्रयी आहे. पहिल्या त्रयींत विद्या व अविद्या असे शब्द आहेत व दुसऱ्या त्रयींत 'संभूति आणि असंभूति' असे शब्द आहेत. शंकराचार्य असंभूति म्हणजे मूल प्रकृति असें म्हणतात. श्रीरामानुजाचार्य या शब्दाचा अर्थ निषिद्ध मनोवृत्तींची निवृत्ति [ मान, दंभ इत्यादि योगविरुद्ध विकारांचा विनाश ] असा अर्थ करितात. श्रीमन्मध्वाचार्य तिसराच कांहीं एक विशेष काढितात, म्हणजे या शब्दाच्या अर्थासंबंधानें भाष्यकारांत मुळींच एकमत नाहीं असें दिसतें. मला वाटतें कीं, संभूति म्हणजे दृश्य विश्व आणि असंभूति म्हणजे अव्यक्त विश्व अथवा मूल प्रकृति असे अर्थ घ्यावे. आतां हें खरें आहे कीं, चवदावे मंत्रांत असंभूति शब्दाला 'विनाश' हा पर्याय शब्द दिला आहे. या शब्दाचा अर्थ मूल प्रकृति असाच करणें असेल, तर त्याला लक्षणेचें साहाय्य घेतलें पाहिजे. कारणवाचक शब्दाबद्दल कार्यवाची शब्द श्रुतीनें घातला आहे, असा पक्ष स्वीकारल्याखेरीज मी जो अर्थ करूं पाहत आहें, त्याचा निर्वाह लागावयाचा नाहीं. सारांश; येथें अर्थ लावण्याचाच कठिण प्रश्न आहे. प्रत्येक भाष्यकारासही या शब्दांचा अर्थ करितांना कमी ज्यास्त ओढाताण करावी लागली आहे. शब्दाच्या शुद्ध वाच्यार्थानें ह्या मंत्राचा अर्थ स्पष्ट लागतच नाहीं. असो. सर्व कृतार्थ आणि जिज्ञासु मुमुक्षूंस माझी अशी विनंति आहे कीं, त्यांनीं कृपा करून या शब्दांचे यौगिक पद्धतीनें व रूढीच्या आधारानें योग्य अर्थ ठरविले असल्यास ते मला कळविण्याची कृपा करावी. वेदान्तांतील इतर मंत्रांस विरोध न करणारा असा संभूति व असंभूति या शब्दांचा अर्थ विचार-निष्कर्षानें सिद्ध होईल, तर या उपनिषदांत जे कांहीं भानगडीचे प्रश्न आहेत, त्यांतील एका प्रश्नाचा तरी निकाल चांगला लागला असें मानण्यास जागा होईल. मंत्रामध्यें जीं पदें असतात, त्यांत फेरफार करण्याचें धाडस कोणीही करूं नये, केल्यास महत्पाप आहे, हें मला ठाऊक आहे, तरी मी अतिनम्रपणानें व पुष्कळ भीत भीत असें सुचविण्याचें साहस करितों कीं, चवदावा मंत्र,—

*

" संभूतिंचाऽविनाशं च "

असा वाचला तर कदाचित् वरील प्रश्नाचा योग्य उलगडा होण्याचा संभव आहे. वाचकांनीं या गोष्टीचा पूर्ण विचार करावा, अशी त्यांस पुनः एकवार प्रार्थना करून मी या उपनिषदांत जे शेवटचे चार प्रार्थनापर मंत्र आहेत तिकडे वळतों.

पंधराव्या आणि सोळाव्या मंत्रांत सद्धर्माच्या ज्ञानासाठीं, सूर्यदेवतेची प्रार्थना केली आहे. या प्रार्थनेंत एक विशेष गोष्ट ही सांगितली आहे कीं, सामान्यतः सत्याचें स्वरूप कोणत्या तरी एका मोहक आणि मनोहर आवरणानें आच्छादित झालेलें असतें. कर्म, भक्ति आणि ज्ञान यांच्या सिद्धीनें मोक्ष-योग्य झालेला पुरुष तेजःस्वरूपी सूर्य देवतेची अशी प्रार्थना करीत आहे कीं, सत्स्वरूपावर जें एक मोहक आवरण आलेलें आहे, तें काढून टाक, म्हणजे मला जो सत्यधर्म हवा आहे त्याचें स्वरूप दृष्टीस पडेल. या प्रार्थनेवरून हें स्पष्ट होत आहे कीं, इंद्रियांच्या द्वारानें व मनोबुद्धींच्या साहाय्यानें जीवाला जें विषयाचें ज्ञान होतें, तें स्वरूपतः खरें नसतें. प्रत्येक ज्ञेय वस्तूवर इंद्रियादि उपाधींच्या योगानें कांहीं-एक विक्षित स्वरूप उत्पन्न झालेलें असतें; तें काढून टाकावें तेव्हां त्या वस्तूचें यथार्थ स्वरूप जीवाला अधिगत होईल. इंद्रियादिकांच्या द्वारानें जें अयथार्थ ज्ञान उत्पन्न होतें, त्यालाच श्रीमच्छंकराचार्य मिथ्या ज्ञान असें म्हणतात. यावरून मिथ्या ज्ञानाचा प्रश्न शंकराचार्यांनींच उत्पन्न केला, असा बहुतेक द्वैतवादी त्यांच्यावर आग्रहानें आरोप करीत असतात, तो आरोप निराधार आहे, असें ठरतें, असें मला वाटतें. मिथ्या ज्ञानाचा सिद्धान्त श्रुतीनें अंगीकारिला आहे. जी गोष्ट सर्वज्ञ श्रुतीनें हजारों वर्षांपूर्वी आमच्या या भरतखंडांत प्रकट केली, ती गोष्ट पाश्चात्य खंडांतील कांहीं विद्वानांस ख्रिस्ती शकाच्या १८ व्या किंवा १९ व्या शतकामध्यें यथार्थानें समजली आहे, असा भास होतो. असो; तात्पर्य हें आहे कीं, सापेक्ष ज्ञानाचा वाद किंवा मायावाद हा श्रुतीला मान्य आहे, म्हणून यथार्थ आहे; अथवा यथार्थ आहे म्हणूनच मान्य आहे. कोणताही पंथ तुम्हीं स्वीकारा, पण एक गोष्ट लक्षांत ठेवा ती ही कीं, इंद्रियादि उपाधींच्या साहाय्यानें उत्पन्न होणारें ज्ञान वस्तूचें यथार्थ ज्ञान नसतें. स्वच्छ स्फटिकाजवळ गुलाबाचें फुल ठेविलें असतां तो स्फटिक गुलाबी आहे, असा ज्याप्रमाणें आपल्यास प्रत्यहीं प्रतिभास होतो, स्वच्छ पाण्यामध्यें, निर्मल तेलामध्यें आणि घांसून पुसून नीटनेटक्या केलेल्या आरशामध्यें पाहिलें असतां आपलें एकच मुख निरनिराळ्या प्रकारचें दिसतें, म्हणजे ज्या प्रकारची उपाधि असेल तदनुसार एकाच वस्तूला निरनिराळीं अयथार्थ स्वरूपें प्राप्त होतात, हा अनुभव सर्व प्रसिद्ध आहे. यावरूनच हें सिद्ध होतें कीं, आपल्यास इंद्रियादि उपाधींच्या द्वारानें झालेलें ज्ञान अयथार्थ असतें. ही वस्तुस्थिति आहे. म्हणून मोक्ष-योग्य झालेल्या पुरुषाची सूर्यदेवतेस अशी प्रार्थना आहे कीं, " मला होणारें अयथार्थ

ज्ञान कृपा करून काढून टाक." श्रीमद्रामानुजादि आचार्यही 'भक्तांच्या दृक्–पंथांतून विषयाचें भोग्यत्व किंवा जीवाची भोगेच्छा नाहींशी व्हावी' अशी परमेश्वराची प्रार्थना करित आहेत, ही ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

१६ व्या मंत्रांत तर असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, वस्तूचें आवरण श्रुतिप्रणीत ज्ञानानें निवृत्त झालें म्हणजे 'जो तो पुरुष आहे, तोच तो मी आहें' असें ज्ञान होतें. येथें तर परब्रह्म आणि आत्मा [ जीवात्मा ] एकच स्वरूपाचे आहेत, इतकेंच नव्हे, तर ते दोन्हीही एकच आहेत. सारांश, "जीवो ब्रह्मैव नापरः [ जीव हा ब्रह्मरूपच आहे. ब्रह्माहून तो निराळा नाहीं ]" असें जें अद्वैत प्रतिष्ठापक श्रीमच्छंकराचार्य यांनीं म्हटलें आहे, तें सार्थ आणि साधार आहे असें सिद्ध होतें. असो; श्रुतीचा सरळ अर्थ हा आहे, असें मला वाटतें. सर्व श्रुतीचा समन्वय सिद्ध केल्यानंतर निराग्रही पुरुषाच्या हें लक्षांत येईल कीं, श्रुतीला तरी निदान ब्रह्मैक्यभाव मान्य आहे. श्रुतीवर श्रद्धा ठेवणें अगर न ठेवणें ह्या प्रश्नाचा विचार करण्याला प्रत्येक जीव स्वतंत्र आहे; पण श्रुतीवर पूर्ण विचारानें एकदां निष्ठा ठेविली व अनुभवानें श्रुतिसिद्धान्त पटत चालले, म्हणजे प्रत्येक विचारी पुरुषाला असें कळेल कीं, श्रुतीनें ब्रह्मात्मैक्य स्थापन करण्यासाठींच आपला अवतार धारण केला आहे.

या उपनिषदांतील शेवटचे दोन मंत्र देहपात होण्याच्या वेळचे आहेत. हा देहपात मुक्त होण्याच्या वेळचा असो किंवा चित्त शुद्ध झालेल्या सात्विक आणि ज्ञानी भक्ताच्या मृत्युसमयींचा असो; येथें जड पंचमहाभूतांचा जड भाग पंचभूतांस अर्पण केला आहे आणि अमृत चैतन्याचा चैतन्ययुक्त भाग चैतन्यास अर्पण केला आहे. आणि शेवटीं अग्नीची अशी प्रार्थना केली आहे कीं, त्यानें जीवास देवयान पंथानें घेऊन जावें. सात्विक आणि सन्मार्गानें चालणारे ज्ञानी लोक अर्चिरादि ( अग्निज्वाला, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायण ) मार्गानें देहपात झाल्यावर स्वर्गास जातात आणि तेथें आत्मज्योतीचा अनुग्रह होऊन ते मुक्त होतात, असा वैदिककालीन समज होता व आहे. ( छांदोग्य, बृहदारण्यक, व भगवद्गीता अध्याय ८ पहा. ) या मार्गानें आपल्याला अग्नीनें न्यावें आणि या मार्गानें नेतां येण्यासाठीं सर्वज्ञ अग्नीनें आपलीं सर्व पातकें भस्म करावीं, अशी मुमूर्षु पुरुषाची ( आसन्नमरण झालेल्या जीवाची ) प्रार्थना आहे.

असो; याप्रमाणें या उपनिषदाच्या मंत्रांवरून मला जो बोध झाला त्याचें यथामति विस्तृत वर्णन केलें आहे. माझ्या या उपसंहारांतील प्रत्येक विधान प्रत्येक विचारी वाचकास मान्य होईल, असें मला केव्हांही वाटणार नाहीं. मागें अवतीर्ण केलेल्या तिन्ही भाष्यकारांचे अभिप्राय संपूर्ण रीतीनें सर्वांस अर्पण केले आहेत, त्याचा हेतु हाच आहे कीं, प्रत्येक विचारी पुरुषानें आपल्या विचारास जो पंथ मान्य होईल, त्याचा स्वीकार करावा आणि त्या पंथानुसार आपले विचा-

रास व आचरणास वळण देऊन, आपल्या चित्ताला स्थिर आणि अखंड समाधान प्राप्त होईल, अशी व्यवस्था करण्याचा प्रयत्न करावा. मला जें काय वाटतें तें मी या उपसंहारांत स्पष्टपणानें नमूद केलें आहे. माझ्या समजुतीनें या उपनिषदांत ब्रह्मात्मैक्यभाव अधिकारानें सांगितला आहे. मंत्र सहा व सात, मंत्र आठ, मंत्र अकरा, मंत्र चवदा, पंधरा आणि सोळा व मंत्र सतरा या प्रत्येक मंत्रामध्यें अद्वैत सिद्धान्ताचा साक्षात् अवतार झाला आहे. मंत्र चार आणि पांच हे ब्रह्माचें सर्वव्यापी निर्गुण स्वरूप स्पष्ट सांगतात. असो; ब्रह्म निर्गुण आहे आणि जीव व ब्रह्म एकच आहेत, असा बोध मला या उपनिषदांच्या द्वारां होतो. याचवेळीं पूर्वी केलेलें विधान पुनः करावेंसें वाटतें; तें हें कीं, निर्गुण ब्रह्म कळण्याला वर्णाश्रमविहित वेदोक्त कर्म यथासांग आणि निष्काम वृत्तीनें झालें पाहिजे, सगुण ब्रह्माचें म्हणजे ईश्वराच्या ज्या अनंत विभूति आहेत, त्या विभूतींपैकीं आपल्यास इष्ट असणाऱ्या कोणत्या तरी एका विभूतीचें, नवविधा भजन–पूजनादि अवश्य झालें पाहिजे, वर्णाश्रमकर्म आणि इष्ट देवतेचें भजन–पूजन कोणाहि जीवाचा मत्सर किंवा द्वेष न करितां व इतर कोणत्याही देवतेची निंदा अथवा द्वेष न करितां झालें पाहिजे. सारांश, निर्गुणाकडे जावयाचें तें सगुण मार्गानें आणि अद्वैताकडे जावयाचें तें द्वैत मार्गानेंच गेलें पाहिजे. एवंच जीवाला प्रत्येक पंथाची आवश्यकता आहे; मात्र आपलें सात्विक कर्म यथासांग सिद्ध झालें, भक्तीची पराकाष्ठा झाली, ज्ञानाचा अमर्याद उत्कर्ष झाला, म्हणजे जीवाला ज्या जड उपाधींचा संसर्ग झाला आहे असें अज्ञानानें वाटतें, तो आभास निःशेष होऊन जीवाचें चैतन्य–स्वरूप पूर्णत्वानें प्रकट होतें. हा वेदमान्य मार्ग आहे. या मार्गानें प्रत्येक जीवास जावयाचें आहे. एकाच जन्मांत शेवटची मजल गांठण्याचें सामर्थ्य प्रत्येक जीवास नसतें तथापि परमपुरुषार्थावर एकनिष्ठ दृष्टि ठेवून जीवानें आपली मोक्षयात्रा सुरू केली आणि आपल्या यात्रेमध्यें उत्पन्न झालेलीं व उत्पन्न होणारीं कर्तव्यें यथासांग पार पाडिलीं, ‘ भोगाकरितां जीवित नाहीं, मोक्षाकरितां आहे ’ असें ध्यान निरंतर राखिलें, ‘ आपल्या बरोबरच इतरांसही मोक्ष–मार्गाला लावणें, हेंच खरें वेदोक्त कर्म आणि हीच खरी परमेश्वरी उपासना ’ असा ध्यास ठेविला, आणि या विश्वांत परमेश्वरानें काय काय चमत्कार केले आहेत, त्यांचें ज्ञान करून घेऊन दुःसह असणारी जीव–यात्रा सुखकर केली आणि मनुष्यकृत–भेदाभेद बुद्धि नष्ट करून टाकण्याचा प्रयत्न केला म्हणजे या किंवा इतर कोणत्या-तरी जन्मांत जीवाला शेवटची मजल गांठतां येईल, यांत मला तरि शंका वाटत नाहीं असो;

यात्रमाणें मला जे विचार सुचतात ते येथें दाखल केले आहेत. हे मात्र विचार आहेत, सिद्धान्त नव्हेत, हें मी अनेक वेळ सांगितलेंच आहे. आतां एकच गोष्ट सांगून हें उपसंहारप्रकरण आटपितों.

वेदान्ताचा व व्यवहाराचा कांहीं एक संबंध नाहीं, उभयतांमध्यें कोणत्याही तऱ्हेचा कार्यकारण संबंध नाहीं, किंवा हेतु–हेतुमद्भाव नाहीं, अशी एक महाभ्रामक व महाघातकरी समजूत आमच्या समाजांत आज चारपांचशें वर्षें धूमाकूळ माजवित राहिली आहे, तिचा निरास या उपनिषदांतील दुसऱ्या, आठव्या आणि ( नऊ ते अकरा या ) त्र्यींत स्पष्ट केला आहे. प्रार्थनापर मंत्रांतही ' माझें कर्म ध्यानांत असूं दे ' अशा प्रकारचा उल्लेख आहे. श्रीमद्भगवद्गीता तर चित्तशुद्धीकरितां आणि वेदान्त व व्यवहार यांची सांगड घालण्यासाठींच अवतीर्ण झाली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. असें असतांही केवळ कापिल सांख्यांचा आश्रय आहे म्हणून, कोठें कोठें एकांगी श्रुतिवाक्यें ज्ञानकर्मांचा घटस्फोट करण्याचा उल्लेख करितात म्हणून आणि सामान्यतः तामसगुणी जीवास विश्रांतीच्या नांवाखालीं आलस्याचा उपभोग घ्यावा असें वाटत असतें म्हणून, आमच्या या भरतखंडांत वेदान्त ज्ञान आणि निष्काम कर्म यांचा घातकारी घटस्फोट झाला आहे. याचा उच्चार प्रत्येक आळशी वेदान्ती, प्रत्येक लब्धप्रतिष्ठित हरिदास, प्रत्येक लोभी पुराणिक आणि प्रत्येक कर्तव्यविन्मुख संसारी गृहस्थ करीत असतो. असो; हिंदी जनतेची हीनस्थिति कां ? या प्रश्नाला ' कर्म नाहीं म्हणून ज्ञान नाहीं व ज्ञान नाहीं म्हणून कर्म नाहीं ' या तेवीस अक्षरी मंत्रांत आहे.

श्रुतीनें व गीतेनें ज्या कर्माचा निषेध केला आहे, तें केवळ उपभोगात्मक स्वार्थी अथवा परापकारी कर्म होय. परोपकारी कर्माचा श्रुतीनें निषेध केला नाहीं, इतकेंच नव्हे तर पितृ-ऋण, ऋषि-ऋण, इत्यादि ऋणें फेडल्याखेरीज गृहस्थाश्रमाची सांगता होत नाहीं असें ठरविलें आहे. संतति वृद्धिंगत करून समाज बळकट करावयाचा आणि पितरांचें ऋण फेडावयाचें, वेदाध्ययन करून व विद्या वाढवून समाजाची व्यावहारिक व पारमार्थिक यात्रा सुखकारक करावयाची आणि ऋषींचें ऋण फेडावयाचें, यज्ञयाग, इष्टापूर्ति इत्यादि करून दीनांचें संरक्षण करावयाचें आणि पंचमहाभूतांचीं द्रव्यें त्या त्या महाभूतांच्या देवतांस अर्पण करून त्याच्या द्वारां विश्वांत विषयसमृद्धि करावयाची आणि देवांचें ऋण फेडावयाचें, इत्यादि ऋण मुक्तींचीं कार्यें व्यवहारांतही सत्फलदायीं होतात. पण श्रुतीनें उपदेश केला आहे, यावरूनही चित्त शुद्ध होण्यासाठीं परोक्षज्ञानी पुरुषानें सुद्धां निष्काम आणि निरभिमान परोपकारी कर्म केलें पाहिजे, असें स्पष्ट होतें. शिवाय जीवाचें कर्म क्षणशः चाललें असतें. म्हणून स्वार्थी व विषयभोगी कर्मांचा मात्र त्याग विहित केला म्हणजे जीवाला सामान्यतःच परोपकारी कर्माची प्रेरणा होईल, असें वाटून श्रुतीनें परोपकारी कर्मांचा व परोपकारी ज्ञानाचा फारसा विस्तार केला नाहीं. तथापि ' कर्म करून नैष्कर्म्य संपादन कर ' या स्पष्ट वाक्यानेंच श्रुति बोध करिते कीं, ' इतर जनांस श्रेयस्कर ज्ञान होईल असें कर्म करा. ' पण आमच्या दुर्दैवानें हें श्रुतिप्रणीत ज्ञान विस्मृत झालें,

आम्ही आमच्या देहापासून व्यक्तिशः मात्र मुक्त होण्याच्या भानगडींत शिरलों, कुटुंब, समाज, राष्ट्र, विश्व, इत्यादिकांपासून प्राप्त होणाऱ्या बंधांचा व कुटुंब, राष्ट्र इत्यादिकांनीं आपल्यावर किती उपकार केले आहेत, त्यांचा विचार केला नाहीं आणि विश्वज्ञान वाढविल्याशिवाय आत्मज्ञान वाढत नाहीं व निष्काम कर्म केल्या-शिवाय कर्म संपत नाहीं, हें विसरलों आणि प्रस्तुतच्या हीन व तिरस्करणीय स्थितींत येऊन पडलों. असो; झाल्या गोष्टीचा खेद करून उपयोग नाहीं. आतां तरी आपलें कर्तव्य काय आहे, हें आपण पाहिलें पाहिजे. जर आप-ल्यास तरावयाचें असेल व दुसऱ्यास तारावयाचें असेल, तर प्रथम कुटुंबांतील मग राष्ट्रांतील सर्व मनुष्यप्राणी ( इतर जीवांचा विचार नंतर येतो ) आपल्या-प्रमाणेंच आहेत, आपण आपल्या मुक्तीसाठीं खटपट करितों, तशीच त्यांच्या करितांही केली पाहिजे, सर्वांस समान बुद्धीनें लेखिलें पाहिजे व त्यांच्याशीं समान बुद्धीनें वागलें पाहिजे, विश्वज्ञान विस्तीर्ण करून व प्रकृतीला, निसर्गाला, स्वाधीन करून घेऊन आपल्या कुटुंब–बंधूंचा, नंतर समाज–बंधूंचा व मग राष्ट्र–बंधूंचा चरितार्थ सौकर्यानें चालून त्यांस आत्मज्ञान होईल, असा प्रयत्न एकदृष्टीनें व आत्मज्ञानपूर्वक केला पाहिजे, अशी जर वृत्ति होईल, तर श्रुतिस्मृतींचें व इतिहास पुराणांचें सार्थक्य होऊन आपण तापत्रयांतून मुक्त होऊं. ईशोपनि-षदाचें सांगणें हें आहे. ' मुक्ति मिळवा, पण सर्व बंधांतून (देह–कुटुंब इत्यादि) सुटण्यासाठीं सर्व बंधांची शुद्धि निष्कामकर्मानें करा व मग मुक्तीचा प्रयत्न आत्मैक्यज्ञानद्वारां करा ' हा या श्रुतीचा उपदेश आहे. हा उपदेश दृढ होऊन आपलीं वाढलेलीं कर्तव्यें करण्याचें सामर्थ्य व ज्ञान आम्हांस यावें व आम्हीं मुक्त व्हावें ' अशी प्रेरणा करणारें ज्ञान, भक्ति व कर्म आणि चित्त शुद्ध झाल्यावर ब्रह्मात्म्यैक्योपदेश परमेश्वरी कृपेनें आम्हांस व्हावा, अशी त्या महा-योजक प्रभूची प्रार्थना करून हा विस्तारलेला उपसंहार येथें संपवितों.



# सूचीपत्र.



* शब्दांपुढील अंक मंत्राचे निदर्शक आहेत.